

बालमारल.

BALMORAL.

# THE QUEEN'S BOOK,

OR

# "LEAVES FROM THE JOURNAL OF OUR LIFE IN THE HIGHLANDS;"

TRANSLATED INTO MARÁṬHÍ

WITH THE GRACIOUS PERMISSION OF

Her Majesty the Queen.

BY

RÁO SÁHEB GANPATRÁO MOROBÁ PITALÉ.

Bombay:
PRINTED AT THE
EDUCATION SOCIETY'S PRESS, BYCULLA.

1871.

*All Rights are Reserved.*

TO

**His Royal Highness Prince Alfred Ernest Albert**

# DUKE OF EDINBURGH,

K.G., G.C.S.I., P.C., &c. &c.,

THIS MARATHI TRANSLATION OF THE BOOK

"LEAVES FROM THE JOURNAL OF OUR LIFE IN THE HIGHLANDS,"

**By His most Illustrious Mother The Queen,**

IS BY PERMISSION MOST RESPECTFULLY DEDICATED,

IN COMMEMORATION OF

HIS ROYAL HIGHNESS' VISIT

In 1870

TO THE CITY OF BOMBAY,

BY HIS MOST OBEDIENT AND HUMBLE SERVANT

THE TRANSLATOR.

# राणीचें पुस्तक,

ह्मणजे

# महाराणी विक्तोरिया

ह्यांचा

## हैलंद प्रांतांतील रहिवास

व

स्कातलंद, इंग्लंद व ऐर्लंद ह्या देशांतील सफरी

आणि

**गलबतांत बसून केलेलीं पर्यटनें**

ह्यांचा वृत्तांत

**राणी साहेबांनीं लिहिला;**

ह्याचें मराठी भाषांतर

महाराणीच्या परवानगीवरून

राव साहेब गणपतराव मोरोबा पितळे

ह्यानीं केलें.

मुंबई, १८७९.

प्रिन्स आल्फ्रेद अर्नेस्त आल्बर्त्त महाराज,

ड्यूक आफ् एदिन्बरो ह्यांस

हा ग्रंथ

त्यांचें मुंबईस आगमन झाल्याचें स्मरण राहवें एतदर्थ

भाषांतर कर्त्यानें

त्यांच्या परवानगी वरून

परम आदरानें व नम्रतेनें

समर्पण केला असे.

# PREFACE.

In offering this translation to the Public, I desire to express my deep gratitude to Her Most Gracious Majesty the Queen, for the honour she has done me in granting me permission to translate Her Majesty's work—"Leaves from the Journal of our Life in the Highlands," and I earnestly hope the translation will prove as interesting, and afford as much pleasure to Her Majesty's Maráthi-speaking subjects, as the original has done to Her Majesty's English subjects in all parts of the world.

No pains have been spared to render this translation as faithful and accurate as possible. Owing to the homely phrases and peculiar English idioms with which the work abounds, and for which there are no equivalents in Maráthi, I fear I may have failed to bring out adequately the simplicity and beauty of the original; still I sincerely trust the readers of the translation will not fail to recognise a portion of those qualities which give the work so great a charm to English readers.

A list of Patrons and Subscribers is given at the end of the book—an interesting feature in which is—the appearance for the *first time* of the names of Hindu Ladies in a List of Subscribers to a literary work.

In conclusion I have to offer my best thanks to the Rev. John Wilson, D.D., F.R.S.; to Major Thomas Candy, Maráthi Translator and Referee, Educational Department; and to my friends Mr. Vithal Náráyan Páthak, M.A., and Mr. Mahádev Moreshvar Kunte, B.A., for the valuable assistance they afforded me, in various ways, when engaged in the work of translation.

# प्रस्तावना.

विद्या ही सर्वांस भूषणास्पद आहे, त्यांत ज्यांच्या मस्तकीं राजमुगुट विराजितो त्यांस विशेष शोभाकर आहे. तिच्या योगानें त्या मुगुटाच्या रत्नाचें तेज विशेष खुलतें व त्याची प्रभा दूरवर फांकती. आमच्या देशांत विद्येचे पोषणकर्त्ते व भोक्ते असे कित्येक राजे होऊन गेले, त्यांनीं तलवारबाहादरी पेक्षां लेखणीचें सेवन करण्यांत विशेष कीर्त्ति व लाभ आहे असें समजून विद्याभ्यासांत आपला काळ बराच खर्चला. भोजप्रभृति हिंदु राजे व अकबर वगैरे मुसलमान बादशाहा ह्यांचीं नामें विद्याप्रिय लोकांच्या स्मरणांतून कधीं नष्ट होणार नाहींत. परंतु सांप्रत काळीं आमच्या देशांतील राजे रजवाडे ह्यांनीं तर यथाविधि विद्योत्सर्गच केला आहे. त्यांस विद्येची रुचि लागावी व त्यांनीं स्वतः विद्वान् होऊन आपल्या प्रजेस सुशिक्षित करण्यास झटावें ह्मणून इंग्लिश सरकार प्रयत्न करीत आहे ह्मणून बरें, नाहीं पेक्षां त्यांची स्थिति किती वाईट झाली असती हें सांगवत नाहीं; कारण इंग्लिश सरकारच्या आश्रयानें ते राहत असल्यानें त्यांस शत्रूपासून आपल्या मुलुखाचें रक्षण करण्याचे श्रम चुकले आहेत, तेव्हां ऐषआरामांत आपलें आयुष्य खर्चावें हेंच कायतें जन्माचें सार्थक असें त्यांस वाटून त्याच पंथास ते लागले असते. ब्रिटिश सरकारच्या ह्या स्तुत्य उद्योगाचें फळ दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें आहे हें पाहून कोणास आनंद झाल्या वांचून राहणार नाहीं, आणि ह्या सत्कृत्यास आपणही यथाशक्ति सहाय करूं लागावें अशी कोणाच्या मनांत बुद्धि उत्पन्न होणार नाहीं! ज्या पुस्तकाचें हें पुढील भाषांतर केलें आहे तें सर्वांच्या उपयोगीं पडावें अशी जरी आमची इच्छा आहे तरी आमच्या देशांतील राजे रजवाडे, जहागीरदार, मानकरी व बडे लोक ह्यांस त्यापासून विशेष लाभ घडावा असी आमची विशेष इच्छा आहे. अशा थोर लोकांस एखाद्या साधारण मनुष्याचा बोध किंवा उपदेश कदाचित् रुचणार नाहीं. थोरांस

थोरांचें अनुकरण करावेंसें वाटतें. आणि सुदैवानें त्यांस आपल्या महाराणी साहेबांचा कित्ता घेण्याचा हा प्रसंग प्राप्त झाला आहे, तो ते व्यर्थ जाऊं देणार नाहींत असी आह्मी आशा बाळगितों.

ह्या पुस्तकांत विक्तोरिया महाराणी साहेबानीं कोणास बोध किंवा उपदेश किंवा निषेध केला आहे असें नाहीं. अथवा जें लिहिलें आहे तें लोकांस उद्देशून लिहिलें आहे असेंही नाहीं. तें उजेडीं आणण्याची कल्पनाही मुळीं त्यांच्या गांवीं नव्हती. तथापि जें आतां प्रसिद्ध झालें आहे तें इतकें चागलें आहे कीं, त्यापासून वाचणाराचें हित झाल्यावांचून राहणार नाहीं.

ह्या पुस्तकांत जें वर्णन केलें आहे तें फार सुंदर व चित्रवत् आहे असें कोणीही कबूल करील. मूल ग्रंथाच्या भाषेची थाकी मराठींत उतरणें कठीण ह्मणून कदाचित् हें भाषांतर वाचणारांच्या मनांवर असा ग्रह उत्पन्न होणार नाहीं, तथापि त्यांतील गोष्टी रसभरित, प्रेमळ, मनोरंजक व मनोबोधक आहेत असें त्यांस वाटेल असी आमची खातरी आहे. आतां हें वर्णन परदेशांतील सृष्टिसौंदर्याचें व परदेशस्थ लोकांच्या स्थितिरीतीचें पडलें ह्मणूनही कदाचित् ह्याची गोडी कित्येकांस लागणार नाहीं. परंतु हें पुस्तक कोणी लिहिलें, हा कोणाच्या हातचा लेख, कोणाच्या पर्यटनाचा वृत्तांत, कोणाच्या अवलोकनशक्तीचें फळ, ह्यांत कोणाच्या मनोवृत्तीचें प्रदर्शन, व ह्यांत कोणाच्या अंतस्थ स्थितीरीतीचा व वर्तनक्रमाचा अभिनिवेश होतो व कोणाच्या गुणस्वभावाचें अभिज्ञान ह्यांत होतें, सारांश हें वाचल्यानें कोणाचें दर्शन होतें ह्याचा विचार केला असतां ह्या पुस्तकाची योग्यता दिसून आल्यावांचून राहणार नाहीं.

ह्या पुस्तकांत ज्या मुख्य गोष्टी आमच्या दृष्टीस पडल्या त्या आह्मीं एथें सादर करितों आणि आमची असी आशा आहे कीं, ह्याच्याशिवाय अणखीही कित्येक खुब्या दुसऱ्याच्या पाहण्यांत येतील.

आमच्या प्रिय महाराणी साहेबांस सृष्टिसौंदर्य पाहण्याची व वनें उपवनें भ्रमण करीत फिरण्याची पराकाष्ठेची आवड आहे असें स्पष्ट

दिसतें. पूर्व देशांतील राजेलोकांस आपल्या रंगमहालांत व आरसे-महालांत कोंडून राहणें गोड लागतें. व उंची अलंकार लेणें व भर-जरी पोषाग घालणें व नाच तमाशे, कुस्त्या पाहणें हेंच काय तें राजसुख व वैभव आहे असें ते समजतात. त्यांत एकादा शोकी असला तर तो कधीं मधीं शिकारीस निघतो, पण ती रपेट दाहापांच कोशांच्या आंत. मागें काय होईल ह्याची मनास धास्ती असते. परंतु विक्तोरिया महा-राणीनें आपला राजकीय डामडौल व बडेजाव एकीकडे ठेवून व राज्य-कारभाराचें ओझें एकीकडे सारून कितीवेळां सहकुटुंब देशाटन केलें हें ह्या पुस्तकावरून समजेल. तेणेंकरून त्या आपल्या राज्याविषयीं निष्काळजी होत्या असें नाहीं, तर शरीराला व मनाला विश्रांति मिळा-ल्यानें तें चालविण्यास त्यांस उलटी हुशारी व उल्हास हीं प्राप्त झालीं.

आमच्या राणीसाहेबांचें व त्यांच्या ब्रितिश प्रजेचें रहस्य किती आहे हें ह्या पुस्तकावरून लक्ष्यांत येतें. राजा उच्च सिंहासनारूढ असतां त्याजपुढें प्रजेनें करद्वय जोडून लवणभंजन केलें, व राजदर्शनास जातांना मोठमोठाल्या भेटी नेल्या व राजाज्ञा शिरसावंद्य केली अथवा राजास यथाकालीं करभार दिला ह्मणजे प्रजाधर्म पाळला असें नाहीं. तसे-च प्रभूनें शिक्या मोर्तबानिशीं दरबारांतून रयतेला हुकूम फरमाविले व राज्याच्या रक्षणासाठीं कानू कायदे केले व आपल्या प्रीतींतल्या किंवा आर्जवी मनुष्यांस जाहगिरी व इनामें व बक्षिसें दिलीं, ह्मणजे राज-धर्माचें आचरण व प्रजापालन झालें असें नाहीं. राजा व प्रजा ह्या परस्परांचें रहस्य असलें पाहिजे, त्यांचा एकमेकांवर भरवसा बसला पाहिजे. सारांश, राजानें प्रजेच्या व प्रजेनें राजाच्या अंतःकरणांत प्रीतीनें नांदलें पाहिजे. विक्तोरिया राणीनें स्वदेशपर्यटन करितांना उंच मध्यम व कनिष्ठ पदवींच्या लोकांशीं कसकशी वर्त्तणूक केली हें वाचून मनाला बहुत समाधान होतें. डोंगरचें आंवळे व समुद्राचें मीठ ह्यांचें जसें रहस्य जमतें तद्वत् पर्वतप्राय उंच पदावर विराजणारी जी महाराणी तिच्या समुद्रसम नीच स्थानावरचे लोकांशीं भेटी झा-ल्या तेव्हां परस्परांनीं आपली औपाधिक योग्यता क्षणभर एकीकडे ठेवून केवढ्या प्रांजल मनानें व स्नेहबुद्धीनें परस्परांशीं वागणूक केली,

गरिबांनीं राणीला किती आशीर्वाद दिले, व लोकांनीं सरकारच्या हुकुमावांचून किती ठिकाणीं आनंद प्रदर्शक चिन्हें उभारलीं व हर्ष-ध्वनि केला! ह्याचीं उदाहरणें सांगितली असतां ह्या ग्रंथांतील गोष्टींची एथें पुनरुक्ति करावी लागेल. एशिया खंडांतील राजे स्वदेशांत फिरायास निघाले ह्मणजे उसाच्या पिकांतून हत्तीच्या झुंडी गेल्यानें जे परिणाम होतात तसे व्हावयाचे. लोकांपासून नजराणे व मेजवान्या घेण्याचा आपला हक्कच आहे असें समजून ते आपलें सरकारी पोतें व श्रीमंती पोट भरल्या वांचून पुढें पाऊल टाकायाचे नाहींत. व जेथें त्यांची यथास्थित बोळवणी झाली नाहीं तेथें वक्रदृष्टि केल्यावांचून पुढें सरत नाहींत. परंतु राणी महाराज आपल्या प्रजेला कूर्म दृष्टीनेंच पाहत गेल्या. त्यांची ज्यांनी सेवा चाकरी केली अथवा त्यांस जें सहाय केलें त्यांबदल त्यांनीं बहुत कृतज्ञता दर्शविली, आपल्या तैनातीच्या लोकांकडून काम घेतांना देखील त्या त्यांचे उपकार मानीत असत.

अणखी एक संतोषाची गोष्ट ह्या पुस्तकांत दृष्टीस पडते, ती ही कीं, राणी साहेबांस गरिबांची फार दया आहे. आपल्या पदरचे चाकर नोकर ह्यांचीं नांवें लक्ष्यांत ठेवणें, त्यांच्या गुणाची पारख करणें, त्यांच्या खाण्यापिण्याची काळजी बाळगणें, त्यांच्या विश्वासूपणाची तारीफ करणें, त्यांचें सुखदुःख जाणणें, इत्यादि गोष्टी राजे लोकांच्या ठायीं प्रायः वागत नसतात. ह्या पुस्तकाच्या इंग्लिश प्रस्तावनेचा कर्त्ता असें लिहितो कीं, विक्तोरिया महाराणीचे हे गुण त्या राज्यकारभारावरून दूर असतां दिसून आले इतकेंच नाहीं, तर राज्यकारभाराचीं महत्वाचीं कामें करीत असतांहि कामा निमित्त आपल्या भेटीस आलेल्या लोकांचें क्षेमकुशल विचारण्याचा त्यांचा परिपाठ आहे व दुःखितांचें समाधान व सहाय करण्याविषयीं तर त्या भुकेल्या आहेत. गरीब व धनवान, लहान व मोठा ह्यां सर्वांचा उत्पन्नकर्त्ता परमेश्वर आहे, हें सर्वदां स्मरून त्या ह्याप्रमाणें वागतात.

हें पुस्तक वाचल्यानें केवळ राजकुळांतील लोकांस लाभ होतील असें नाहीं तर इतरांसही पुष्कळ फायदे होतील. आमच्या देशांत ज्या सुशिक्षित स्त्रिया आहेत त्यांस ह्यावरून राणी साहेबांचा निस्सीम

पतिव्रताधर्म दिसून आल्यावांचून राहणार नाहीं. "आल्बर्त्त व विक्तोरिया" ह्यांची प्रीति रेशमाच्या गांठी सारखी बसली होती. त्या परस्परांचें सुखदुःख वस्त्राच्या ताण्याप्रमाणें विणलें होतें. प्रवास करणारास ज्या अडचणी भोगाव्या लागतात, जीं संकटें येतात तीं सर्व राणी साहेबांस आपले भ्रतार समागमें असल्यामुळें सहन करायास फार धीर व सामर्थ्य आलें, व दुधांत शर्करा मिश्र केल्या प्रमाणें त्यांचें देशपर्यटन गोड झालें. अणखी एका गोष्टीकडे आमच्या पुस्तक वाचणाऱ्या सुशील बायानीं अवश्य लक्ष्य द्यावें. प्रवासांत देखील राणी साहेब आपल्या लेकरांचे धडे घेत असत असे लेख त्यांच्या दृष्टीस वारंवार पडतील. मुलांच्या सद्गुणांचें व विद्येचें बीजारोपण मातेकडून झालें पाहिजे. ही गोष्ट सर्व एतद्देशीय सुशिक्षित स्त्रियांस म्हणणीय आहे आणि आमची त्यांस असी विनंती आहे कीं, त्यांनीं राणी साहेबांचा ह्या कामीं कित्ता घेण्यास आळस करूं नये.

शेवटीं आमच्या सर्व देशबांधवांस व भगिनींस हेंच सांगणें आहे कीं, स्त्रीशिक्षणापासून राज्यास व देशास काय लाभ होतात ह्याचा त्यांनीं हें पुस्तक वाचून विचार करावा. राणी असो किंवा कोणी असो, सद्विद्येच्या योगानें ज्यांची बुद्धि व अंतःकरण प्रकाशित होतें तो आपलीं सर्व कर्त्तव्यें करायास समर्थ होतो. ईश्वर करो आणि राणी महाराजांच्या सर्व सद्गुणांची छाया त्यांच्या राजवंशावर व आमच्या एतद्देशीय राजे रजवाड्यांवर पडो.

"ज्या प्रियपुरुषानें ह्या ग्रंथकर्त्रीचें जिणें

सुखी आणि उज्वलित केलें

त्याच्या विश्रांतिदायक

स्मरणास

ही सुगम लेखमाला

प्रेमानें व कृतज्ञतेनें

वाहिली आहे."

# मूळग्रंथ प्रसिद्ध करणाराची

## प्रस्तावना.

(इंग्रजी वरून भाषांतर.)

हा ग्रंथ छापला जाण्यास काय कारण झालें तें संक्षेपेंकरून खालीं निरूपण केलें आहे.

मी* आपल्या हुद्याच्या नात्यानें बालमारल गांवास महाराणीस कधीं कधीं भेटायास जात असें, तेव्हां एकदां स्कातलंद देशांतील हैलंद नामक पहाडी प्रांतांत फिरत असतां जें त्यांनी दिनवृत्त लिहिलें त्यांतील कांहीं वेचे महाराणीनें मला मेहेरबानीनें वाचायास दिले ते वाचल्याने माझें चित्त वेधलें गेलें ह्मणून ते वेचे फार मनोरंजक आहेत असें महाराणीस दर्शविलें.

त्यावरून महाराणीचे मनांत असें आलें कीं, आपल्या आयुष्यांत जो मोठ्या सुखाचा काळ गेला त्या विषयींचें ह्या वेच्यांत वर्णन आहे ह्मणून ह्याचें लहानसें पुस्तक करून खासगी रीतीनें छापवून त्याच्या प्रती आपल्या राजकुटुंबांतील माणसांस व आपल्या जिवलग मित्रांस व मुख्यत्वेंकरून आपल्या सफरींत आपल्या समागमें जे होते त्यांस बक्षीस कराव्या.

तेव्हां महाराणी साहेबांच्या एका जवळच्या व ममतेंतल्या नातलगानें व दुसऱ्या कित्येकांनी, आणि मागाहून मी असें सुचविलें कीं, हा ग्रंथ प्रसिद्ध करून दुसऱ्यांसहि दाखविला तर जसा राजकुटुंबास

* ह्या ग्रंथाचा एदितर आर्थर हेल्प्स साहेब.

व आपल्या जिवलग मित्रांस मनोरंजक वाटेल तसाच सर्वांसही वाटेल. परंतु महाराणी साहेबांच्या ह्मणण्यांत असें आलें कीं, पुस्तकें लिहिण्याचे कामांत आपण मुळींच कुशल नाहीं, तशांत हे वेचे तर आमच्या गांवच्या आसमंतात् ज्या आमच्या स्वाऱ्या झाल्या, त्या विषयींचे अगदीं साधारण लेख आहेत; आणि आह्मी जें स्वतः लिहिलें तें प्रसिद्ध करण्यास आह्मांस मोठा संकोच वाटतो.

ह्या शंकेस मी आदरपूर्वक असें उत्तर केलें कीं, हें पुस्तक एकदां छापलें गेलें तर मग ह्याच्या कितीही थोड्या प्रती काढल्या व त्या कितीही संभाळून तजविजेनें वांटल्या, तरी त्यांचा कांहीं भाग, अथवा त्यांतून प्रयत्नानें मिळविलेले असे शुद्धाशुद्ध वेचे तरी वर्त्तमान पत्रद्वारें बाहेर पडल्या वांचून राहणार नाहींत. ह्या करितां हें पुस्तक आपणच आपल्या सर्व प्रजेस मिळेल असें करावें ह्मणजे जसा मला त्यापासून आतां आनंद झाला आहे तसा सर्वांस होईल ह्यांत संशय नाहीं. अणखी असें कीं, जी प्रजा नेहमी आपल्या प्रभूच्या सुखदुःखाविषयीं मनापासून कळकळ वाहत आली आहे, तिला राणी साहेब हैलंद प्रांतांतील वाड्यांत आपला कर्मणुकीचा वेळ कसा घालवीत होत्या व त्यांच्या प्रिय पतीच्या समागमानें त्यांच्या आनंदाची वृद्धि कशी होत असे आणि त्यांचें दुःख व चिंता कशी हरत असे, हें जर कळूं दिलें तर त्यांस मोठा आनंद झाल्या वांचून राहणार नाहीं. ह्या पुस्तकांत ज्या रमणीय स्थलांचें वर्णन केलें आहे त्यावरून नेहमी त्यांस आपल्या महाराणीच्या भ्रताराचें स्मरण होईल.

अशा विचारांवरून महाराणी साहेबांनी हें पुस्तक छापण्यास अनुमोदन दिलें.

हें पुस्तक छापीत असतां मी महाराणीस असें सुचविलें कीं, त्यांच्या इंग्लंद, ऐर्लंद व च्यानेल ऐलंद्स (इंग्लिश सामुद्रधुनीच्या मधील द्वीपें) एथील सफरीचे वृत्तांताच्या वेच्यांचा जर ह्या पुस्तकांत समावेश केला तर हें विशेष मनोरंजक होईल. तेव्हां महाराणीनें खुषी होऊन ते वेचे ह्या पुस्तकांत घालण्यास संमति दिली.

आपण स्वारींत फिरत असतां जे जे देखावे आपल्या पाहण्यांत आले व ज्या ज्या गोष्टींपासून आपणास इतका आनंद झाला त्याचें स्मरण राहवें एवढ्याचकरितां महाराणीनें हे लेख छापविले आहेत. ह्या पुस्तकांतून राजकीय प्रकरणाच्या व राजकारभारसंबंधाच्या गोष्टी मुद्दाम गाळल्या आहेत व असें करण्याचीं कारणें उघडच आहेत. राजकारभाराची काळजी दोन दिवस एकीकडे ठेवून सृष्टींतील ईश्वरी कृतीचे चमत्कार पाहून सानंदाश्चर्ययुक्त जे विचार मनांत आले व जो आयुष्याचा उपभोग घेतला ह्या सर्वांचें विवरण ह्या पुस्तकांत केलें आहे.

पुस्तक प्रसिद्धकर्त्यास ह्या पुस्तकाचे योग्यतेविषयीं फार सविस्तर वर्णन करणें हें योग्य नाहीं; परंतु तो एवढेंच सुचवितो कीं, सृष्टींतील स्थलें वगैरे ह्यांचें वर्णन ह्या पुस्तकांत हुबेहुब केलें आहे. लिहिण्याची शैली साधी व सोपी आहे. व ज्याचें वर्णन करावयाचें तें यायातथ्य व स्वरूपबोधक रीतीनें केलें आहे व हा ह्या ग्रंथाचा एक मुख्य गुण आहे. अमक्याचें वर्णन अमुक तऱ्हेचें असावें असा विचार करून तसें वर्णन केलें नाहीं, तर लिहिणारीच्या मनास जें खरोखर वाटलें व जे विचार आले तेच मात्र प्रत्येक पृष्ठांत दर्शविले आहेत.

ह्या पुस्तकावरून महाराणी साहेबांची मोठी उल्हास वृत्ति दिसते. कोणतेही पर्यटनापासून आनंद होणें ह्मणजे त्यास अशीच उल्हास वृत्ति असली पाहिजे. तशींच त्या राजकीय प्रवास्यांचीं अंतःकरणें किती ममताळू आहेत हें ह्या पुस्तकावरून स्पष्ट दिसतें. पर्यटन करीत असतां त्यांच्या प्रजेपैकीं लहान थोर जे कोणी त्यांस भेटले व त्यांनीं त्यांचें कितीही अल्प स्वल्प काम केलें किंवा अंतःकरणपूर्वक प्रीति दाखविली तरी त्या त्यांचे फार आभार मानीत असत.

ह्या पुस्तकांत ज्या टिपा आहेत त्यांवरून माझ्या मनांत जे विचार येतात ते जर एथें दर्शविले नाहींत तर ह्या महाराणीच्या लेखाचा अनादर केला असें होईल. दुसरें कोणीही असलें पुस्तक मला प्रसिद्ध करण्यास दिलें असतें तर हे विचार मी लिहिल्या शिवाय राहिलों नसतों.

ह्या टिपांवरून एकदां पाहिलेल्या मनुष्याची फार चांगली आठवण व ज्यांनीं प्रीतीनें सेवा केली ती उघडपणें मान्य करणें हे धर्म दिसून येतात. आपले पूर्वींचे राजांतही हे धर्म फार वसत होते व प्रजेची ममता हा गुण आपल्या सांप्रतच्या प्रभूमध्यें मुख्यत्वेंकरून वसत आहे एवढेंच नाहीं, परंतु असें दिसतें कीं, आपल्या महाराणीचा आपल्या प्रजेवर मातृवात्सल्याचा प्रेमा आहे. आपल्या महाराणी आपल्या परिवाराच्या कल्याणाविषयीं जेवढी मन लाऊन काळजी बाळगतात त्याहून आपल्या कुटुंबांतील माणसांचे कल्याणाविषयीं विशेष काळजी वाहणारा गृहस्थ ह्या राज्यांत विरळाच असेल. व त्यांचे सारखा धनी व सेवक ह्यांचे परस्पर धर्म काय हें मनांत वागविणारा पुरुष थोडाच मिळेल.

ह्या प्रमाणेंच लोकांच्या मध्यें ज्या पायऱ्या आहेत त्यांचा भेद बेमुरवतीनें तसाच न राहवा व एका पायरीचे लोकांनी दुसऱ्या पायरीचे लोकांशीं मिळून असावें, सर्वांनी समाईकपणानें सर्वांचें हित पाहत असावें, सर्वांनी एकमेकांचे उपयोगास पडत असावें, व देशांतील सर्व प्रतीचे लोकांनी परस्परें बंधुत्वाचा भाव मनांत राखून एकमेकांस मान सन्मान देत असावा, अशी इच्छा आपल्या महाराणी साहेब जितक्या उत्कंठेनें करतात तसें दुसरें कोणी करीत नसेल.

कामकाजाचे संबंधानें राणीसाहेबां बराबर ज्यांचें बोलणें चालणें होत असतें, त्यांस माहीत आहे कीं, एखाद्या चतुर कारभाऱ्या प्रमाणें आपल्या महाराणी त्यांच्यापुढें जो विषय असेल त्याजविषयीं मात्र बोलत असतात, तो विषय सोडून दुसऱ्या गोष्टी बोलत नाहींत. परंतु ज्या वेळेस त्या दुसऱ्या गोष्टी विषयीं बोलतात त्यावेळेस आपल्या प्रजेच्या कल्याणाविषयीं विचारपूस करण्याकरितां व कोणा मनुष्यास दुःख झालें असलें अथवा कोणाची हानि झाली असली तर त्याजविषयीं आपली दिलगिरी दाखविण्या करितां बोलतात. अमुक दुःखकारक गोष्ट घडली त्याजविषयीं आतां काय वर्त्तमान आहे, त्या अनर्थाचें निवारण कोणत्या उपायानें होईल असा वारंवार त्या शोध करित असतात. अशा त्यांच्या विचारपुसण्यावरून त्या आपले प्रजेस खरोखर लेंकराप्रमाणें मानतात असें सहज दिसून येतें. आपली

लहानथोर सर्व प्रजा समदृष्टीनें पाहून सर्वांचें कल्याण त्या मनापासून इच्छितात.

हें पुस्तक प्रसिद्ध केल्यानें आपल्या सांप्रतच्या राजदरबाराची चालचलणूक कशी आहे हें सहज कळून येईल. ह्या प्रमाणेंच महाराणी एलिझाबेथ अथवा दयाळू राणी आन ह्यांच्या दरबाराविषयींचें असलें वर्त्तमान इतिहासकर्त्यास सांपडेल तर त्यापासून तो किती लाभ मानील ! सांप्रत काळच्या गोष्टी सर्वांस अगदीं साधारण आणि क्षुल्लक अशा भासतात, परंतु पुढील इतिहासकर्त्यास त्या मोठ्या अमोल्य वाटतील. ह्याकारितां ह्या पुस्तकांत व " प्रिन्स कानसर्त ह्यांचें चरित्र " ह्या नांवाच्या पुस्तकांत कची हकीकत इतिहासकर्त्यास मिळेल त्यापासून त्यास विक्तोरिया राणीचे राज्याचें वर्णन चांगल्या रीतीनें करितां येईल व ज्या राणीच्या राजसंबंधी वागणुकीचें एकुणिसावे शतकाचे इतिहासांत इतकें मोठें वर्णन होईल, तिची घरगुती वागणूक किती उत्तम होती हें त्यास समजेल.

अणखी एक विचार असा आहे कीं, आपल्या राणीसाहेबांचें कोणी कांहीं काम केलें अथवा शुश्रूषा केली तर त्या स्मरल्या वांचून राहत नाहींत. लोकांत जी त्यांच्याविषयीं भक्ति आहे तीमुळें सर्व त्यांचा सहज सन्मान करतात, परंतु आपण राणी आहों ह्मणून लोकांनीं आपला सन्मान केलाच पाहिजे असें न मानतां जो कोणी त्यांची कांहीं चाकरी करील त्याचा त्या आभार मानतात.

राणी साहेबांचा हा गुण ह्या पुस्तकांत जिकडे तिकडे उघड दिसण्यांत येतो. व ह्या गुणेंकरून हें पुस्तक मोठें मनोहर झालें आहे, ह्मणून ह्या पुस्तकाचे दुसरे अनेक गुण लक्ष्यांत आणिले नाहींत तरी एवढ्या गुणावरूनच हें पुस्तक सर्व जनांस ग्राह्य होऊन ते त्याचा परम ममतेनें व कृतज्ञतेनें आदर करतील ह्यांत संशय नाहीं.

लंदन, ज्यानुआरी; १८६८.

# अनुक्रमणिका.

## स्कातलंदास जाण्याच्या पहिल्या खेपा.



## हैलंद नामें पाहाडी प्रांतांत आमचें राहणें

### सन् १८४८ सां पासून १८६१ पर्यंत.

## इंग्लंद व ऐर्लंद देशांतील सफरी आणि गलबतांत बसून समुद्रपर्यटन.

# स्कातलंदास जाण्याच्या पहिल्या खेपा.

# स्कातलंदास जाण्याची पहिली खेप.

मुक्काम रायल जार्ज नांवाचें गलबत,

सोमवार, आगस्त ता० २९ वी, सन १८४२.

आज सकाळीं पांच वाजतां आह्मी विन्‌जर नांवाच्या महालाहून लोखंडी रस्त्याच्या स्तेशनाला जाण्याकरितां निघालों. तेव्हां दचेस आफ् नार्फक, मिस मातिलदा पाजेत, जनरल वेम्स, कर्नल बुवरी व मिस्तर आन्सन हे सर्व आमच्या बरोबर आमच्या मागून चालले. आणि आमच्या स्वारी बरोबर येणारे लार्द लिवरपुल, लार्द मार्तन व सर जेम्स क्लार्क हे पूर्वींच वुलिच एथें गेले होते.

आह्मी लंदन शहरांत पावणेसहा वाजतां पोहोंचलों, आणि आपल्या गाडींतून सात वाजल्या पूर्वी वुलिच एथें दाखल झालों. नंतर आलबर्त्त व मी गलबतावर जाण्याकरितां आपल्या लहान नौकेंत बसलों. त्या समयीं आह्मांस गलबतावर जातांना पाहण्याकरितां लोकांची पुष्कळ गर्दी झाली होती. ड्यूक आफ् कैंब्रिज, लार्द जरसी, लार्द हार्दिंगतन, लार्द ब्लूम्फील्द व सर जार्ज कोक्‌बर्न हे सर्व बडे लोक आपला लष्करी पोषाग करून आह्मांस पोहोंचविण्याकरितां आले होते. सर जार्ज ह्यानीं मला हात देऊन नौकेवर चढविलें. रायल जार्ज नांवाचे गलबतावर आह्मी चढलों त्या वेळेस मोठा पर्जन्य आल्यामुळें आह्मांस आपल्या बसण्याच्या खोलींतच बसून रहावें लागलें.

आमच्या स्वारी बरोबर जीं जहाजें आहेत त्यांचीं नांवें येणें प्रमाणेंः—

१ लें, पीक नांवाचें जहाज; हें ३६ तोफांचें.

२ रें, दाफ्नी नांवाचें जहाज; हें १८ तोफांचें.

हीं दोन्हीं जहाजें नोर एथें आह्मांस मिळणारीं आहेत.

३ रें, सालामांदर नांवाची आगबोट. हिजवर आमच्या गाड्या आहेत.

४ थें, रादामांथस् नांवाची आगबोट. हिजवर लार्द लिवरपुल, व लार्द मार्तन हे आहेत.

५ वें, मंकी नांवाची आगबोट.

आह्मी ज्या गलबतावर बसलों त्या गलबतास नऊ वाजत तों पर्यंत ही ओढीत होती, हिजमध्यें मिस्तर आन्सन् व आमचे इकेरी* हे आहेत.

६ वें, शीरवातर नांवाची आगबोट, आमच्या गलबतास हल्लीं ओढीत आहे. हिजमध्यें सर जेम्स क्लार्क हे बसले आहेत.

७ वें, ब्ल्याकईगल् नांवाची आगबोट हिजवर आमच्या बरोबरच्या मडमा आहेत; आणि ही शीरवातर नांवाच्या आगबोटी पुढें असून आमच्या गलबतास ओढीत आहे.

८ वें, लैतनिंग् नांवाची आगबोट हिजवर जागरबेंदा आणि इयोस व केरनाख या नांवाचे आमचे दोन कुत्रे आहेत. ही आगबोट सर्वांच्या पुढें आहे. ही पीक नांवाच्या जहाजावरून आमची लाहान नौका घेण्या-करितां गेली आहे.

९ वें, फीरलेस नांवाची आगबोट. ही जलमार्गाची पाहणी करण्या-करितां आली आहे.

ह्या प्रमाणें आमच्या बराबर जहाजें आहेत. ह्यां खेरीज त्रिनिती हौसाकडील आगबोट आमच्या बरोबर येत आहे, आणि डाक पोहोंचविणारी आगबोटही आहे. आणि मौजेनें फिरण्याच्या लहानसान आगबोटी लोकांनीं भरलेल्या अशा पुष्कळच आमच्या मागून येत आहेत.

* म्हणजे पागेचे अधिकारी.

## मंगळवार, आगस्त ता० ३० वी, सन १८४२.

रात्रीं आठ वाजल्या पासून आह्मी सारे अठ्ठावन मैल आलों, हें ऐकून आह्मांला फार वाईट वाटलें. ही गोष्ट फार त्रासदायक व कंटाळवाणी आहे. आह्मी गलबताच्या वरच्या मजल्यावर दिवसभर सुखासनावर पडून राहिलों. तिसऱ्या प्रहरानंतर समुद्र बराच खवळला होता, ह्यामुळें माझ्या जिवास चैन पडत नव्हतें. नंतर यार्कशायरच्या किनाऱ्यावर फ्लाम्बरोहेद नांवाची भूशलाका आहे एथवर आह्मी साडेपांच वाजतां पोहोंचलों.

## बुधवार, आगस्त ता० ३१ वी, सन १८४२.

प्रातःकाळीं पांच वाजतां आह्मी असें ऐकिलें कीं, रात्रीं एका तासास तीन मैल ह्या मानानें गलबत चालत होतें, आणि सेंत आब्सहेद नांवाचें टोंक अझून ५० मैल दूर आहे, हें ऐकून आह्मास फारच त्रास झाला. नार्थंबरलंदच्या किनाऱ्या जवळचें कोकेट ऐलंद नामक बेट, व बांबरो, क्यासल् ह्या नांवाचा किल्ला आहे त्यांस मागें टाकून आह्मी पुढें गेलों, परंतु तीं आह्मांला दिसलीं नाहींत, त्यामुळें किंचित् वाईट वाटलें; तथापि माझ्या खोलींतून फर्न ऐलंद नामें बेट व त्यावरील ग्रेसदारलींग्चा दीपस्तंभ हीं आमच्या दृष्टीस पडलीं तशींच राकी ऐलंद्स् व होली ऐलंद्स् ह्या नांवाचीं बेटेंही आह्मी पाहिलीं. साडेपांच वाजतां मी गलबताचे मजल्यावर गेलें आणि लागलीच तेथें पडून राहिलें. मग आह्मांस स्कातलंदचा किनारा दिसूं लागला. तो किनारा फार सुंदर व अगदीं काळा भोर, खडकाळ, उभट व वैराण, आणि आमच्या इकडील किनाऱ्यां पेक्षां अगदीं निराळ्या तऱ्हेचा आहे. नंतर सेंतअब्सहेदच्या टोंकावरून आह्मी साडेसहा वाजतां गेलों, तेव्हां लोकांनीं भरलेले असे मासे मारण्याचे पुष्कळ मचवे आणि कांहीं आगबोटीही आह्मांस पहावयास आल्या; पैकीं एका मचव्यावर एक असामी ब्यागपैप* वाजवीत होता, तसेंच एका मोठ्या आगबोटीवर बाजा वाजत असतां रील नांवाचा नाच चालला होता. संध्याकाळच्या वेळेस ढग,

* एका प्रकारचें वाद्य आहे. त्याचा नाद सनईसारखा असतो, परंतु त्याची आकृति निराळ्या तऱ्हेची असती.

सूर्यास्त वगैरे ह्यांची फार शोभा दिसत होती. निर्वात असून हवा फार चांगली वाटत होती.

इंग्लंदच्यापेक्षां हिकडे दिवस किती मोठे आहेत, हें कोणाच्याही लक्षांत आल्या वांचून राहणार नाहीं. हिकडे आठ वाजून गेले तरी अंधार पडला नव्हता, आणि गेल्या सोमवारीं व मंगळवारीं संध्याकाळीं विन्जर एथें साडेसात वाजतां अंधक अंधक दिसूं लागलें व आठ वाजल्या पूर्वी अगदीं काळोख पडला. आमचे गलबतावरचे माणसांनीं नाच करण्याकरितां आमची परवानगी मागितली. नंतर एका लहानशा खलाश्यानें सारंगी वाजविली, आणि ते लोक तिच्या तालावर नाचले; त्यांनीं गायनही केलें.

साडेआठ वाजून पांच मिनिटें पर्यंत आह्मी वरच्या मजल्यावरच होतों. तेथून स्कातलंदच्या किनाऱ्यावरून आनंदसूचक अग्नि पुष्कळ ठिकाणीं पेटलेले आह्मी पाहिले; म्हणजे दंबार एथें, तिनिंगेम् नांवाची लार्द हार्दिंग्तनची रहाण्याची जागा एथें, आणि किनाऱ्यावरचीं दुसरीं टोंकें एथें. आमच्या गलबतावरच्या लोकांनीं चार बाण सोडिले, व दोन निळ्या चंद्रज्योती लावल्या. दिवसास अथवा रात्रीस कोणत्याही वेळीं नावाडी लोक नाळीवर किंवा डोलकाठीच्या शेंड्यावर कसकसे चढतात तें पाहून मोठा चमत्कार वाटतो. मुख्य डोलकाठीच्या शेंड्यावर जो मनुष्य दिवा नेत होता, तो तोंडांत धरून झटकन शेंड्यावर चढत असे. हे नावाडी मोठे हुशार व मर्यादशील आहेत.

आमची सफर संपण्याची वेळ जवळ आली हें पाहून आह्मांस मोठा आनंद झाला, आणि आह्मीं ईश्वराचे आभार मानले.

### बृहस्पतवार, सप्तेंबर ता० १ ली, सन १८४२.

रात्रीं पाऊण वाजण्याच्या सुमारास खलाशांनीं नांगर सोडिला त्याचा आवाज आह्मी ऐकिला, त्याचा शब्द आह्मांस मोठा सुखप्रद वाटला. प्रातःकाळीं सात वाजतां आह्मीं वरच्या मजल्यावर चढून न्याहारी केली. एका बाजूला अगदी जवळ लीथ शहर व एदिन्बरो शहरा जवळच्या उंच पहाडाचीं शिखरें हीं दिसत होतीं. एदिन्बरो शहरावर त्या वेळेस धुकें आलें होतें; आणि दुसऱ्या बाजूस ऐल आफ् मे नांवाचें बेट दिसत होतें.

ह्या बेटाविषयीं असें सांगतात कीं, पूर्वी म्याकबेथ् ज्या वेळेस स्वारी करून ह्या जागीं आला, त्या वेळेस म्याकदफ् ह्यानें त्यास अडविलें होतें; आणि बास नामक खडक आमच्या पाठीमागें राहिला. नंतर आठ वाजून दहा मिनिटांनीं आह्मी ग्यांटन नांवाच्या धक्यावर पोहोंचलों, तेथें ड्यूक आफ् बुक्लू, सर राबर्त पील वगैरे कित्येक गृहस्थ आह्मांस भेटण्यास जहाजावर आले. सर राबर्त ह्यांनीं आह्मांस सांगितलें कीं, काल आपली वाट पाहून लोक जरी थोडेसे दिलगीर झाले होते, तरी आतां ते मोठ्या आनंदांत आहेत. नंतर आह्मी धक्यावर उतरलों, तेव्हां ड्यूक ह्यांनीं आमचें आगतस्वागत अत्युत्तम केलें, व लोकांनीं आनंदघोष केला. आमच्या बरोबरचे गृहस्थ व मडमा ह्या आमच्या पूर्वींच सुखरूप उतरल्या होत्या; नंतर आह्मी दोघेजण गाडींत बसून निघालों, आणि आमची मंडळी आमच्या मागून आली. ड्यूक साहेब, आमचे इकेरी व मिस्तर आनसन् हे घोड्यावर स्वार होऊन आले.

त्यासमयीं जरी एदिन्बरो शहरांत पुष्कळ लोक नव्हते, तरी गर्दी होऊन इतकी चेंगरा चेंगर झाली होती कीं, तिजपासून कांहीं तरी अपघात होतील अशी वारंवार भीति वाटत असे. शहरच्या मुख्य अधिकाऱ्यानें आमच्या येण्याचे वेळेची योग्य जाहिरात लावण्याची चूक केली नसती, तर चांगला बंदोबस्त व व्यवस्था राहिली असती. एदिन्बरो शहर पाहून आह्मांस चमत्कार वाटला. हें शहर फारच सुंदर आहे, आणि जीं शहरें मी पाहिलीं त्यांत ह्या तोडीचें एक देखील नाहीं. आणि आलबर्त्त साहेबांनीं पुष्कळ जागा पाहिल्या तरी ते ह्मणतात कीं, आमच्याही पाहण्यांत असें स्थल कधीं आलें नाहीं. हें शहर बेतानें रेखून बांधिलें असून सगळ्या इमारती दगडाच्या आहेत, कोठें विटेचा एखादा टोला देखील दृष्टीस पडत नाहीं. एथील हायस्त्रीत नांवाची मोठी बीद आहे ती जरासी चढणीची असून फारच उत्कृष्ट आहे. शहराच्या मध्यभागीं एका विशाळ खडकावर बांधलेला किल्ला आहे तो पाहून फार अचंबा वाटतो. दुसऱ्या बाजूस क्यालतन नामक टेंकडी आहे, तिच्यावर ग्रीक लोकांच्या बांधण्याच्या तऱ्हेची न्याशनल मान्युमेंत नामक एक इमारत आहे, आणि नेलसन्चें मान्युमेंत, बर्नस्चें मान्युमेंत, तुरुंग, न्याशनल स्कूल वगैरे मोठमोठाल्या इमारती तेथें आहेत, आणि ह्या

सर्वांच्या मागें सर्वांहून उंच अशी आर्थर्स सीत नांवाची जागा आहे. हें सर्व मिळून मोठें रमणीय स्थल झालें आहे. तें पाहून मोठी मौज वाटावी. आमच्या येण्यामुळें एदिन्बरो शहरांतील लोकांस मोठा उत्साह झाला व ते लोक आह्मांशीं गोडीनें व स्नेहभावानें वागले.

रायल आर्चर्स बादिगार्द ( राजरक्षक धनुर्धर ) आह्मांस सामोरे आले, व सर्व शहरांतून आमच्या बरोबर चालले, त्यांत सर्व उमराव लोक व बडे लोकच आहेत. ते सर्व आमच्या गाडी जवळून जवळून चालत होते; परंतु लोकांच्या गर्दी मुळें त्यांस बरीच ढकलाढकली होत होती. त्यांपैकीं ड्यूक आफ् राक्सबरो व लार्ड एलको हे माझ्या बाजूनें चालत होते. आणि सर जे. होप हे आलबर्त्त साहेबांच्या बाजूस होते. लार्ड एलको ह्यांची माझी त्या वेळेस ओळख नव्हती. आह्मी रस्त्यानें चालत असतां लार्ड एलको ह्यांनीं मला लांबून नानातऱ्हेच्या इमारती व स्थळें दाखविलीं. आमची स्वारी शहरांतून बाहेर पडल्यावर कांहीं बलदीनें चालली. ह्या शहरांत प्रत्येक झोपडें देखील दगडाचें आहे, व तशाच कुंपणाच्या जागीं दगडी भिंती बांधिल्या आहेत.

हा मुलूख व हिकडील लोक हे दोन्ही इंग्लंद व इंग्लिश लोक ह्यांहून अगदी भिन्न मुद्रेचे आहेत. हिकडच्या वृद्ध स्त्रिया गळटोप्या घालतात, आणि एथील सर्व लहान मुलें व मुली अनवाणी चालतात. कित्येक सुंदर मुली व मुलें मी पाहिलीं, त्यांचे केंस लांब लांब असून मोकळे सुट-लेले होते. गरीबागुरीबांच्या मुली दोन वर्षांपासून तों सोळा सत्राच्या वया पर्यंत सर्वांचे केंस मोकळे असून भुरभूर उडत असत, व त्यांचा बहुतेकांचा रंग लालच होता.

आह्मीं येतांना रस्त्यांत क्रेगमिलर नामें किल्ला पाहिला. हा किल्ला आतां उद्ध्वस्त झाला आहे. एथें पूर्वीं स्कात्स लोकांची मेरी राणी रहात होती. आह्मी अकरा वाजतां डालकीथ हौस एथें पोहोंचलों. ही एक तांबूस दगडाची मोठी इमारत आहे, तिचें बहुतेक काम दचेस आफ् मान्मथ् हिनें बांधिलेलें आहे. ह्या वाड्या पुढचा रमणा फारच सुंदर असून विस्तीर्ण आहे. ह्या वाड्यास दर्शनी बाजू तीन आहेत, व

गाडी जाण्याचा दरवाजा डाव्या बाजूनें आहे. आह्मी पोहोंचल्यावर लागलीच दचेस आफ् बुक्लू येऊन पोहोंचली, आणि तिनें आह्मांस एका सुंदर जिन्यांतून आमच्याकरितां सिद्ध केलेल्या महालांत नेलें. हा महाल फार सुखकारक आहे. येथें पोहोंचल्यावर आह्मी दोघेही अगदीं थकल्या सारिखे होऊन आह्मांस भोंवळ आल्यासारखें झालें.

नंतर आह्मी दोघेही गाडींतून फिरावयास गेलों. हिकडील रमणा फार विस्तीर्ण आहे. हिकडून आर्थर्स सीत व पेंटलंड हिल्स नांवाचे डोंगर वगैरे प्रदेशाचा मोठा सुंदर देखावा दिसतो; तेथून व एका खोल दऱ्याच्या कड्यावरून गाडींत बसून फिरावयास जाण्याचा चांगला रस्ता आहे. आठ वाजतां आमचें भोजन झालें, जेवणास मंडळी पुष्कळ होती. जेवणास आलेले सर्व लोक सभ्यपणानें व स्नेहभावानें आह्मांशीं वागले; त्यांनीं आमच्या सफरी विषयीं फार विचारपूस केली.

**डालकेथ हौस नामें वाडा,**

**शुक्रवार, सप्तेंबर ता० २ री, सन १८४२.**

न्याहारीच्या वेळेस आह्मी ओटमीलची* लापशी व फिननहादी हीं थोडीं खाऊन पाहिलीं. हे पदार्थ रुचीला चांगले लागले. नंतर आह्मी पायांनीं फिरावयास गेलों; एथील रमायाच्या जागा मोठ्या विस्तीर्ण व सुंदर, जंगली व डोंगरी अशा आहेत. आह्मी एक्स नदीच्या प्रवाहाचे बाजूनें चालत चालत तिच्याच वरच्या किनाऱ्यावर एक लहानसें झोंपडें आहे तेथपर्यंत गेलों; व वरच्या रस्त्यानें परत घरीं आलों. नंतर संध्याकाळीं चार वाजतां दचेस आफ् बुक्लू, दचेस आफ् नार्फक यांच्या बरोबर आह्मी गाडींतून फिरावयास गेलों. ड्यूक व आमचे इक्वेरी घोड्यावर होते, व इतर मंडळी दुसऱ्या गाड्यांत होती. आह्मी दालकीथ शहरांतून गेलों, तेथें लोकांची दाटी होती; व धांवाधांव चालली होती, व ते मोठ्या आनंदांत होते.

---

* ओटमील ह्मणजे ओट नामक धान्याचें पीठ.

आलबर्त्त साहेब असें ह्मणतात कीं, हिकडचे बहुतेक लोक जर्मन लोका सारिखे दिसतात. एथल्या वृद्ध बायका, व त्यांच्या मच नांवाच्या टोप्या, व बहुतेक सुंदर मुली, व लहान लहान मुलें, आणि त्यांचे ते मोकळे केंस ह्या सर्वांची चित्रासारखी रचना दिसते. बायकांच्या डोकींत बानेट नांवाची टोपी क्वचित् दृष्टीस पडते.

मागाहून इतकी दाट धुई* झाली कीं, लासवेद नामें खेड्यांतून व लार्ड मेल्विलच्या रमण्यांतून आह्मांस घराकडे जावें लागलें. तो रमणा फार सुंदर आहे.

**शनिवार, सप्तेंबर ता० ३ री, सन १८४२.**

दहा वाजतां आह्मी एदिन्बरो शहरास जाण्याकरितां निघालों. आह्मी दोघें आपल्या गाडींत बसून निघालों, व आमच्या मागून बाकीची मंडळी आली. आर्थर्स सीत ह्मणून जो पहाड आहे, त्याच्या खालून आमची गाडी गेली; तेथें लोकांची फार गर्दी जमली होती, आणि रायल आरचर्स गार्द नांवाचे स्वार यांची आमची हिकडे गांठ पडली. लार्द एलको हे माझ्या बाजूनें व ड्यूक आफ् राक्सबरो आणि सर जे. होप हे आलबर्त्त साहेबांचे बाजूनें असे चालूं लागले. आह्मी होलीरूद च्यापेल (देवालय) व होलीरुद प्यालेस (राजवाडा) ह्यांवरून गेलों. हें देवालय फार जुनें व मनोरंजक आहे, आणि हा जुना वाडा बादशाही महालासारखा भव्य दिसतो. आमची स्वारी जुन्या शहरांतून व हायस्त्रीत नांवाच्या मोठ्या बिदींतून चालली. हायस्त्रीत फारच चमत्कारिक आहे. त्याच्या दोन्हीं बाजूंला टोलेजंग इमारती आहेत. त्यांतील बहुतेक घरें अकरा अकरा मजल्यांचीं आहेत, व प्रत्येक मजल्यावर निरनिराळीं कुटुंबें राहतात.

हरएक घराच्या प्रत्येक खिडकींत पुष्कळ लोक दाटीनें उभे होते. आह्मांस नाक्स साहेबाचें घर दाखविलें; ही जुन्या तऱ्हेची मोठी चमत्कारिक इमारत आहे. त्याप्रमाणेंच रिजेंट मरेचा वाडा आहे; त्याचें काम अजून जशाचें तसेंच आहे. जुन्या शहरांत हायचर्च नांवाचें देवालय व नव्या शहरांत सेंटपाल्स नांवाचें देवालय ह्या दोन फार चांगल्या इमारती

---

* स्कातलंद देशांत धुकें फार येतें, अशी प्रसिद्धि आहे.

आहेत. शहराच्या सरहद्दीवर आम्हांस शहराच्या मुख्य अधिकाऱ्यानें शहराच्या किल्या नजर केल्या.

पुढें जातां जातां अनाथ मुलांच्या धर्मशाळेंतल्या मुली मंचकावर उभ्या होत्या. तेथेंच जुन्या काळचा पोषाक करून वाणी उदमीही उभे होते. त्याच्या पुढें न्यूचर्च नांवाचें देवालय आहे, त्याचें बहुतेक काम पुरें होत आलें होतें, तरी त्या दिवशीं त्याच्या पायाचा मुख्य दगड घालणार होते हें नवल आहे. आम्ही शेवटीं किल्ल्यापर्यंत पोहोंचलों, व त्याच्या शिखरावर चढलों.

ह्या किल्ल्याच्या दोन्ही मोरच्यांवरून, एखाद्या प्रदेशाच्या मध्यभागीं उभें राहून पाहिलें असतां जसा भोंवतालचा संपूर्ण प्रदेश दिसतो, तसा देखाव्याचा चमत्कार दिसतो. तेथून आम्ही हेरियत्सचें हासपितल नामक धर्मशाळेची फार सुंदर जुनी इमारत पाहिली. ही धर्मशाळा जेम्स राजाच्या कारकीर्दींत एका सोनार जवाहिऱ्यानें स्थापिली. सर वालतर स्काट ह्यानें आपल्या फारत्युन्स आफ् नैगेल नामक पुस्तकांत ह्या सोनाराची कीर्ति वर्णिली आहे. नंतर आम्ही गाडींत फिरून बसून पुनः पूर्वीप्रमाणें चालूं लागलों. त्या वेळेस तर लोकांची इतकी गर्दी होऊन गेली होती कीं, तिचें फार भय वाटूं लागलें. मला व आलबर्त्त साहेबांना अरचर्स गार्द लोकांचें काय होईल ह्मणून धास्ती पडली. त्यांस फारच धक्काबुक्की सोसावी लागली; परंतु ते होते ह्मणून आमचा चांगला बचाव झाला. त्यांच्या हातांत एक धनुष्य असे व त्यांच्या कंबरबस्त्यांत बाण खोंचलेले असत.

आम्ही एदिन्बरो शहरांतून बाहेर पडतांच, दुर्दैवें करून पर्जन्य आला, तो तसाच संध्याकाळ पर्यंत लागत होता. दोन वाजतां आम्ही लार्ड रोजबरीचे डालमनी नांवाच्या राहण्याच्या ठिकाणीं पोहोंचलों. एथला रमणा फार सुंदर आहे. त्यांत समुद्रापर्यंत एकसारखीं झाडें लागत गेलीं आहेत. ऐथून फोर्थ नामें सामुद्रधुनी, ऐल आफ् मे नामें बेट, बासराक नामें खडक व एदिन्बरो शहर ह्यांचा देखावा फार सुंदर दिसतो; परंतु धुक्याच्या योगानें आमच्या दृष्टीस कांहींच चांगलें दिसलें नाहीं. ही जागा फार विस्तीर्ण आहे; हिच्यावर कितीएक डोंगऱ्या, दऱ्या, अरण्यें अशीं

आहेत. एथील वाडा अगदीं नव्या चालीचा बांधलेला आहे. तो लार्ड रोजबरीनें बांधला. तो फार सुंदर व सोईचा आहे. त्यांत आह्मीं कांहीं फलाहार केला. लार्ड रोजबरी व त्यांचें कुटुंब हीं सभ्य व आमच्या सेवेंत मोठीं तत्पर होतीं. आह्मी तिकडून साडेतीन वाजतां लीथ शहरावरून घरीं येण्यास निघालों.

लीथ शहरांत प्रवेश करण्यापूर्वी रस्त्यावरून पाहिलें असतां एदिन्बरो शहराची रचना मोठी मनोरंजक दिसते. आलबर्त्त साहेब ह्मणतात कीं, हें अगदीं वनदेवतांच्या स्थानासारिखें दिसतें. जसें एखादें सुंदर स्थळ कोणास स्वप्नांत, अथवा कागदावर काढलेल्या चित्रांत दिसावें त्याप्रमाणें ह्या शहराची रचना भासते. तें मोठें शहर सर्व पाषाणी असून त्यांत एक देखील विटांचा रंग दिसण्यांत येत नाहीं. त्याच्या एका बाजूस मोठा भव्य किल्ला आणि दुसऱ्या बाजूस कालतनहिल नांवाची डोंगरी आणि सर्वांपेक्षां आर्थर्स सीत व साल्सबरी क्राग्ज नांवाचे मोठमोठाले उंच पहाड आहेत, त्यामुळें आसपासच्या उद्वस्त जमिनीला फार शोभा आहे. आलबर्त्त साहेब ह्मणतात कीं, आक्रापालिस ह्मणून जें स्थान आहे, तें देखील ह्या स्थलापेक्षां अधिक रमणीय असण्याचा संभव नाहीं. आणखीही माझे ऐकिण्यांत असें आलें आहे कीं, एदिन्बरो शहरास नवें आथेन्स असें नांव दिलें आहे. आरचर्स गार्द (हुजरात) पुन्हा आह्मांस लीथ शहरांत येऊन मिळाले. हें शहर चांगलें आहे असें नाहीं.

एथेंही लोक आह्मांस पाहून मोठे हर्षित झाले, व त्यांची फार गर्दी झाली. एथील ओझीं वाहणारे सर्व घोड्यावर स्वार झाले होते, व त्यांच्या डोकींत स्काच टोप्या होत्या व त्यांचे घोडे फुलांच्या माळांनीं शृंगारिलेले होते, हें पाहून मोठा चमत्कार वाटला. परंतु हिकडच्या सर्व लोकांपेक्षां मासे धरणाऱ्यांच्या स्त्रिया मोठ्या सुंदर आहेत. त्या बहुतकरून तरुण व देखण्या असतात. आणि त्यांच्या त्या सफेत टोप्या व उंची रंगाचे घागरे, ह्यामुळें त्या अगदीं स्वच्छ व दच लोकांसारिख्या दिसतात. त्या आपल्या धंद्याच्या लोकांखेरीज दुसऱ्या लोकांबरोबर शरीरसंबंध करीत नाहींत.

नंतर संध्याकाळीं सहा वाजतां आह्मी अगदी थकून दमून परत आलों.

## रविवार, सप्तेंबर ता० ४थी, सन् १८४२.

आह्मी नवा बाग तयार होत आहे तो पहाण्यास पायीं गेलों; व तेथें क्लेरमोंत एथें जो म्यार्कितोष ह्मणून बागवान होता तो पाहिला. तेथून दालकीथ गांवाची फार चांगली चित्रवत् शोभा दिसत असे. आलबर्त्त साहेब ह्मणतात कीं, तें केवळ जर्मन् शहरासारिखें दिसतें. आह्मी परत येते वेळीं एस्क नदीस जो फळ्यांचा ओबड धोबड पूल आहे त्यावरून आलों. ह्या नदीच्या दोन्ही बाजूंचे किनाऱ्यांवर दाट झाडी आहे. तेणेंकरून ती फार चांगली दिसते. घरीं आल्यावर लेदी लितलतन ह्यांजकडून पत्र येऊन आमच्या लेंकरांचें कुशल वर्तमान समजलें, दोनप्रहरीं मिस्तर रामसी ह्यानें प्रार्थना वाचून धर्मोपदेश केला.

साडेचार वाजतां दचेस बाईनें आह्मांस आपल्या तांबड्या तट्टूंच्या जोडीच्या फैटनींतून फिरावयास नेलें. आलबर्त्त साहेब, ड्यूक साहेब व कर्नल बुवरी, हे घोड्यावर बसून आमच्या बराबर आले. आह्मी कांहीं वेळ रमण्यांतून व एका अरण्यांतून व सौथ एस्क व नार्थ एस्क ह्या नद्यांच्या किनाऱ्यावरून फिरत फिरत गेलों. ह्या दोन नद्यांचा जेथें संगम झाला आहे तेथून पेंतलंद हिल्स नांवाचे डोंगर चांगले दिसतात. नंतर आह्मी न्युबातल नामक जें लार्द लोथिअनचें रहाण्याचें ठिकाण आहे तेथें एका खासगीच्या रस्त्यानें गेलों. तेथचा रमणा फार चांगला आहे, व वाडा बराच मोठा दिसतो. तेथें एक मोठा विशाळ बीच वृक्ष आहे, तो पहाण्या करितां आह्मी गाडींतून उतरलों. ह्या वाड्या जवळूनच सौथ नदी वहात जाते व तिच्या डगरीवर दाट झाडी आहे.

तेथून आह्मी दालहौसी नामक जें लार्द दालहौसीचें रहाण्याचें ठिकाण आहे तिकडे गेलों. वाडा जुन्या एकाच तऱ्हेचा असून तांबूस दगडांनीं बांधलेला आहे. तेथें आह्मी क्षणभर उतरलों, तेव्हां लार्द दालहौसी व त्यांचें कुटुंब ह्यांनीं आह्मांला बसण्याचा दिवाणखाना दाखविला. खिडकींतून सुंदर वृक्षप्रचुर दरी दिसते, व लांबवरच्या डोंगरांचीं शिखरें दिसतात.

लार्ड दालहौसी आह्मांस बोलले कीं, चौथ्या हेनरी राजाच्या वेळे-पासून एथें आजपावेतों कोणी ब्रितिश राजा आला नाहीं. नंतर आह्मी आल्या रस्त्यानें माघारे आलों. हा सर्व दिवस प्रातःकाळापासून सायंकाळ पर्यंत अगदीं निर्मळ व लखलखीत असून गारठ्याचा होता. आह्मी परत येत होतों तेव्हां मूर्फूतहिल्स ह्मणून जी दुसरी डोंगरांची ओळ आहे तिची रचना आह्मांस फार चांगली दिसली. आह्मी घरीं येऊन पोहोंचलों तेव्हां सात वाजून गेले होते.

## सोमवार, सप्तेंबर ता० ५ वी, सन १८४२.

दालकीथ एथें गालेरींत खासगी भेटीची आह्मी आज सभा भरविली. त्या सभेस स्कातलंदचे प्रधान आणि मोठमोठाले अधिकारी आले होते. आणि जसे लंदनच्या दरबारांत जेन्तलमेन् आत् आर्मस् हजीर असतात तसें एथें रायल आर्चर्स लोक सभेंत आमच्या जवळ आणि दिवाण-खान्याच्या बाहेर हजीर होते. सभेच्या पूर्वी आह्मांस तीन सन्मान-पत्रें मिळालीं; १ लें, लार्ड प्रावस्त व इतर माजिस्त्रेत यांजकडून; २ रें, स्काच धर्म मंडळीकडून; आणि ३ रें, सेंट आंद्रुज्, ग्लासगो, व एदिन्बरो एथील युनिव्हरासितीच्या मंडळीकडून. त्या पत्रांचे जबाब आह्मीं वाचले. आणि माझ्या मागून आलबर्त्त साहेबांसही सन्मानपत्रें मिळालीं, त्यांचीं उत्तरें त्यांनीं उत्कृष्ट रीतीनें वाचलीं.

## मंगळवार, सप्तेंबर ता० ६ वी, सन १८४२.

ज्या प्रमाणें आह्मी आलों त्याप्रमाणेंच आज नऊ वाजतां दालकीथ एथून निघालों. प्रातःकाळीं आकाश स्वच्छ व लखलखीत असून गारठाही पडला होता. आह्मी गार्डीतून जात असतां पेंतलंद हिल्स नांवाचे पहाड पाहिले, ते फारच सुंदर दिसत होते. तसेच आह्मी आर्थर्ससीत नामक पहाडाचे अगदीं जवळून गेलों, तोही तसाच चांगला दिसत होता. त्याच प्रमाणें साल्स्बरी क्राग्ज नामें पहाड आहेत, तेही उंच, उभंड आणि सुळक्यांचे आहेत. ह्याच्या पूर्वी क्रेगमिलर आह्मी पाहिलें होतें. नंतर आह्मी एदिन्बरो शहराच्या मागच्या भागांतून हेरिअत्स हास्पितल ह्मणून

जी धर्मशाळा आहे तिच्या जवळून गेलों. हें शहर मजबूद बांधलेलें आहे. तेथून किल्ल्याची शोभा आह्मांस फारच सुंदर दिसली.

एथें एक गोष्ट सांगावयाची राहिली ती अशी कीं, जेव्हां आह्मी तो किल्ला पहावयास गेलों तेव्हां तेथें फारच जुनीं व चमत्कारिक असीं बहुत राजचिन्हें आमच्या दृष्टीसपडलीं. ह्या राजचिन्हांचा सुमारें शंभर वर्षेपर्यंत ठिकाणा नव्हता. आणि एक लहानशी खोली पाहिली, तिजमध्यें स्कातलंदचा ६ वा जेम्स नांवाचा राजा व त्याच नांवाचा इंग्लंदचा १ ला राजा हा जन्मला. ह्या लहान खोलीच्या भिंतीवर पुरातन काळच्या प्रार्थनेचा लेख आहे. तेथून आह्मांस एदिन्बरो शहराची आणि फोर्थ नामक सामुद्रधुनीची फार सुंदर शोभा दिसली. दालकीथ एथून सुमारें नऊ मैल पुढें गेल्यावर क्रैगैलीथ एथें आह्मी गाडीचे घोडे बदलले. ड्यूक साहेब हे त्या प्रांताचे लार्द लेफ्तेनेंत आहेत ह्मणून ते स्वार होऊन दालमेने पर्यंत आमच्या बरोबर येत होते. दालमेने एथें लार्द होपतौन हे भेटले, व तेथपासून ते आमच्या बरोबर येऊं लागले. अकरा वाजतां आह्मी सौथक्वीन्सफेरी एथें पोहोंचलों. आणि गाडींतून उतरून एका लहान आगबोटीवर चढलों. आमच्या स्वारीच्या बरोबरच्या बाया व गृहस्थ आणि आमच्या गाड्या अशा दुसऱ्या आगबोटींतून आल्या. नंतर होपतौन व दालमेने ह्यांच्यामध्यें जो होपतौन नामें वाडा आहे, तो पहाण्याकरितां फोर्थ नामक सामुद्रधुनींतून आह्मी कांहीं वरती गेलों. पुढें आह्मी दंदास एथील दंदास लोकांचा दंदास क्यासल (किल्ला) पाहिला. आणि होपतौनच्या पलीकडे ब्ल्याकनेस क्यासल ह्मणून जो किल्ला इतिहासांत प्रख्यात आहे तोही पाहिला. ह्याच्या समोरच्या बाजूस अगदीं पाण्याजवळ एक रासिथ नामें चौकोनी बुरूज आहे. त्या ठिकाणीं आलिवर क्रामवेल ह्याची आई जन्मली असें म्हणतात. तेथून कांहीं अंतरावर दनफर्मलिन नामक गांव आहे तोही पाहिला. एथें राबर्ट ब्रुस याचें थडगें आहे. आणि फोर्थ सामुद्रधुनींत एक सुंदर बेट आहे; त्यांत इंचगार्वी नामक एक जुना किल्ला आहे, त्याच्या जवळून आह्मी गेलों. तेथून फोर्थ सामुद्रधुनीचीं सुंदर बांकणें दृष्टीस पडलीं. एथून आह्मांस एदिन्बरो शहर व त्याचा किल्ला हीं लांबून अंधुक दिसत असत. त्याच्या दुसऱ्या समोरच्या बाजूस

नार्थकीन्सफेरी ह्मणून एक तर आहे तेथें आह्मी सुरक्षितपणें येऊन उतरलों, आणि गाड्यांत बसलों. जनरल वेम्स यांचे वडील बंधु कप्तान वेम्स हे कौदनबीथ पासून सुमारें आठ मैल आह्मांबरोबर आले. कीन्सफेरीहून आह्मी निघाल्यावर ज्या खेड्यांतून गेलों, त्याचें नांव ईनवरकीथींग, त्याच्या पुढें आह्मीं सर पिदरहमचे वतनाच्या जमिनी जवळून गेलों.

आह्मीं कौदनबीथ एथें घोडे बदलले, व सवा वाजतां किनरास शयर नामें परगण्यांत शिरलों, तेव्हां देश सुंदर दिसूं लागला. कांहीं कांहीं ठिकाणीं वृक्ष लागलेल्या टेंकड्या पुनः दिसूं लागल्या. आह्मी लाख लेवन नामें सरोवरावरून गेलों तेव्हां ज्या किल्यावरून हतभाग्य मेरी राणी पळून गेली तो किल्ला त्या सरोवरावर पाहिला. एथला प्रदेश कांहींसा सपाट आहे, व त्याच्या एका बाजूस मात्र पहाड आहेत. नंतर किनरास एथें आह्मीं घोडे बदलले. पुढें कांहीं वेळानें लौकरच डोंगर आमच्या दृष्टीस पडूं लागले. हे डोंगर कांहींसे रखरखीत आहेत. पुढें ग्लेनफार्ग नामें खिंड आह्मांस लागली. त्या खिंडींतून आह्मी जात असतां तिच्या दोन्ही बाजूंस उंच डोंगर आणि तळापर्यंत दाट झाडी लागून राहिलेली व रस्त्याचे एका बाजूनें लहानसा पाण्याचा ओहोळ वाहत होता त्यामुळें ही जागा खरोखर मोठी रमणीय झाली होती.

ही खिंड सोडून पुढें गेलें ह्मणजे स्त्राथर्न आणि मानक्रिफ हिल नामें डोंगर पहाण्यांत येतात. एथवर आलें ह्मणजे पर्थशयर परगणा लागतो. आणि बारा मैलांवर ब्रिज आफ् अर्न ह्या पुलाजवळ आह्मी घोडे बदलले. लार्ड किन्नल ह्याचा दुप्लिन नामें जो वाडा आहे येथें आह्मी साडेतीन वाजतां पोहोंचलों. रस्त्यानें जात असतां सर्व वाटेंत डोंगर, दरी, खोरीं, व ओहोळ यांचा देखावा रमणीय दिसत होता. रस्त्याच्या शेवटचा भाग उतारचढ फार असल्या मुळें चालण्यास कठीण पडला. दुप्लिन हा वाडा फार चांगला नव्या तऱ्हेचा आहे, व त्याच्या एका बाजूस फार सुंदर डोंगरांची रचना आहे. वाड्याच्या समोर जवळच एक लहानसा पाण्याचा धबधबा आहे तेथें आह्मी पोहोंचलों. तेव्हां त्या वाड्यापुढें हैलंदर लोकांची ४२ सावी पलटण उभी केली होती, तिचे लोक आपल्या लष्करी पोषाकाच्या योगानें फार सुंदर दिसत

होते. आंत गेल्यावर आह्मां दोघांसही त्या प्रांतांतील उमराव लोक व गृहस्थ लोक ह्यांजकडून मानपत्रें मिळालीं, तीं आमच्या पुढें लार्द किन्नुल ह्यांनीं वाचलीं. तशींच दुसरीं पर्थ एथील प्रोवस्त व माजिस्त्रेत ह्यांजकडूनही मानपत्रें मिळालीं. नंतर आह्मीं तिकडेस थोडासा उपहार केला. त्या वेळेस विलबी, किनेर्द, रुथवेन या नांवांचे बडे लोक आणि लार्द म्यान्स्फील्द व त्यांची एक बहीण, व दुसरी कित्येक मंडळी होती. उपहार आटपल्या नंतर त्या वाड्याच्या आसमंतात् कांहीं वेळ आह्मी फिरलों, नंतर पांच वाजतां वाट चालण्यास निघालों तों लौकरच पर्थ एथें पोहोंचलों. हें शहर ते नामक नदीच्या कांठीं फार रमणीय आहे. त्याच्या एके बाजूस झाडीनें भरलेले डोंगरांनीं व्याप्त असून पुढें लांब दुसरे डोंगर दिसतात त्यांतून ते नदी वळणावळणानीं वाहून सुंदर दिसते.

आलबर्त्त साहेब ती जागा पाहून फारच खुश झाले; आणि ह्मणाले कीं, ही जागा पाहून आह्मांस बाल शहराचें स्मरण होतें. पर्थ शहर फार सुंदर आहे, तेथें आह्मी पोहोंचलों. त्या वेळेस लोकांची फारच गर्दी झाली होती, व ते लोक मोठ्या आनंदांत निमग्न झाले होते. त्यानीं जागोजाग आनंदसूचक कमानी लाविल्या होत्या. तेथील प्रोवस्त ह्मणून जो मुख्य अधिकारी त्यानें शहराच्या किल्या आह्मांस नजर केल्या, व आलबर्त्त साहेबांस "फ्रीदम आफ् धी सिति" ही देणगी दिल्ही.* पर्थच्या पुढें दोन मैलांवर लार्द म्यान्स्फील्द ह्यांचा स्कोन नामें मोठा सुंदर तांबूस दगडांचा वाडा आहे.

तिकडे आह्मी पोहोंचलों तेव्हां लार्द म्यान्स्फील्द व त्याची आई (जिला दवेजर लेदी ह्मणतात) यांनीं दरवाज्या जवळ येऊन आमचें आगत स्वागत केलें, व आह्मांकरितां तयार केलेल्या महालांत आह्मांस नेऊन पोहोंचविलें. ती जागा फार चांगली सोईची होती.

बुधवार, सप्तेंबर ता० ७ वी, सन १८४२.

आह्मी बाहेर निघालों, आणि फिरतां फिरतां एक धमधमा पाहिला. त्याजवर प्राचीन काळच्या स्कातिश राजांस राज्याभिषेक होत असे. आणि

* ह्मणजे त्याचें नांव त्या शहराच्या सनदी मनुष्यांच्या पटावर दाखल केलें.

एक जुनी कमानही पाहिली तिला ६ व्या जेम्स राजाचें राज्यचिन्ह लाविलें होतें, व एक जुना क्रूस पाहिला, तो फारच मौजेचा होता.

आमच्या खिडकी समोर ६ व्या जेम्स राजानें लावलेलें सिकामोर जातीचें झाड होतें. पर्थ एथून आह्मांकडे कोणी एकानें चमत्कारिक जुनें पुस्तक आणलें. त्यांत सर्वांच्या खालीं (इंग्लंदचा) १ ला जेम्स राजा व १ ला चार्ल्स राजा ह्यांच्या सह्या होत्या. आपलींही नांवें त्यांत असावीं अशी पुस्तक आणणाऱ्यानें विनंती केल्यावरून आह्मीं आपल्या नांवाच्या सह्या केल्या. लार्ड म्यान्स्फील्द ह्यांनीं काल आह्मांस कळविलें होतें कीं, ह्या शहरांत कित्येक लोक आहेत, ते पहिल्या चार्ल्सच्या वेळीं जो पोषाग करीत असत तसाच सांप्रतही करितात. नंतर पहिल्याप्रमाणें आह्मी अकरा वाजतां पुढें जाण्यास निघालों. पर्थ शहराच्या एका भागांतून आह्मी चाललों. तिकडे स्कोन ह्या वाड्याची सुंदर रचना पाहिली. पुढें कांहीं मैलांवर लंकारती नांवाची रणभूमि आह्मांस लागली. ह्या ठिकाणीं लार्ड एरोलच्या पूर्वजांनीं देन्स लोकांचा पराभव केला, अशी दंतकथा सांगतात. पुढें लार्ड लिन्दाक् ह्यांच्या वतनाच्या जमिनीवरून आह्मी गेलों. व आकतर गावन ह्या ठिकाणच्या पोस्तखान्यास घोडे बदलले. तेथून आह्मांस ग्र्यांपिअन्स डोंगर साफ दिसूं लागले. ते खरोखरच मोठे भव्य आहेत.

डाव्या अंगास तलिबेल्तन नामें जागा पाहिली, ह्या ठिकाणीं ड्रुईद्स लोक बेल नांवाच्या देवास बळी देत असत, अशी दंतकथा आहे. त्या डोंगराच्या शिखरावर थोडींशीं झाडें आहेत.

त्याच्या डाव्या बाजूस आह्मीं समोरच बरनम नामक एक गांव पाहिलें. म्याकबेथ नामक नाटकांत बरनम वुद ह्मणून जें प्रख्यात अरण्य आहे, तें ह्याच ठिकाणीं होतें. बरनमच्या खालीं जवळच रोहलिअन नांवाची सर दब्ल्यु स्त्युअर्त साहेबाची शिकारीस जाण्याची सुंदर जागा आहे, तिजवरून आह्मी गेलों. उजव्या बाजूस स्तारमोंत व स्राथते ह्या दोन जागा पाहिल्या. आह्मी डोंगरांतून येत असतां आलबर्त्त साहेब ह्मणाले कीं, उजव्या बाजूस जिकडे झाडी आहे ती बाजू तुरिंगन ह्या सारखी दिसते; व डावी बाजू बहुतकरून स्वित्झर्लंद ह्या सारखी आहे. उजव्या बाजूस

सर दब्ल्यु. स्त्युअर्त्त ह्यांची मुर्थली नांवाची जागा मोठ्या चांगल्या प्रदेशावर आहे. व डोंगराचे खालीं ते नामक नदी वळण घेऊन वहात आहे. अशी ही सुंदर शोभा एकसारखी दन्केल्द पर्यंत लागत गेली आहे. लार्ड म्यान्स्फील्द हे सर्व वाटभर घोड्यावर बसून आमच्या बराबर चालत होते.

दन्केल्द शहराच्या वेशी जवळ एक मोठा जयस्तंभ पुरला होता, त्याच्या पुढें लार्ड *ग्लेनलयन याचे हैलंदर नांवाचे भालेकरी शिपाई आह्मांस सलाम करून आमच्या सभोंवतीं उभे राहिले, व एक ब्यागपैपवाला आमच्या पुढें ब्यागपैप वाद्य वाजवीत होता. दन्केल्द हें शहर ते नदीच्या कांठीं फार सुंदर ठिकाणावर वसलें आहे. हैलंदर लोक आपल्या छावणींत ज्या ठिकाणीं उभे होते तेथें आमची स्वारी पोहोंचली. त्या जागीं आह्मास उपहारासाठीं एक डेरा तयार केला होता, तेथें लार्ड ग्लेनलयन ह्यानीं आमचें मोठें आगत स्वागत केलें. ह्या बिचाऱ्यांचे डोळे अकस्मात गेले होते, त्यामुळें त्यांना मोठें दुःख होत असे. त्यांची बायको त्यांस हातीं धरून फिरवीत असे; हें पाहून आह्मास फार वाईट वाटलें. त्यांचे डोळे अति श्रम केल्या मुळें गेले. दावेजर (स्त्री धनवती विधवा) लेदी ग्लेनलयन आणि म्यान्स्फील्द, किन्नूल, बुक्लू ह्या नांवाचे बडे लोक आणि दुसरे कित्येक लोक त्या ठिकाणीं मिळाले होते. त्या जागीं हैलंदर लोकांच्या ज्या ओळी उभ्या होत्या तेथून आह्मीं फिरत फिरत जाऊन नंतर उपहार केला. त्या वेळेस ब्यागपैपवाला ब्यागपैप वाजवीत होता. व एका †हैलंदरानें तेथें तलवारी वरचा नाच केला. हा नाच असा आहे कीं, एकावर एक आडव्या दोन तरवारी ठेवितात, व त्यांवरून तरवारीस न शिवतां नाचणारा नाचतो. दुसरेही कित्येक जण रील नांवाचा नाच करीत होते.

पावणेचार वाजतां आह्मी दंकेल्द शहर सोडून पुढें जाण्यास निघालों. शहराच्या बाहेर आमची स्वारी पोहोंचे तोंपर्यंत हैलंदर लोक आमच्या

* हे आथोलचे माजी घूक.

† ह्या हैलंदराचें नांव च्यार्लस क्रिस्त, हा सांप्रत दचेस आफ् अथोल ह्च्या घरचा कारभारी आहे.

बराबर चालत होते. त्या शहरापासून *तेमीथ पर्यंत सर्व रस्ता मोठ्या शोभायमान प्रदेशांतून गेला आहे. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस डोंगरांची एक एक ओळ आहे. ह्या ओळ्यां पैकीं सर्वांहून उंच असे दोन डोंगर आहेत, त्यांचीं नांवें क्रेगईबार्न्स व क्रेगविनियन अशीं आहेत. क्रेगईबार्न्स हा डोंगर दन्केल्दाच्या पुढें उजव्या हातावर आहे; क्रेग्विनियन दन्केल्दा जवळच डाव्या हाताकडे आहे. त्यांतून ते नदी नागमोडीच्या वळणानीं सुंदर रीतीनें वहात गेली आहे. दोहों बाजूंचे डोंगर दाट झाडींनें भरलेले आहेत. दन्केल्दाहून नऊ मैलांवर बालनगार्द ह्मणून एक ठिकाण आहे, त्या ठिकाणीं आह्मी घोडे बदलले. एथपर्यंत लार्द ग्लेनलयनचे बंधू क्यापतन मरे हे घोड्यावर बसून आमच्या बरोबर आले होते. पुढें आह्मी चाललों तों अधिकाधिक उंच असे डोंगर दिसूं लागले, व आलबर्त्त साहेबांच्या ह्मण-

* आह्मी गेल्या आक्टोबरच्या ३ ऱ्या तारखेस लईज, मयत अथोलचे डूक यांची पत्नी, व मिस् माक्ग्रेगर ह्यांस घेऊन तेमीथ पहावयास गेलों होतों. त्या वेळेस त्या प्रदेशांतून परवानगीवांचून आमच्या गाड्या जाऊं दिल्या नसत्या, व आमची इच्छा तर आपली ओळख दुसऱ्यास देण्याची नव्हती, ह्मणून आह्मी आंत तिकडून जाण्याचा बेत रहित केला. आणि एका लहानशा किल्ल्याजवळ एक दरवाजा होता तेथें आह्मी गाडींतून उतरून त्या किल्ल्यांत गेलों. व ज्या माळ्याच्या घराजवळ आह्मी उतरलों होतों तेथल्या एका आऊनें आह्मास त्या किल्ल्यांत नेलें. परंतु आह्मी कोण हें त्या आऊच्या लक्षांत आलें नाहीं. आह्मीं बाहेर पडून त्या उंच स्थळावरून खालचा वाडा पाहिला त्या वेळेस धुकें अगदीं निवळून गेलें होतें, ह्मणून आह्मास सर्व स्वच्छ दिसलें. त्या ठिकाणीं चोवीस वर्षां पूर्वीं आमचा इष्ट लार्द ब्रेदालबन यानें मोठ्या डामडौलानें आमचें आगतस्वागत केलें होतें. त्या आगतस्वागताची बरोबरी आतां कोणाच्यानें करवणार नाहीं. तें ठिकाण मी कोणास नकळत न्याहाळून पहात होतें. तेव्हां माझ्या मनांत मोठे गंभीर विचार आले.

पहिल्या खेपेस मी आलें त्या वेळेस आलबर्त्त साहेबांचें व माझें वय तेवीस वर्षांचें होतें. आह्मी अगदीं तरूण व सुखी होतों, त्या वेळेस आमच्याबरोबर जी मंडळी होती, त्यां पैकीं आतां कितीएक जण मेले. तें ठिकाण पुनः मला पहाण्यास मिळालें ह्मणून मी ईश्वराची मोठी आभारी झालें. तें ठिकाण जशाचें तसेंच होतें. त्यांत कांहीं फेरफार झाला नाहीं.—१८६६.

ण्यांत असें आलें कीं, तेथील कांहीं कांहीं प्रदेश स्वितझरलंदांतील प्रदेशां सारिखे दिसतात. आजपर्यंत जे डोंगर आमच्या पहाण्यांत आले, त्यां पेक्षां फारच उंच असे डोंगर आह्मांस लांबून दिसूं लागले. बालनगार्द पासून नऊ मैलांवर आबरफेल्दी ह्मणून गांव आहे, त्या गांवाजवळ हे डोंगर आमच्या दृष्टीस पडले. हा गांव फार सुंदर आहे आणि एथले डोंगरही बरेच उंच आहेत. नंतर आह्मी पावणे सहा वाजतां तेमैथ एथें पोहोंचलों. तेव्हां वेशीपाशीं आह्मांस लार्द ब्रेदालबन ह्याच्या ताब्यांतील हैलंदर लोक सामोरे आले. तेमैथ हें शहर खोऱ्यामध्यें आहे, व त्याच्या सभोंवतीं मोठाले उंच व दाट झाडीनें भरगच्च झालेले असे डोंगर आहेत. ही जागा फारच रमणीय आहे. ऐथला वाडा ग्रानित दगडांचा असून केवळ किल्यां सारिखा मजबूद बांधलेला आहे. इकडे येऊन जी कांहीं शोभा दिसून आली ती सांगतां येत नाहीं. वाड्या पुढें लार्द ब्रेदालबन ह्यांच्या हैलंदर लोकांचा बराच जमाव असून ते ओळीनें उभे राहिले होते. .त्यांचा पोषाख क्याम्बेल तारतन नांवाचा होता. व त्या लोकांपुढें लार्द ब्रेदालबन हे स्वतः हैलंदराचा पोषाग करून त्यांजवर अग्रेसर होते. सर नील मेन्जीस यांचेही कांहीं लोक तांबडा व पांढरा मेनजीस तारतन नांवाचा पोषाग केलेले होते. त्यांच्या पुढें कांहीं लोक ब्यागपैप वाजवीत होते आणि हैलंदरांचें रेजमेंत ह्मणून ९२ वाव्यें रेजमेंत त्याची एक कंपनी घागरे नेसून उभी होती. तोफांचे गडगडाट, लोकांचे जयघोष, त्यांचे चित्रविचित्र पोषाग, तसेंच सभोंतालच्या प्रदेशांचें सौंदर्य, व मागल्या बाजूस दाट झाडीनें भरलेले पर्वत अशा मुळें ती सर्व शोभा अति उत्तम व अपूर्व रमणीय दिसत होती. त्या वेळेस आह्मांस असें भासलें कीं, जसा काय कोणी मोठा प्राचीन काळचा जाहागीरदार मोठ्या समारंभानें आपल्या प्रभूचें आगत-स्वागत करीत आहे. दृष्टी खालचा हा पसारा फार भव्य व अद्भुत रसात्मक होता. लार्द व लेदी ब्रेदलबन ह्यानीं जेव्हां आह्मांस माडीवर नेलें, त्या वेळेस जिन्या वर व दिवाणखान्यांत जागोजागीं हैलंदर लोक उभे होते.

तो जिना गाथिक तऱ्हेचा असून पाषाणी आहे, व मोठा सुंदर आहे; सर्व वाडा नवीन व शोभायमान अशा सामानानें सुशोभित केला आहे.

दिवाणखाना तर फारच शोभिवंत आहे. दिवाणखान्यांतून पुढें मधल्या घरांत व पुस्तकालयांत जाण्यास वाट आहे, व पुस्तकालयाच्या शेजारीं आमच्या खासगी एकांतीं राहण्याच्या खोल्या आहेत. आमच्या एकांताकरितां त्यांनीं आह्मांस दोन सजोड खोल्या दाखविल्या. त्यांतून आह्मी पुस्तकालयाच्या बाजूची जी लहान खोली होती तिचे उजव्या हाताकडची सजोड खोली पसंत केली. आठ वाजतां भोजन झालें. ह्या वाड्यांत ह्या वेळेस आमच्या खेरीज खालीं सांगीतलेली मंडळी आहे. ती येणेंप्रमाणें:—बुक्लु घराण्यांतील मनुष्यें. दोघे मंत्री दचेस आफ् सदरलंद आणि लेदी एलीजाबेथलिवेसन गवर,* आबरकार्न्स, राक्सबर्ग्स, आणि किन्नूल्स, ह्या घराण्यांतील मनुष्यें, लार्द लादरदेल, सर आन्थनी मेतलंद, लार्द लोर्ने,† फाक्स माल, बेल हेवन्स ह्या घराण्यांतील लोक, मिस्तर विलियम रसल व त्याची बायको, सर जे, व लेदी एलिझाबेथ व मीसिस प्रिंगल, आणि लेदी ब्रेदालबनवे बेली ह्मणून दोघे बंधू अशीं आहेत. जेवणाची खोली चांगली गाथिक तऱ्हेची आहे. तिच्यामध्यें आजपर्यंत कोणी जेवण केलें नव्हतें. तसेंच ज्या खोल्यांत आह्मी आहों, त्यांत आमच्या पूर्वी कोणी राहिला नव्हता. नंतर वाड्या सभोंवतालच्या जाग्यांत मोठी रोशनाई केली होती. ती अशी कीं, दिव्यांची रांग कठड्यांचे बाजूनें लाविली होती, आणि भूमीवर दिव्यांची अशी रचना केली होती कीं, ते दिवे पाहून "विक्तोरिया व आल्बर्त्त ह्यांचें स्वागत" हे शब्द दिसत.

तेथें जवळ जंगलांत एक लहानसा किल्ला आहे, त्यावरही रोशनाई केली होती. आणि जिकडे तिकडे डोंगराच्या शिखरावर आनंदसूचक अग्नि पेटविले होते. आह्माला वाटलें कीं, हें इंद्रभुवन दिसतें काय! तेथें जागोजाग सुंदर दारुकाम सुटत होतें. आणि शेवटीं हैलंदर लोक ब्यागपैपाचे नादावर त्या वाड्या पुढें मशालीचे उजेडानें रील नांवाचा नाच करीत होते. हा नाच ते पूर्णपणें जाणत आहेत. हे सर्व चमत्कार पाहून आमच्या मनास फारच आनंद झाला.

---

* ही बाई आतां दचेस आफ् आर्गेयल झाली आहे.

† हे आतां ड्यूक आफ् आर्गेयल झाले आहेत.

## मुक्काम तेमौथ, गुरुवार, सप्तेंबर ता० ८ वी, सन १८४२.

साडेनऊ वाजतां आलबर्त्त साहेब लार्द ब्रेदालबन यांच्या बराबर शिकारीस गेले. मी दचेस आफ् नार्फक ह्यांच्या बराबर ते नामक नदीच्या वरल्या आंगास जो रस्ता आहे, त्या रस्त्यानें फिरावयास गेलें. त्या नदीचें पाणी फार निर्मळ आहे व तें खळखळून फेनयुक्त होऊन दगडांवर आदळतें. नदीच्या मागल्या भागास उंच उंच डोंगर आहेत त्यांच्या योगानें नदीला शोभा येते. लार्द ब्रेदालबनचें दुभत्याचें घर आहे तेथपर्यंत आह्मी गेलों. तें घर स्विस्स लोकांच्या झोपडीचे तऱ्हेचें असून स्फटिक मण्यांनी बांधिलें आहे. घर फार स्वच्छ व सुंदर आहे. त्याच्या शिखरावरून लाखते नामें सरोवराची शोभा फार चांगली दिसते.

मग आह्मी गेलेल्या रस्त्यानेंच परतलों. आह्मी गेल्या पासून परत येई तों पर्यंत पर्जन्य पडत होता व कांहीं वेळ पर्यंत तर तो बराच मोठ्या झपाट्यानें पडला. आलबर्त्त साहेब साडेतीन वाजतां परत आले. त्यांना शिकार चांगली साधली. त्यांनी मारून आणलेली शिकार वाड्या पुढें टाकिली ती येणेंप्रमाणें :—एकुणीस हरणें, कित्येक ससे व फेजंत नांवाचे पक्षी व ग्रौस नामक पक्ष्यांच्या तीन जोड्या होत्या, एक घायाळ झालेला कापर कोलजी नांवाचा पक्षीही त्यांत होता. तो मी मागाहून पाहिला. तो फार मोठा सुंदर पक्षी होता.

आलबर्त्त साहेब आबर फेलदी जवळ गेले होते, ते तेथून परतून चालत चालत व शिकार मारीत मारीत घरीं आले. त्यांच्या बरोबर तीनशें हैलंदर लोक होते, व लार्द ब्रेदालबन स्वतः रान काढीत होते. पांच वाजतां आह्मी लेदी ब्रेदालबन व दचेस आफ् सदरलंद ह्याच्या बरोबर बाहेर गेलों. चालतांना लाखते नामें सरोवराचा कांहीं भाग आह्मी पाहिला. आणि लार्द ब्रेदालबनच्या अमेरिकन म्हशी व रेडे पाहिले.

## शुक्रवार, सप्तेंबर ता० ९ वी, सन १८४२.

नऊ वाजल्यावर पुनः आलबर्त्त साहेब शिकारीस गेले. ते गेल्यावर लौकरच मी दचेस आफ् नार्फक ह्यांजबराबर लोखंडी पुलावरून जाऊन ते नदीच्या कांठानें चारींतून पायरस्ता आहे त्याजवर गेलें.

बहुतेक दरवाज्यावर हैलंदर लोकांचे पहारेकरी आमच्या मागून नागव्या तरवारी घेऊन चालत होते. त्यामुळें प्राचीन काळचे सरकारी स्वारीप्रमाणें दिसलें.

मग तेथून त्याच रस्त्यावर एक लहानसें घर आहे तेथें आह्मी गेलों, तेथें एक ठेंगणी सुशील आऊ होती, तिचें वय सुमारें चाळीस वर्षांचें असावें. तिनें आह्मां दोघीं करितां कांहीं फुलें तोडून आणिलीं. तिला दचेस ह्यानीं कांहीं पैसे दिले, आणि पैसे देतानां ह्मणाल्या कीं, हे महाराणी कडून आले. हें ऐकून ती इतकी चकित झाली कीं, तसें चकित होतानां कोणासच मी पाहिलें नाहीं. ती लागलीच मजकडे येऊन मला मोठ्या उत्कंठेनें ह्मणाली कीं, आपली इकडील मजा आपणांस ह्या देशांत आलेल्या पाहून फार हर्षित आहे. नंतर मोठा पाऊस पडूं लागला, तरी आह्मी तशा चालतच गेलों. चालतांना नदींत एक स्त्री आपला झगा गुढग्यापर्यंत सांवरून बटाटे धुतांना पाहिली.

आह्मी घरीं पोंचल्या नंतर लगलाच पर्जन्य राहिला. तरीं वरच्यावर मोठाल्या सरी येतच होत्या. तीन वाजण्यास वीस मिनिटें कमी होतीं तों आलबर्त्त साहेब परत आले. पाणथळ रानांतून येतांना त्यांचे बरेच हाल झाले. त्यांस क्षणोक्षणीं दलदलींतून गुडघ्या इतकाला चिखल तुडवीत यावें लागलें. त्यानीं ग्रौसाच्या नऊ जोड्या मारून आणिल्या. नंतर आह्मी कांहीं फराळ केला, आणि दिवाणखान्यांत जाऊन खिडकींतून हैलंदर लोकांचा रील नाच पाहिला. सर्व वेळ पुष्कळ पाऊस पडत होता. किल्यांत नऊ असामी ब्यागपैप वाजविणारे होते, त्यां पैकीं कधीं एक व कधीं तिघेजण वाजवीत असत. ते आमचे न्याहरीचे वेळेस, न्याहरीच्या नंतर, पुनः फराळाचे वेळीं, आणि जेव्हां आह्मी बाहेर जात व परत घरीं येत होतों तेव्हां वाजवीत असत. पुनः जेवणाचे पूर्वी व बहुतेक जेवण आटोपे पर्यंत वाजवीत असत. आह्मां दोघांसही त्या ब्यागपैपाचा नाद फार आवडूं लागला आहे.

सवापांच वाजतां दचेस आफ् बुक्लू, आणि दचेस आफ् सदरलंद ह्यांज बराबर आम्ही गाडींतून फिरावयास गेलों. (लेदी ब्रेदालबन ह्यांच्या जिवास बरें वाटत नव्हतें ह्मणून त्या आमच्या बरोबर आल्या नाहींत.) लार्द ब्रेदालबन हे सर्व वेळ घोड्यावर बसून आमच्या पुढें चालत होते. आमचें फिरणें आह्मांस फारच आल्हादकारक झालें. पहिल्यानें आह्मी सरोवराचे

किनाऱ्याचे कांहीं भागावर चाललों, मग डोंगराचे खिंडींतून गेलों. तेथल्या प्रदेशाची रचना अगदी डोंगरी आहे; तेथें फार लहान लहान व ठेंगण्या झोंपड्या होत्या, व त्यांतून इतका धूर निघत होता कीं, त्यामुळें कांहींच दिसत नव्हतें. बेनलायर्स नांवाचा डोंगर आह्मी चांगला पाहिला, तो ४००० फुटी उंच आहे असें ह्मणतात, व त्याचे पुढें लांबून बेनमोर पाहिला. तसेंच ग्लेनलयन नांवाचा दरा आणि लयन नदी, आणि दुसरे सुंदर दरे पाहिले. साडेसात वाजतां आह्मी परत घरीं आलों. तेव्हां अगदीं अंधार पडला होता. आठ वाजतां आमचें भोजन झालें. लार्ड व लेदी रुथवेन आणि लार्ड व लेदी दंकन हीं इकडेसच भोजनास आलीं होतीं भोजन झाल्यावर सुमारें ९० लोक आले व मोठा नाच झाला. काद्रिल नांवाच्या नाचा पासून आरंभ झाला. त्या नाचांत मी लार्ड ब्रेदालबन ह्यांजबरोबर नाचलें, आणि आलबर्त्त साहेब दचेस आफ् बुक्लू ह्याचे बरोबर नाचले. नंतर रील नांवाचे पुष्कळ नाच झाले. ते नाच पाहून मौज वाटली.

### शनवार, सप्तेंबर ता० १० वी, सन १८४२.

सकाळीं आह्मी दुभत्याचे घरा पर्यंत पायीं चालून गेलों, मग तेथून परत आलों. आकाश निरभ्र असून हवा चांगली होती. काल व परवां दुर्दिन होतें. मी कांहीं वेळ पर्यंत लेदी ब्रेदालबन ह्यांज बेराबर गाडींत बसून चाललें; दुसरे सर्वजण पायीं चालले. नंतर मीही गाडींतून उतरलें, आणि आमच्यांतून प्रत्येकानें दोन दोन झाडें लाविलीं—एक फर व दुसरें ओक. मग पुनः गाडींत बसून सर्व मंडळीसहित सरोवरा पर्यंत गेलों, तेथें आह्मी नावेंत बसलों. लेदी ब्रेदालबन व दचेस आफ् सदरलंद आणि लेदी इलिजाबेथ ह्या तिघीजणी मात्र पाय रस्त्यानें गेल्या, बाकी सर्व मंडळी नावेंतून गेली. लार्ड ब्रेदालबन, दचेस आफ् नार्फक आणि दचेस आफ् बुक्लू ही मंडळी आमच्या बरोबर होती. दोघे ब्यागपैप वाजविणारे नाळी- वर बसून वारंवार आपलें वाद्य वाजवीत होते. मागाहून कांहीं दिवसांनीं माझ्या वाचण्यांत लेदी आफ् दी लेक नांवाचें पुस्तक आलें. त्यांत खालीं लिहिलेल्या ओंव्या आहेत, त्या ओंव्या वाचल्या ह्मणजे मला आमच्या पर्यटनाचें स्मरण होतें.

## ओव्या.

अतिवेगें सरोवरावर, प्राचीन हैलांदगान सुंदर।
उच्चस्वरें गाती मधुर, सप्रेमें शूर चालती ॥ १ ॥
पहापहा ते नाळेवरीं, भव्य वाजविती तुतारी।
सुंदर निशाणें असतीं करीं, समुद्रनीरीं लोळतीं जीं ॥ २ ॥

लाखतेच्या वरल्या बाजूस सरोवराचे शेवटाजवळ लार्ड ब्रेदालबन ह्यांचा आचमोर नांवाचा बंगला आहे, तेथपर्यंत १६ मैल आह्मी अवल्यांवर चाललों. त्याची तर फारच मौज वाटली. दोन्ही बाजूंचे किनाऱ्यांची शोभा फारच चांगली दिसली. बेनलायर्स डोंगर पाहिला. त्याच्या बाजूवरून लहान लहान पाण्याचे धबधबे पडत होते. त्याच्या जवळ दुसरे मोठाले डोंगर आहेत, त्यांजवर कोठकोठें झाडी लागली आहे. केनमोर नामें डोंगर लांबून दिसत होता. सरोवराचा प्रवाह वळण घेऊन जात आहे, तेथून मागें पाहिलें असतां फारच सुंदर शोभा दिसते. नावाडी लोकांनीं दोन गेलिक भाषेतील गाणीं गाइलीं तीं फार बेताल व विलक्षण होतीं. तीं शब्द कंठ्य असून मृदु होतीं. कपतान माक्दुगल यानीं सुकाण धरिलें होतें. ते माक्दुगल घराण्याचे मुख्य पुरुष होत, ह्यानीं आह्मास आपल्या पूर्वजांनीं राबर्त्त ब्रुस ह्याजवळून लढाईत घेतलेला खरा लार्नचा ब्रुच दाखविला. आकमोर बंगल्याचें ठिकाण व रचना फार सुंदर आहे. तेथें डोंगराच्या शिखरापासून तर अगदीं पायथ्या जवळच्या पाण्या पर्यंत झाडें लागून राहिलीं आहेत. व त्याच्या सभोंवताली पुष्कळ डोंगर आहेत, तेणेंकरून ती जागा फार मनोहर दिसते. तेथें आह्मी किनाऱ्यावर उतरलों, आणि त्या घरांत बसून फराळ केला. तो बंगला लहानसा असून फार चांगला आहे. हवाही चांगली स्वच्छ होती, तेथें पुनः आह्मांला हैलंदर लोक भेटले. आचमोराहून आह्मी तीन वाजून वीस मिनिटांनीं निघालों ते तेथें आह्मी पावणेतीन वाजतां पोहोंचलों होतों. लार्ड व लेदी ब्रेदालबेन हीं आमच्याशीं फार स्नेहभावानें वागलीं. आह्मी किलिनवरून आलों, तेथील डोंगरावरून एक मोठा ओढा मोठमोठाल्या दगडांतून वहातो, त्यामुळें जिकडे तिकडे पाण्याचे धबधबे पडतात.

पुढें ग्लेन दाकार्त नांवाच्या दऱ्या पासून अगदीं रानटी प्रदेश लागला. या दऱ्यांतून दाकार्त नदी वाहते. हिकडे अगदीं पाणथळ रान असून मोठमोठाले उंच डोंगर आहेत, ह्याखेरीज कांहींच नाहीं. तेथें आह्मांस एक लहानसें सरोवर आढळलें, त्याचें नांव लाराजीली आहेसें वाटतें. असें तें सरोवर अत्यंत रमणीय व घोर अरण्यांत आहे. असें पूर्वी कधीं आमच्या दृष्टीस पडलें नव्हतें. पुढें ग्लेन ओगल नांवाचा दरा आहे. हा दरा लांबच लांब आहे. तो पाहून कैबरपास नांवाची बारी हिच्या तसबिरीची आठवण होते. ह्या मोठाल्या उंच डोंगरांमधून बराच चढउतारीचा रस्ता आहे. आमच्या बरोबरचे शिपाई प्यादे जे पुढें गेले होते ते त्या उंचीवरून पाहिले तेव्हां अगदीं बाहुल्यासारिखे दिसले; आह्मी बेन वायर्लिकहीं पाहिलें. लाखअर्नहेद एथें आह्मी घोडे बदलले. ह्या ठिकाणा पर्यंत लार्ड ब्रेदालबन हे घोड्यावर बसून आमच्या बरोबर आले होते. एथें त्यांनीं आपला कारभारी (हैलंदचा पोषाक केलेला) आमच्या गाडीच्या मागें बसवून पाठविला. तेव्हां पासून पर्जन्य पडूं लागला तो सर्व वेळ तसाच पडत होता. आह्मी लाखअर्न सरोवराच्या कांठावरून गेलों, हें मोठें सुंदर व लांबच्या लांब सरोवर आहे. त्याचे सभोंवताली उंच डोंगर आहेत; परंतु हें सरोवर कांहीं लाखते सरोवरा इतकें लांब व मोठें नाहीं, आह्मी वळून सेंतफिलन्स जवळून गेलों. तथून ह्या सरोवराचा देखावा फार चांगला दिसला. त्याच्या किनाऱ्यावर एक अगदी तुटक मोठा खडक आहे व त्यावर हिरवी चार झाडी आहे; हें फार चमत्कारिक दिसतें.

आह्मीं ग्लेनार्तनी नांवाचाही डोंगर पाहिला. त्याजवर लार्द विलबी ह्यांचें मृगयावन आहे. कामरी एथें आह्मीं शेवटचे घोडे बदलण्याचे पूर्वी डुनिरा ह्मणून जी सर दि. दंदास ह्यांची जागा आहे तिजवरून गेलों. मग मिस्तर विलियमसन्ची जागा व सर दब्ल्यु. कीथमरे ह्यांची आकतरतेर नामें जी जागा आहे त्यावरून गेलों.

पुष्कळ विजयध्वज उभारले होते. आह्मी क्रीफ मधून गेलों; व सात वाजल्यावर थोड्या वेळानें एक उभा तरतरीत घांट चढून जाऊन द्रमंद क्यासल नामे किल्ल्यावर पोहोंचलों. लार्द विलबी ह्यांनी दरवाज्यापाशीं येऊन आमचें आगतस्वागत केलें, व आमच्या खोल्यांपर्यंत आह्मांस पोहोंचविलें.

खोल्या लहानच खऱ्या, परंतु मोठ्या सोईच्या आहेत. जेवणास लार्द व लेदी विल्लबी व त्यांच्या दोन कन्या व आमची मंडळी ह्या खेरीज दचेस आफ् सदरलंद, लेदी एलीझाबेथ एल. गोवर, लार्द व लेदी क्यारिंगतन, मिस्तर व मिस्त्रेस हीथकोत, दकृदि रिचल्यु, लार्द आसलस्तन्, मिस्तर द्रमंद व गार्डचे सरदार इतकी मंडळी होती.

## मुक्काम द्रमंद क्यासल,

### रविवार, सप्तेंबर ता० ११ वी, सन् १८४२.

आह्मी एथील बागेंत फिरलों. ही बाग खरोखर मोठी सुंदर आहे. प्राचीन फ्रेंच बागेसारिखे ह्यांत चबुत्रे बांधले आहेत. जुन्या किल्याचा कांहीं भाग व रस्त्याचे वरून बांधलेल्या मेहराबीचें काम अजून राहिलें आहे.

बारा वाजतां बसावयाचे दिवाणखान्यांत प्रार्थना झाली. एका तरुण धर्मोपदेशकानें प्रार्थना वाचली व फार सुंदर व सुरस व्याख्यान दिलें.

दोन प्रहरांपासून संध्याकाळपर्यंत मोठ्या झपाट्यानें पर्जन्य पडला. आपले लिहावयाचे कागद लिहिल्यावर "धी लेय् आफ् धी लास्त मिनस्त्रेल," ह्या कवितेचे पहिले तीन सर्ग आलबर्त्त साहेबांस मी वाचून दाखविले; तेणेंकरून आह्मां उभयतांसही फारच आनंद झाला. नंतर रिंदिंगरच्या हातचीं कांहीं जुनीं विलक्षण चित्रें काढलेलीं आह्मीं पाहिलीं. आठ वाजतां आमचें जेवण झालें. दचेस आफ् सदरलंद व लेदी एलिझाबेथ ह्या दोघीजणी निघून गेल्या. परंतु लार्द व लेदी आबरकार्न आणि लार्द व लेदी किन्नूल व त्यांची कन्या हीं सर्व आमच्या मंडळींत मिळालीं.

### सोमवार, सप्तेंबर ता० १२ वी, सन् १८४२.

आलबर्त्त साहेब सकाळीं पांच वाजतां उठून हरणाचे पारधीस गेले, व मी दचेस आफ् नार्फक ह्यांचे बरोबर पायीं फिरावयास गेलें.

सर्व हैलंदर ह्मणजे लार्द विल्लबीचे ११० लोक उभे केले होते. त्यांचे मुख्य अधिकारी मिस्तर विल्लबी व मेजर द्रमंद हे त्यांच्या पुढें उभे होते, मी लेदी विल्लबीचे बरोबर फिरत गेलें. जीं हत्यारें त्या सर्व लोकांनीं घेतलीं होतीं तीं सर्व लार्द विल्लबी यांचीं होतीं. त्यांत एक दुहेरी कब-

ज्याची तलवार होती, ती ब्यानकबर्नचे लढाईत जाऊन आलेली होती. दन्केल्द एथें ९०० हैलंदर लोक होते, त्यां पैकीं ५०० आथोलचे लोक होते. व दुसरे जे पहाऱ्यावर लोक होते, त्यां सुद्धां एकंदर १००० लोक होते असें माझ्या ऐकण्यांत आहे.

शेवटीं तीन वाजण्याच्या किंचित् पूर्वीं आलबर्त्त साहेब परत आले, त्यांस पाहून मला फार आनंद झाला. ते अगदीं उन्हानें काळवटलेले व बरेच थकले होते.* त्यांनीं एक सांबर मारून आणिला होता. ते ह्मणाले कीं, तो मारण्यास फारच मेहेनत व अडचण पडली. एका लहानशा शेतावरच्या घरांत त्यांनीं आपलीं वस्त्रें बदललीं. ग्लेनार्तनी ही जागा द्रमंद क्यासलहून दहा मैल आहे, तेथें आलबर्त्त साहेब गाडींत बसून गेले. क्याम्बेल आफमानी हे गृहस्थ एथें जवळच रहात होते ते आलबर्त साहेबांबरोबर गेले होते. आलबर्त्त साहेब ह्मणाले कीं, हे फारच चपळ आहेत. ही चमत्कारिक पारध लक्षांत येण्याकरितां आलबर्त्त साहेबानें चार्लस साहेबास* लिहिलेल्या पत्रांतील जें त्याचें वर्णन आहे त्याचा उतारा घेतों;—

"हरणाची पारध करणें ह्मटलें ह्मणजे खरोखर मोठें थकविण्याचें काम,"
"परंतु तसीच त्यांत मोठी कर्मणूकही आहे. त्याच्या मार्गे लपेन ह्मटलें तर"
"हिकडे एखादें झाड किंवा झुडूप हें कांहीं एक नाहीं. त्यांस चकविणें ह्मणजे"
"नेहमी अगदीं हुषार राहिलें पाहिजे. आपला वास वाऱ्या बरोबर त्याजकडे"
"पोहोंचणार नाहीं अशा ठिकाणीं टेंकडाखालीं कबरा पोषाग करून"
"हातांनीं व गुडघ्यानीं रांगत गेलें पाहिजे."

साडेचार वाजतां आह्मी लेदी विलबी व दचेस आफ् बुक्लु यांज बरोबर गाडींतून फिरावयास गेलों. पहिले मयत सर दि. बेर्द ह्यांच्या पत्नीचे फर्नतवर बुरुजांतून आह्मी गेलों. तेथें कांहीं वेळ गाड्या थांबविल्या. नंतर आबरकेरने ह्मणून मेजरमोरे ह्यांचें जें ठिकाण आहे तिकडे गेलों. तेथें मेजर साहेबानीं सुंदर वाडा बांधण्याचें काम चालविलें आहे, तें पहाण्याकरितां क्षणभर गाडींतून उतरलों व तेथून पुनः गाडींत बसून मोनीचे क्यांबेल आणि सर दब्ल्यु मरे ह्यांच्या ठिकाणावरून परत घरीं आलों. हैलंदचे डोंगरांची फार चांगली शोभा दिसली. आजचा दिवसही फार चांगला

*माझा सावत्र भाऊ प्रिन्स लिनिंगन जो १८५६ नांत मरण पावला तो.

निरभ्र होता. आठ वाजतां आमचें भोजन झालें. बेलहेवन, सेफतन, क्रेव्हन ह्या नांवाचे बडेलोक आणि मेनीचे क्यांबेल व दुसरे कित्येक लोक आमच्या पंक्तीस होते. भोजनोत्तर अणखी मंडळी आली. हैलंदी पोषाग करून बरेच लोक आले होते. रील नांवाचे पुष्कळ नाच झाले. मेनीचे क्यांबिल हे फार चांगले नाचणारे आहेत. आह्मीं एक गांवठी नाच नाचलों. मी लार्ड विलबी बरोबर नाचलें, आणि आलबर्त्त साहेब लेदी क्यारिंगतन ह्यांजबरोबर नाचले.

## मंगळवार, सप्तेंबर ता० १३ वी, सन १८४२.

आह्मांला लवकर निघावयाचें होतें ह्मणून आह्मी सात वाजल्यावर उठलों. आठांच्या पूर्वी न्याहारी उरकली आणि नऊ वाजतां निघालों, त्या-वेळीं अगदीं दाट धुकें आलें होतें. आह्मी जातांना लार्ड ग्लाथालन ह्यांच्या वाड्या जवळून गेलों आणि वृद्ध लेदी ज्या ठिकाणीं बसली होती, तेथें अंमळ खोळंबलों. आह्मी ह्या ठिकाणीं पोहोंचे पर्यंत लार्ड विलबी घोड्या वर बसून आमच्या बरोबर आले. नंतर पुढें लवकरच लिंद्रम नांवाची रोमन लोकांची चमत्कारिक छावणीची जागा आर्दाक एथें आहे तेथें आह्मी आलों. मी गाडींतच बसून राहिलें, परंतु आलबर्त्त साहेब खालीं उतरले त्यांस मेजर मोरे ह्यांनीं ती जागा दाखविली. ते असें ह्मणतात कीं, रोमन लोकांच्या कृत्यां पैकीं जीं हल्लीं उरलीं आहेत त्यांत फार चांगलें तें हेंच आहे.

आह्मीं ग्रीनलोनिंग एथें गाडीचे घोडे बदलले. मग दनब्लेन मधून गेलों. बारा वाजतां स्तरलिंग एथें पोहोंचलों. तेथें लोकांची खूप गर्दी झाली होती आणि त्या गांवांतील बिदी इतक्या अरुंद आहेत कीं, गर्दीत कोणाउ काय अपाय होईल ह्मणून धास्ती वाटत होती. बंदोबस्त चांगला ठेवला नव्हता. तेथची बीद किल्यापर्यंत तर अगदींच उभ्या चढणीची आहे. सर्व रस्त्यावर आमच्या पुढें पुष्कळ मंडळी पायानें चालली होती, आणि उष्मा फारच होत होता. ह्या किल्याची जागा मोठी विस्तीर्ण आहे. परंतु एदिन्बरो किल्याची जागा मला याच्याहून बरी वाटते. ह्यातोरे सर आरोचेबाल्द क्रिस्ती साहेब ह्यांनीं हिकडच्या सर्व वस्तु आह्मांस नीट दाखविल्या. दुसरा जेम्स राजा ह्यानें दग्लस साहेबास ज्या खोलींत ठार

मारलें, व ज्या खिडकींतून त्यास बाहेर फेंकून दिलें ती दाखविली. त्या खोलीची तक्तपोशी मोठी चमत्कारिक आहे. एथल्या बागेंत पंचवीस वर्षी मागें एक हाडांचा सांगडा सांपडला, तो दग्लस ह्याचाच असावा ह्यांत संशय नाहीं. एथल्या गच्चीवरून फार लांब पर्यंत दृष्टि पोंचते, परंतु धुकें इतकें दाट आलें होतें कीं, हैलंद्चे पहाड आह्मांस तेथून चांगले दिसले नाहींत. सर ए. क्रिस्ती ह्यांनीं आह्मांस ब्यानकबर्नचे लढाईची रणभूमि दाखविली आणि किल्याचे भिंती खालीं जवळचें टेंकड पाहिलें, त्या ठिकाणीं बायका उभ्या राहून भाले करोली पहात असत. त्या वेळचे बुरुज आहेत. आह्मी नाक्स साहेबाचें उपदेशासन पाहिलें.

नंतर आह्मी फालकर्क मधून गेलों, आणि मिस्तर फार्ब्स यांचें क्यालन्दरपार्क नावाचें जें ठिकाण आहे तेथें गार्डीचे घोडे बदलले. हे साहेब व सर मैकल ब्रुस हे दोघेजणही, स्तर्लिंग शहराबाहेर आह्मी पडलों तेथपासून घोड्यावर बसून आमच्या बरोबर आले. रस्त्यांत लार्ड जेतलंद यांची व आमची गांठ पडली, आणि लिन्लिथगो एथें पोहोंचण्याचे पूर्वी आह्मांस लार्ड होपर्तीन भेटले. लिन्लिथगो एथें आह्मीं घोडे बदलले. एथला मोठा राजवाडा आह्मीं पाहिला नाहीं. तो फार चांगला पहाण्या जोगता आहे, असें सांगतात. नंतर लौकरच ड्यूक आफ् बुक्लू आह्मांस भेटले; ते व त्याचे पुष्कळ रयत लोक दाल्कीथपर्यंत घोड्यावर स्वार होऊन आमच्या बरोबर आले. आह्मीं कर्कालिस्तन एथें घोडे बदलले, आणि शेवटाला एदिन्बरो शहरच्या वेशीबाहेर बदलले. एदिन्बरो शहरांत पुष्कळ लोक जमले होते, परंतु तेथें आमच्यानें खोळंबवलें नाहीं; आह्मी दाल्कीथ एथें साडेपांच वाजतां पोहोंचलों.

आजच्या दिवसीं ६५ मैलांची आमची मजल झाली. त्यामुळें मी अगदीं थकून गेलें होतें, आणि हिकडे सुखरूप पोहोंचल्यावर समाधान वाटलें.

**मुक्काम दाल्कीथ,**

**बुधवार, सप्तेंबर ता० १४ वी, सन १८४२.**

स्कातलंद देशांत आमच्या वस्तीचा आजचा शेवटवा दिवस आहे. हा देश वास्तविक फार रमणीय आहे, व हिकडून जाण्यास आह्मांस फार

वाईट वाटतें. आह्मी प्रातःकाळीं फिरावयास गेलों, व रिनेजन्स चालीचा सर्व ( ग्रीनहौस ) पाषाणी बंगला ड्यूक साहेबानें बांधिला आहे तो पाहिला. साडेतीन वाजतां आह्मी दचेस आफ् बुक्लू ह्यांजबरोबर बाहेर गेलों. तेव्हां कर्नल बुवरी मात्र आमचे बरोबर घोड्यावर बसून आले होते. आह्मी मेलविलपार्क नांवाचा रमणा व लोनहेद नांवाचें कोळसे काढणाऱ्यांचें लहानसें गांव आहे ह्यांतून रासलिन एथें गेलों. कोळसे काढणाऱ्यांचीं असलीं लहान गांवें दाल्कीथचे आसपास पुष्कळ आहेत.

आह्मी तिकडचे देवळा जवळ गाडींतून उतरलों. त्या देवळाचें काम अजून जशाचें तसेंच आहे. तें देवालय पंधराव्या शतकांत बांधलेलें होतें, त्याचें काम मोठें उमदें आहे. ह्या देवळांत लार्द रास्‌लिन यांच्या घराण्यांतलीं मेलेलीं मनुष्यें पुरीत असतात, ह्मणून त्या देवालयाची ते दुरुस्ती राखितात. त्या ठिकाणीं ( आजादिवस पर्यंत ) रास्‌लिन घराण्यांतील वीस सरदार त्यांच्या चिलखता सुद्धां गाडले आहेत. आह्मी त्या देवळांतून बाहेर पडलों तेव्हां दरवाज्याजवळ लोकांची फारच गर्दी झाली होती.

नंतर रास्‌लिन एथून निघून आह्मी हाथार्नदेन एथें गेलों. हेंही गांव नदीच्या वरल्या अंगास उंचवट्यावर सुंदर ठिकाणीं वसलेलें आहे. तेथेंही फार लोकांची गर्दी झाली होती, ती पाहून आह्मांस मोठें नवल वाटलें, कारण ते सर्व लोक आह्मांस पहाण्याकरितां रास्‌लिनहून धांवत आले असावे.

येथें आह्मीं खालीं उतरून एथल्या डोंगरामध्यें ज्या गुहा आहेत त्यांपैकीं ज्या कितीएक चमत्कारिक आहेत त्या पहाण्यास गेलों. त्या गुहांत सरआलेकझ्यांदर रामसे व त्यांच्या शूर लोकांची टोळी पुष्कळ दिवस छपून राहिली होती, आणि त्यांनीं शत्रूं पासून फार दिवस पर्यंत आपला संभाळ केला. दचेस बाई ह्मणाल्या कीं, असल्या गुहा रास्‌लिन पर्यंत नदीच्या कांठा कांठांनीं पुष्कळ आहेत.

मग आह्मी बानिरिंग ह्मणून जें दुसरें एक लहानसें कोळसे काढणाऱ्यांचें गांव आहे त्या गांवांतून व दालकीथ मधून परत घरीं आलों.

### गुरुवार, सप्तेंबर ता० १५ वो, सन १८४२.

साडेसात वाजतां आह्मीं न्याहारी केली आणि आठ वाजतां दचेस आफ् बुक्लू ह्यां सहवर्तमान निघालों. लार्द लिवरपुल व लार्द हार्दविक हे आमच्या

मागून आले. आमच्या संगतीच्या दुसऱ्या बाया व इकेरी पूर्वीच तारवावर चढले होते. आकाश अगदीं निरभ्र होतें. आह्मांस एदिन्बरो शहरांतून जावयाचें होतें, ह्मणून तिकडे चांगला बंदोबस्त राखला होता. गोंगाट व गर्दी अगदीं होऊं दिली नाहीं. आह्मी गाडींतून खालीं उतरून धक्यावर गेलों, व लागलेच त्रय्देन्त नांवाच्या आगबोटीवर चढलों. जनरल स्तीम न्याविगेशन कंपनी ह्या व्यापाऱ्यांच्या मंडळीची ती आगबोट होती. आह्मांस पोहोंचवावयास द्यूक व दचेस आफ् बुक्लू, लेदी जे. स्कात, एम्लिन घराण्याची मंडळी, लार्द कादर, आणि लेदी एम. क्यांबेल इतकी मंडळी आमच्या बरोबर आगबोटी पर्यंत आली होती. मग आह्मीं त्यांचा निरोप घेतला. द्यूक व दचेस ह्यांनी मनापासून आमचें आगत स्वागत केलें, ह्मणून आह्मीं दोघांनीही त्यांचे फार आभार मानले. वास्तविकच दालकीथ येथें आह्मी होतों तों पर्यंत आह्मांस अगदीं घरासारखें वाटलें.

पुढें जसजसा स्कातलंदचा सुंदर किनारा आमच्या नजरेपासून मागें पडूं लागला, तसतसें आमचें मनोरंजक पर्यटण आतां संपलें, असें मनांत येऊन आह्मांस मोठी खंती वाटली. ह्या स्वारीचा आह्मांस कधीं विसर पडणार नाहीं.

त्रय्देंत आगबोटींत रायल जार्ज आगबोटी पेक्षां जागा अधिक व मोठी सोईवार होती, व सामानही चांगलें नीट नेटकें होतें. तिजवर आदमिरल सर ई. ब्रेस, कम्यांदर बुलक ह्मणून एक वृद्ध मनुष्य मोठा गुलहौसी होता, व अणखी तिघे कामदार होते. रादामांथस आगबोट कांहीं नौकर लोक व गाड्या घेऊन रात्रीस निघाली, तिजबरोबरच शियर वातर नामें आगबोट निघाली, तिजवरून लार्द लिवरपुल व लार्द हार्दविक हे गेले.

सालमांदर नांवाची आगबोट (तिजवर मिस्तर व मिस्त्रेस आन्सन हीं होतीं), फीरलेस नांवाची आगबोट व रायल जार्ज नांवाचें गलबत हीं आमच्या बरोबरच निघालीं; परंतु आह्मांस वारा उलटा लागला ह्यामुळें रायल जार्ज गलबत आह्मांस लौकरच दिसेनासें झालें व थोड्या वेळानें मागून दुसऱ्याही आगबोटी त्या प्रमाणेंच दिसत नाहींतशा झाल्या. मानर्क नांवाची जनरल स्तीम न्याविगेशन कंपनीची आगबोटही बरीच चालली;

हिजवर आमचे कांहीं घोडे होते. ती बोट आमच्या बरोबरच निघाली, व तेवढीच आमच्या बरोबर चालली. आम्ही त्यांतालन क्यासल नांवाच्या किल्याजवळून गेलों. तो किनाऱ्या जवळचा किल्ला आतां अगदीं पडून गेला आहे. हा किल्ला ब्यासरक नमें डोंगराचे अगदीं जवळ आहे. हा सुंदर डोंगर त्यांतालन किल्याचे समोरा समोर आहे. तो हंस व सीगळ ह्या पक्ष्यांनीं अगदीं आच्छादून गेला होता. कारण त्यावर हजारों हंस व सीगळ हिकडून तिकडे व तिकडून हिकडे उडत होते, त्यामुळें तो सर्व पांढराच होऊन गेला होता.

दोन वाजतां सेंत आब्स हेद ह्मणून जें मख्यात भूशिर आहे, तें आह्मांस लागलें. हें भूशिर जाते वेळेस पहाण्याकरितां आम्ही फार उत्सुक होतों. मार्मिअन पुस्तकांतील कांहीं ओळी मीं वाचल्या, त्यांत होली ऐलेंद नामक क्षेत्रास कोणी बैरागणी यात्रेस गेल्या होत्या त्यांचें पर्यटनाचें वर्णन केलें होतें. त्या भूशिरावर जो पडका मठ आहे तो आम्ही पाहिला; नंतर ब्यांबरो क्यासल नांवाचा किल्ला आह्मांस लागला. त्याच्या कांहीं पुढें फर्न ऐलेंदस् नांवाचीं बेटें लागलीं. पहिल्यानें आम्ही ह्या बेटांवरून गेलों त्याच्या आदल्या दिवशीं रात्रीं बिचारी ग्रेसडालिंग वारली. हें ऐकून आह्मांस फार दुःख वाटलें.

### शुक्रवार, सप्तेंबर ता० १६ वी, सन १८४२.

पहाटेस साडेपांच वाजतां फ्लांबरोहेद हें भूशिर आह्मीं मागें टाकिलें. ब्याकईगल् आगबोट तर रात्रीं साडेआठ वाजतांच आह्मीं मागें टाकिली होती. प्रातःकाळीं बोटीच्या वरल्या मजल्यावर येऊन पाहिलें तों नुस्ता तिचा धूर मात्र कांहीं दिसत होता. साडेनऊ वाजतां मी आलबर्त्त साहेबाचे मागून बोटीचे मजल्यावर गेलें, त्यावेळेस आकाश चांगलें स्वच्छ होतें. तेथें आह्मीं काफी घेतली व कांहींवेळ हिकडून तिकडे फिरलों, तेव्हां आह्मांस समुद्राचें तीर दिसत नव्हतें, फक्त खालीं पाणी आणि वर आकाश दिसत होतें. सर्व दिवसभर आकाश अगदीं निरभ्र राहिलें. संध्याकाळीं पांच वाजतां आह्मीं रादामांथस आगबोट गांठली, ती दिवसभर आह्मांस दिसत होती. साडेपांच वाजतां मजल्यावरच बावटे लावून

एक तंबू केला होता, त्यांत बसून आह्मी सुंदर भोजन केलें. सुमारें पावणेसहा वाजतां यार मौथ नांवाचा बंदरगांव आह्मी मागें टाकिला. तें शहर अगदीं मैदानावर आहे. आलबर्त्त साहेब ह्मणाले कीं, हें केवळ फ्लेमिश् शहराप्रमाणें दिसतें. नंतर कांहीं वेळपर्यंत शुभ्र चांदण्यामध्यें आह्मी तारवाच्या मजल्यावर हिकडून तिकडे फिरलों, आणि समुद्रावर जें चंद्राचें बिंब पडलें होतें त्याची मौज पहात होतों.

साडेसात वाजतां आह्मी खालीं गेलों, आणि मी "धी ले आफ् दी लास्त मिन्सत्रेल" ह्या ग्रंथाचा चौथा व पांचवा सर्ग वाचला, तो आलबर्त्त साहेबानीं ऐकिला; नंतर कांहीं वेळ पियानो नामें वाद्य वाजविलें.

### शनवार, सप्तेंबर ता० १७ वी, सन १८४२.

पहांटेस सुमारें तीन वाजतां तोफांचे मोठे आवाज झाले, त्यांच्या योगानें आह्मी जागे झालों. ते आवाज ऐकून आह्मांस समाधान वाटलें, कारण त्यावरून आह्मांस असें समजलें कीं, नदीच्या तोंडा जवळच नोर ह्मणून जें ठिकाण आहे तेथें आह्मी येऊन पोहोंचलों. सहा वाजतां आह्मी ऐकिलें कीं, रादामांथस ही आगबोट नुकतीच आमच्या पुढें गेली, व ब्ल्याक ईगल् आगबोट येई तोंपर्यंत आह्मी सैथेंदा जवळ थांबलों होतों. हा दिवस चांगला होता खरा, पण थोडें धुकें होतें.

नदींतून जातांना आह्मांस चांगलीं चांगलीं सुंदर तारवें आढळलीं. दहा वाजून दहा मिनिटांनीं आह्मी लहान नौकेंत बसून किनाऱ्यावर जाऊन उतरलों. दचेस आफ् नार्फक, व मिस मातिलदा पाजेत व इकेरी हे आह्मांस तेथें भेटले; परंतु दुसऱ्या मंडळीविषयीं आह्मांस कांहीं कळलें नाहीं. सर जेम्स क्लार्क हे तर आमच्या बरोबर त्रायर्देत आगबोटींतच होते. आह्मी लागलेच गाडींत बसून रेलवे स्तेशनावर गेलों. नंतर साडेबारा वाजतां विन्‌जर क्यासल एथें पोहोंचलों.

# ब्लेर आथोलची खेप.

**सोमवार, सप्तेंबर ता॰ ९ वी, सन १८४४.**

आह्मीं पावणेसहा वाजतां उठलों व न्याहारी केली. नंतर आह्मी जाणार ह्मणून आईसाहेब आमची भेट घ्यावयास आली. तिच्या मागून आलिस व आमचें तान्हे मूल* ह्यांसही आमच्या कडे भेटण्याकरितां आणिलें. बिचारीं गरीब लेंकरें तीं. नंतर बरटी† भेटण्याकरितां आला. विकी‡ मुषाफरीचा पोषाग करून येऊन जाण्याविषयीं फार उतावीळ झाली होती, तिला बरोबर घेऊन सात वाजतां आह्मी रेलवेवर जाण्याकरितां निघालों. वैकौंतेस क्यार्निंग आणि लेदी क्यारोलेन काक्स§ ह्या दोघीजणी आमच्या बरोबर गाडींत आल्या. पाऊस पुष्कळ पडत होता. मग पुनः आह्मी प्यादिंगतन एथें आपले गाडींत बसलों, व वुलिच एथें नऊ वाजतां जाऊन पोहोंचलों. विकीला रेनाविक‖ नांवाच्या हवालदारानें सांभाळून लहान नौकेंत बसून गलबतावर नेलें. त्या हवालदारास ह्याच कामाकरितां आह्मीं आपल्या बोटीवर घेतलें होतें. लार्द लिवरपूल, लार्द आबर्दीन, आणि सर जेम्स् क्लार्क हे आह्मांस गलबतावर भेटले. सर राबर्त्त पील हेही आमच्या बरोबर यावयाचे होते; परंतु त्यांची धाकटी मुलगी फार आजारी होती, म्हणून त्यांचें येणें झालें नाहीं.

**मुक्काम ब्लेर आथोल,**

**बुधवार, सप्तेंबर ता॰ ११ वी, सन १८४४.**

सहा वाजतां आह्मी शोध केला, तेव्हां आह्मांस कळलें कीं, आह्मी दंदी

---

* प्रिन्स आलफ्रेद त्यावेळेस सवा महिन्याचें लेकरूं होतें.

† प्रिन्स आफ वेल्स यांचें नेहमीचें घरीं हाक मारण्याचें नांव.

‡ विक्तोरिया प्रिन्सेस् रॉयल.

§ आतां लेदी सि. कोर्तनी या नांवानें प्रख्यात आहेत.

‖ त्यास आतां पेनशन मिळालें आहे, १८५४ नांत त्यास जेनतलमन पोर्तरची जागा मिळाली. तो फार चांगला चाकर आहे. त्याची जन्मभूमि ब्यालाशील्स ही आहे.

बंदरांत पोहोंचलों. आलबर्त्त साहेब आमचे बरोबर जे दुसरे गृहस्थ होते त्यांस जाऊन भेटले. त्यांचे सफरींत बरेच हाल झाले होते. मंगळवारीं रात्रीं त्यांचें जहाज वादळांत सांपडलें होतें. दंदी हें मोठें शहर आहे. तेथलें बंदर मोठें असून मोकळें आहे; शहराचें ठिकाण मोठें रमणीय आहे; परंतु शहर कांहीं चांगलें नाहीं. तेथील प्रावस्त ह्मणून अधिकारी व दुसरे कांहीं गृहस्थ आमच्या गलबतावर आले, त्यांच्या मनांतून आह्मी कांहीं अवकाशानें किनाऱ्यावर उतरावें असें होतें; परंतु ह्या गोष्टीचा बंदोबस्त आह्मी केला. साडेआठ वाजतां आह्मी आपल्या लहान नौकेंत बसलों, आमच्या बरोबर विकी व आमच्या स्वारीच्या बाया व गृहस्थ होते. त्या वेळेस समुद्राचें पाणी अगदीं चकचकीत व निर्ळें झालें होतें, त्यांतून आमची लहान नौका फार चांगली नाचत गेली. पुढें आह्मी सुमारें पाव मैल वल्हीं मारीत गेलों.

आह्मांस किनाऱ्यावर उतरण्याकरितां एक सुंदर जिना केला होता त्याजवर तांबडें कापड लाविलें होतें; आणि तेथें लोकही पुष्कळ जमले होते; परंतु बंदोबस्त इतका चांगला ठेविला होता कीं, गर्दी अगदीं झाली नाहीं. आमच्या करितां जो लांकडी मंचक केला होता त्याच्या खालच्या आंगास माजिस्त्रेत मात्र उभे होते. मी आलबर्त्त साहेबांच्या हातांत हात घालून वर चढून गाडी पर्यंत चालत गेलें. आमची विकी त्यांचा हात धरून चालली. सभोंवताली लोक मोठ्यानें जयजयकार करीत होते, तरी आमची विकी बिलकुल घाबरून बुजली नाहीं; ती मोठ्या पोक्त बाईसारिखी डौलानें चालली होती. आह्मी आपल्या गाडींत बसलों, व रेनाविक ह्यानें विकीला उचलून आमच्या मागच्या गाडींत तिची दाई व शिक्षकीण बाई ह्यांच्या जवळ बसविलें.

दंदी शहरांत पुष्कळ लोकांचा जमाव झाला होता, व बंदोबस्त फार चांगला राखला होता. आणि जर नेहमीप्रमाणें आमच्या गाडीबरोबर वीस मनुष्यें धावूं लागलीं नसतीं, तर मुळींच गर्दी होती ना. परंतु हे धांवतांना पाहून दुसऱ्या कित्येकांस धांवावें लागलें. दंदी पासून सुमारें तीन मैलांवर लार्ड क्यांपरदौन यांच्या दरवाज्या जवळ आह्मी खोळंबलों. त्या ठिकाणीं विजयध्वज उभारले होते. लेदी क्यांपरदौन व लेदी दंकन् व त्यांचा लहान मुलगा, व दुसरी मंडळी आमचें आगतस्वागत करण्याकरितां वाट पहात उभी होती. ते सर्व आमच्या बरोबर मोठ्या ममतेनें व

सभ्यतेनें बोलले. लेदी दंकन्च्या लहान मुलानें सुंदर हैलंदी पोषाग केला होता. त्यास पुढें आणिलें, व त्यानें विकीला फुलें व फळें यानीं भरलेली एक परडी दिली. मी आलबर्त्त साहेबांस ह्मणालें कीं, ह्या प्रवासांत आपल्या बरोबर आपलें लेंकरूं आहे, असें माझ्या मनांत अगदीं येत नाहीं. विकीला पाहून मी लहान प्रिन्सेस (राजकन्या) होतें तेव्हांची मला आठवण होते. त्यावर आलबर्त्त साहेब ह्मणाले कीं, लेंकरें झालीं ह्मणजे त्यांचे आईबापांस पुनः आपण लेंकरेंच आहों असें वाटूं लागतें. असें वाटण्या पासून मोठें समाधान होतें, असें जें ह्मणतात तें खरें आहे.

एथपासून कुपारआंगस ह्या पर्यंत प्रदेश चांगला लागवडीचा आहे. एथून लांबचे पहाड दिसतात. हिकडचे हंगामाचे दिवस नुक्तेच सुरू झाले आहेत व पीक फार चांगलें आलें आहे. जिकडे तिकडे इंग्लंदापेक्षां अधिक हिरवें चार झालें आहे. हा आमचा प्रवास फारच सुखाचा झाला. ह्या मुलखाचा देखावा फारच रमणीय आहे. हा इंग्लंद-च्याहून अगदीं भिन्न आहे. हिकडचीं घरें दगडाचीं आहेत, व लोकही तऱ्हेवाईक, त्यांचे केंश भुरकट, व गालफडें उंच, मुलांचे केंश सडक, व लांब आणि पाय उघडे असतात. लहान लेकरें हैलंदी घागरे नेसतात. दन्केल्दा जवळ व जसजसें पुढें हैलंद प्रांतांत जावें तसतसे चांगले सुंदर चेहरे दिसतात. मुली ज्या बंड्या घालतात त्या फार चांगल्या मौजेच्या दिसतात. हिकडील पुरुष, बायका व मुलें हीं चांगलीं सदृढ व निरोगी दिसतात.

कुपारआंगस हें लहानसें खेडें दंदीहून चौदा मैल आहे. तेथपासून पर्थशायर प्रांताचा आरंभ होतो. आह्मी ऐला नदी उतरून गेलों, तेव्हां मला माझ्या ईस्ला नांवाच्या लहान्या कुत्र्याची आठवण झाली. सुमारें पांच सहा मैल पर्यंत आह्मांस चांगला रमणीय व किंचित खडबडीत रस्ता लागला. ग्रांपियन डोंगर लांबून दिसत होते; नदीच्या पलीकडच्या सुंदर प्रदेशांत बर्नमवुद ह्मणून बन आहे, तें व सर दब्ल्यु. स्युवर्त ह्यांची हवेली आहे ती आह्मी पाहिली; तिकडील सर्व देखावा पाहून आलबर्त्त साहेबांस मोठें समाधान वाटलें. तें सृष्टिसौंदर्य, डोंगरांची शोभा, व निर्मळ हवा ह्यांच्या योगानें त्यांस फारच आनंद झाला.

वाटेनें जात असतां आह्मी मोठी मौज पाहिली, जागोजाग दंकेल्द शहर दृष्टीस पडलें, लवणांतून वाहत असतां ते नदी दिसली. नदीवरचा पूल व शहरांतील काथीद्रल (मुख्य देवालय) हीं दिसलीं, व शहराचे आसपास झाडांनीं व्यापलेले पहाड हे दृष्टीस पडले. ह्या सर्व गोष्टींची शोभा फार चमत्कारिक वाटली. दंकेल्द एथें एका सराईत आह्मी उतरलों, ती लहान होती खरी तरी निर्मळ होती. विकीला रसा प्यावयाचा होता ह्मणून तेथें कांहीं वेळ थांबलों. आहाहा! खिडकींतून किती उत्कृष्ट शोभा दिसली! त्या खिडकींत उभें राहून विकीनें बाहेरचे लोकांस सलाम केला. हिच्या सारिखें सुखानें प्रवास करणारें दुसरें कोणी नसेल. ती आपल्या वेळच्या वेळीं गाडींत निजते. गर्दी, गोंगाट झाला तरी ती भिऊन घाबरत नाहीं. तिला त्याची मौज वाटून ती खूष होते. आह्मी तारवावर होतों त्यावेळेस रात्रीं जो नांगर सोडीत, तो तिनें कधींच ऐकला नाहीं; त्यावेळेस ती अगदीं गाढ निद्रेत असे.

दंकेल्द हें ब्लेरहून २० मैल आहे व कुपार आंगसहून १५ मैल आहे. तें शहर सोडून आह्मी थोडे पुढें गेलों नाहीं तों लार्ड ग्लेन्लयन गाडींत बसून येत होते ते आह्मांस भेटले. ते लागलेच खालीं उतरले, व तेथून घोड्यावर बसून ब्लेर पर्यंत आमच्या बरोबर आले. तो रस्ता फारच सुंदर आहे. पुढें सहा मैलांवर बनांत डाव्या बाजूस किनेर्दहीस ह्मणून जो वाडा आहे तो आह्मांस दिसला; तेथें लेदी ग्लेन्लयन रहात असे. (ती बाई लार्ड ग्लेन्लयनची आई, सुमारें दोनतीन महिन्यांमागें मरण पावली.) पुढें लागिरेत नामें टोंकावरून आह्मी गेलों. तेथें जुन्या काळच्या एका किल्याचा मलमा आहे. पूर्वी तेथें आथोलचे ड्यूक ह्यांची रिग्यालिती कोर्त ह्मणून कचेरी होत असे. मुलिनर्न एथें आह्मांस आथोल ब्रोज नांवाचा खाण्याचा पदार्थ आमच्या गाडी जवळ आणून दिला, त्यांतील कांहीं आह्मी खाला.

पित्लोखी ह्मणून एक लहानसें खेडें लागलें. मिस्तर बतर ह्यांचें फास्कली नांवाचें ठिकाण हें आमच्या डाव्या बाजूस राहिलें. नंतर आह्मी किलित्रांकी नामक घाटापर्यंत पोहोंचलों. तो घाट मोठा शोभिवंत आहे. त्या घाटांत रस्त्याला वळणें फार आहेत, व त्यावरून खालीं पाहिलें

असतां पुष्कळ खोल पर्यंत दोन्ही बाजूनें दाट झाडी लागून गेली आहे असें दिसतें, व त्यांतून गारी नदी वहात आहे. त्याची जी शोभा दिसते तिचें मला वर्णन करितां येत नाहीं. आलबर्त्त साहेबांस ती शोभा पाहून फारच आनंद झाला. उजव्या बाजूस मिस्तर म्याकईनराय ह्यांचें लूद ह्मणून फार सुंदर ठिकाण आहे; किलित्रयांकी घाटापासून ब्लेर आथोल सुमारें चार पांच मैल आहे. लार्द ग्लेनलयन ह्यांनीं नवा रस्ता केला आहे. त्यांचा वाडा पांढरा शुभ्र व साधाच असून फार मोठा आहे. त्याच्या सभोंवतीं उंच उंच पहाड आहेत ते दिसतात. लार्द व लेदी ग्लेनलयन ह्यांनीं आपल्या लहान मुला सहवर्तमान खालीं दरवाज्या पर्यंत येऊन आमचें आगतस्वागत केलें. व आमच्या करितां तयार केलेल्या खोल्यांत आह्मांस नेण्याकरितां तेथपर्यंत ते आमच्या बरोबर आले व आह्मी खोलींत गेल्यावर मागें गेले.

**मुक्काम ब्लेर क्यासल, ब्लेर आथोल,**
**गुरुवार, सप्तेंबर ता० १२ वी, सन १८४४.**

आह्मी सुमारें दोन तास पर्यंत मजेनें पायीं फिरावयास गेलों. त्या पासून आह्मांस फार सुख वाटलें. घराबाहेरचा देखावा अगदीं जंगली आहे, तो पाहून जिवास फार समाधान होतें. घरांतून बाहेर पाऊल टाकलें कीं सभोंवतालचे सुंदर पहाड दिसतात. आह्मी डाव्या बाजूस अबाळी मुळें नासलेल्या रमण्यांतून गेलों, मग बनांतून, व पुढें मोठ्या चढावाचा व नागमोडीचा रस्ता लागला, त्या रस्त्यानें गेलों. त्या रस्त्या खालून एक ओहोळ झपाट्यानें वहात होता. स्कातलंदांतील ओहोळांत पुष्कळ गोटे आहेत व पाणी अगदीं निवळ शंख आहे, ह्मणून ते फार सुंदर दिसतात, झाडां मधूनच्या फटी, व जंगलाची दाट छाया व किनाऱ्या वरचे शेवाळ, वाढलेले दगड व स्लेटीचे दगड हीं पाहून मोठी मौज वाटते. प्रत्येक वळणास पहावें तों नवेंच स्वरूप दिसतें. आह्मी बरेच उंच गेलों होतों तरी शिखरापर्यंत आमच्यानें जाववलें नाहीं. त्या वेळेस आलबर्त्त साहेब फार आनंदांत होते. त्यांच्या मनाचा उत्साह पाहून मलाही सुख वाटलें. आह्मी अधिक उंच रस्त्यानें मागें आलों, मग (फाक्तर) कार-

भाऱ्याचे घरीं गेलों. तें घर आह्मी ।जिकडून फिरून आलों त्याही पेक्षां उंचावर आहे. लार्ड व लेदी ग्लेन्‌लयन ह्यांनीं ब्लेर वाडा आमच्या स्वाधीन करून कारभाऱ्याचे घरांत राहत आहेत. त्याच्या पुढें एका शेता-वर आह्मी पायीं गेलों. त्या शेतांत कांहीं बायका जमून ओत धान्याची कापणी करीत होत्या. आमचे समोर डोंगर होते त्यांची शोभा आह्मांस फार वाटली. आह्मी विंजर एथें नेहमी पायीं फिरत असतों; आणि फिर-ण्याची जागा चांगली सुखदायक आहे, तरी तेथली शोभा एथल्या शोभेहून भिन्नच आहे. एथें आल्यावर आह्मांस फार सुख झालें. आलबर्त्त साहेब ह्मणतात कीं, एथल्या हवेनें जी विश्रांति होती, ती फार दिवस राहते. पुढें आह्मी एका मळ्यांतून एका फिरावयाच्या ठिकाणीं गेलों, तेथून मोठी रमणीय शोभा दिसते. कृत्रिम पदार्थांची शोभा व अकृत्रिम पदार्थांची शोभा ह्या एके ठिकाणीं दृष्टीस पडतात ही मोठी मौज आहे.

चार वाजायाच्या सुमारास आलबर्त्त साहेबानें एका तट्टू जोडलेल्या फैटन गाडींतून मला बाहेर फिरावयास नेलें. सुमारें सहा वाजे पर्यंत आह्मी फिरत होतों, आहाहा! काय सुंदर ती सहल झाली. आपल्या तट्टूचे गाडींत बसून दोन अडीच कोसांच्या आंतच इतकी सुंदर वन्य शोभा पहाणें फारच आनंदकारक आहे. गारी नदीस मिळालेल्या तिल्त नदीच्या वर जें रान आहे, त्यांतून ग्लेनतिल्त नामें दऱ्यांतून फिरत गेलों; आणि तें रान टाकल्यावर आमच्या समोर जो सुंदर व शोभिवंत देखावा दृष्टीस पडला, त्याचें काय वर्णन करावें! उंच बेनीग्लो नामक डोंगर नीट आमच्या समोर होता, त्याच्या पायथ्याशीं तिल्त नदी वळण घेऊन दगड व स्लेटी ह्यांवरून खळखळत वाहत होती, व त्याच्या बाजू सुंदर वृक्षांनीं अगदीं आच्छादून गेल्या होत्या. त्याच्यावर सूर्याचे किरण पडले होते. हवा किती स्वच्छ व मोकळी होती! सारांश, तो देखावा अवर्णनीय आहे, व त्या पासून आह्मांला जें सुख झालें तेंही अवाच्य आहे.

आहाहा! सृष्टि सौंदर्याची बरोबरी कशाच्यानें बरें होईल? त्या पासून किती सौख्य होतें! आलबर्त्त साहेबाला ही पाहून जो आनंद झाला तो त्यांच्या पोटांत सामावेना. ही सृष्टिशोभा पहाण्याची आवड त्यांच्या प्रिय पित्या पासून चालत आली आहे.

आह्मी मारबल लॉज ह्मणून जें राखणदाराचें घर आहे, तेथपर्यंत फिरत गेलों व पुनः त्याच रस्त्यानें मागें आलों.

**सोमवार, सप्तेंबर ता० १६ वी, सन १८४४.**

साडेतीन वाजतां आमचा फराळ झाल्यावर आलबर्त्त साहेबानें मला ब्रुअरचा धबधबा पहाण्याकरितां गाडींत बसवून नेलें; तेव्हां लार्ड ग्लेनलय आमच्या बरोबर घोड्यावर बसून आले होते. आह्मी वाटेवर गाडी सोडली, आणि वरच्या धबधब्या पर्यंत पायीं चालत गेलों, व तसेच पुढें पायवाटेनें पलीकडचे बाजूस गेलों, ती सर्व प्रदक्षणा तीन मैलांची आहे, व चढाव अगदीं उभा तरतरीत आहे. प्रत्येक वळणावरून जोरानें पडणाऱ्या धबधब्याची शोभा फार चमत्कारिक दिसते, आणि मागें पाहिलें तर ते पहाड, व त्यांच्यावर पडलेलें स्वच्छ ऊन, आणि त्यांच्या खालून वाहाणारा स्वच्छ ओहोळ हींही फार चमत्कारिक दिसत होतीं. वरून पाण्यांत दगड टाकला ह्मणजे काय चमत्कार होतो, तो पहाण्याकरितां आह्मी कांहीं दगडही खालीं टाकले. ह्या धबधब्याचे सभोंवतालीं जीं झाडें आहेत, तीं माजी ड्यूक आफ् आथोल यानी बर्न्सचे अर्जी* वरून लाविलीं.

संध्याकाळची वेळ फारच शोभिवंत होती. परत येतांना आह्मी पहाड व दरे ह्यांची क्षणोक्षणीं नवनवी शोभा पाहून यथेच्छ नेत्रसौख्य घेतलें. डोंगरांचे शोभेंत मुख्य चमत्कार हाच कीं, ती वरचेवर बदलत असते, असें आलबर्त्त साहेब ह्मणाले. नंतर आह्मी साहा वाजतां घरीं येऊन पोहोंचलों.

**मंगळवार, सप्तेंबर ता० १७ वी, १८४४.**

पावणेचार वाजतां आह्मी बाहेर फिरावयास गेलों, आलबर्त्त साहेब गाडी हाकावयास बसले होते. लार्ड ग्लेन्लयन व कांहीं बाया आमच्या मागून दुसऱ्या गाडींतून आल्या. आह्मी किलीत्र्यांकी ह्मणून घाट आहे तेथ पर्यंत गेलों, त्या वेळेस त्या घाटाची उत्कृष्ट शोभा दिसली. तो घाट झाडींनें अगदीं बंद होऊन गेल्याप्रमाणें दिसला, तेव्हां कोणासही आतां आपण बाहेर कोठून पडूं हें कळेना. आह्मी पुलावरून उजवेकडे गेलों,

* ब्रुअरवातर ह्यानीं "मोठ्या नम्रतेनें नेक नामदार ड्यूक आफ् आथोल ह्यांस अर्जी" केली होती ती.

तेथून घाटाच्या दोन्ही बाजू व पायथ्या जवळची वाहणारी ग्यारी नदी ह्यांची फारच शोभा दिसली. त्या पुलाचे पलिकडे कांहीं अंतरावर गेल्यावर आह्मी गाडींतून उतरलों आणि सुमारें अर्धकोस तमल नदीच्या धबधब्या पर्यंत चालत गेलों. ह्या नदींत सालमन मासे फार चांगले असतात अशी प्रख्याती आहे. हा धबधबा ब्रुअरचे धबधब्या इतका चांगला किंवा इतका उंच नाहीं. आह्मी साडेसाहा वाजतां परत घरीं आलों, त्या वेळेस दिवस मावळत होता, व प्रकाशाची शोभा मोठी होती.

आमच्या खिडकीचे खालींच दोन सांबर झुंजत होते, ते आह्मीं पाहिले; ते कुंपणांत कोंडलेले आहेत त्यामुळें नेहमी डरके फोडतात.

### बुधवार, सप्तेंबर ता० १८ वी, १८४४.

नऊ वाजतां एका डोंगरावर जाण्याकरितां आह्मी तट्टांवर बसून निघालों. आलबर्त्त साहेब जरद्या तट्टावर बसले व मी कबऱ्या तट्टावर बसलें; त्या वेळेस सांदी म्याकअरा नामें जो लार्द ग्लेनूलयन ह्याचा हुषार चाकर तो मात्र आमच्या बरोबर हैलंदी पोषाग करून आला होता. आह्मी मागल्या अंगणांतून निघून व मोठा रस्ता ओलांडून डाव्या बाजूस नदी उतरून गेलों. सांदी ह्यानें माझा तट्टू हातीं धरून पुढें चालविला, व आलबर्त्त साहेब माझे मागोमाग आले; नदी उतरतांना सांदीचे गुडघ्याचे वर पाणी लागलें, नंतर आह्मी तलख नामें डोंगरावर गेलों. पहिल्यानें तर कोबीच्या शेतांतून अगदीं उभ्या चढणीचा रस्ता लागला, परंतु पुढें वांकडें वांकडें जाऊन माथ्यापर्यंत गेलों. आमचीं तट्टें दगडाधोंड्यांतून गेलीं, परंतु त्यांचें एकही पाऊल वांकडें पडलें नाहीं. तेथून सभोंवतालचा देखावा सूर्याच्या किरणामुळें फार सुंदर लखलखीत दिसत होता. आह्मी अगदीं शेवटच्या शिखरापर्यंत गेलों होतों. तें शिखर खालून किंवा घरांतून दिसत नाहीं. एखादें पानोरामा यंत्रांतुन पाहिलें असतां जशी रचना दिसते तशी एथून दिसली. एथून ब्रुअरचे धबधबे, बेनी हात, बेन व्राकी, बेनीग्लो, किलीक्र्यांकीचा घाट, व दुसरे बाजूस लांब लांबचे डोंगरांच्या ओळी ह्या दिसतात. हे डोंगर खालून मुळींच दिसत नाहींत. तेमीथचे कडे पाहिलें असतां, ब्लेर पासून पहिल्या टप्यावर दलनाकार्दाख ह्मणून जें ठिकाण आहे तें दिसतें. आह्मी ज्या उंच स्थळावर उभे होतों

तेथून तर ब्लेर व तेथील घरें, लहान लेकरांच्या खेळण्याप्रमाणें दिसत होतीं. त्या जागीं आह्मांस अद्भुत चमत्कार वाटला. तेथें आह्माजवळ त्या हैलंदरा खेरीज दुसरें कोणी नव्हतें. तो मात्र आमच्या मागें तट्टास धरून उभा होता. (कारण आह्मी दोन वेळा तट्टांवरून खालीं उतरून पायानें चाललों). तेथें एक देखील घर नव्हतें किंवा चिट पाखरूंही नव्हतें. हैलंदरचीं मेंढरें मात्र दिसत होतीं. त्यांचीं तीं शिंगें व तीं काळीं तोंडें किती सुंदर दिसत होतीं. सुंदर डोंगरांनीं वेष्टित अशा तुल-कच्या अगदीं शिखरावर आह्मी होतों.

आह्मी गेलों त्याच रस्त्यानें परत आलों, व उताऱ्यावर नदी उतरण्या पूर्वी जरा थांबून तट्टांस पाणी पाजिलें. वेशीच्या आंत गेल्यावर आह्मी उतरून पायीं चाललों व साडे अकरा वाजतां घरीं परत आलों. ही आमची सहल फारच चमत्कारिक आनंदकारक झाली. अशी सहल कधींच झाली नव्हती. असा डोंगर मी कधीं चढलें नव्हतें. आजचा दिवस केवळ सुदिन होय. तलखचा पहाड तर चारीनें आच्छादून गेला होता ह्मणूनच त्यावरून चालण्यास सुख व आनंद वाटला.

**बृहस्पतवार, सप्तेंबर ता० १९ वी, १८४४.**

दोनप्रहरीं फराळ झाल्यावर आलबर्त्त साहेब लागलेच हरणाच्या पार-धीस गेले आणि तीं डोंगरावरून खालीं उतरतील तें पाहण्याकरितां मी त्यांच्या मागून जावें असें ठरलें. चार वाजतां लेदी ग्लेन्लयन व लेदी क्यानिंग ह्यां सहवर्त्तमान मी ग्लेन्तिल्तच्या गाडीवाटेनें निघालें. मिस्तर आस्वाल्द व लार्ड चार्ल्स वेल्सली हे आमच्या बरोबर घोड्या-वरून आले. रस्त्याच्या शेवटास आह्मी थांबलों व बनांतून बाहेर गेलों नाहीं. सांदी (आमचा चाकर) हरणाची वाट पाहत टपत राहिला होता. कांहीं वेळानें त्यानें आह्मांस गाडींतून बाहेर उतरून रस्त्यावर यावयास सुचविलें, तों आह्मांस टेकडीच्या कड्यावर कांहीं हरणें दिसलीं. नंतर आह्मी जमिनीवर बसल्यावर लेदी क्यानिंग व मी सभोंवतालच्या देखाव्याचा नकाशा काढूं लागलों; आणि सांदी व मिस्तर आस्वाल्द हे चारीवर पडून दुर्बीणींतून हरणाची वाट पाहत राहिले. त्या उभयतांनीं हैलांदी पोषाग केला होता, तो असा कीं, कबऱ्या कापडाचें कुडतें व बंडी, कमरेला घागरा

व डोक्याला बानेट नांवाची टोपी होती. कांहीं वेळ वाट पाहिल्यावर सांदी ह्यानें येऊन आह्मांस हळूच सांगितलें कीं, हरणें येताहेतहो येताहेत आणि खरोखरच त्यांचा मोठा एक कळप टेंकडीच्या कड्यावर आला होता. तो बराच खालीं धांवत आला; इतक्यांत दोन मनुष्यें रस्त्यावरून चाल-तांना एकाएकीं त्या हरणांच्या दृष्टीस पडलीं. ह्मणून सगळा कळप माग-च्या मार्गेच पळत गेला, आणि सर्व मौज बिघडली. पाहिलें असतां त्या दोघांस तेथें येण्याचें कांहीं काम नव्हतें. असो, नंतर कांहीं वेळानें आह्मी आलबर्त्त साहेब, लार्द ग्लेन्लयन आणि चाकर माणसें ह्यांस टेकडीच्या कड्यावरून येतांना पाहिलें, इतक्यांत आह्मी गाडींत बसून पुलावरून गेलों, तेथें एका धनगराचें खोपटें होतें, तेथें आलबर्त्त साहेब वगैरे ह्यांची वाट पाहत राहिलों, इतक्यांत ते आले; ते बंदुकांच्या योगानें चमत्कारिक दिसत होते. आमचे आलबर्त्त साहेब सगळयाचा बिघाड होईल ह्मणून एकही बार नकाढतां त्यांच्या पाठीमागून एक सारखे दवडत होते. कुत्रेवाले व कुत्रे ह्यांचा जमाव सुंदर दिसत होता. नंतर कांहीं वेळ गोष्टी बोलत आह्मी थोडा रस्ता पायानें चाललों. मग आलबर्त्त साहेबांसहवर्त्तमान गाडींत बसून बिन्हार्डी आलों.

## शनिवार, सप्तेंबर ता० २१ वी, १८४४.

न्याहरी झाल्यावर लार्द ग्लेन्लयन साहेबांची आलबर्त्त साहेब ह्यांनीं भेट घेतली. त्या वेळेस त्यांनीं असा बेत केला कीं, आलबर्त्त साहेबांनीं अगोदर हरणाचे शिकारीस जावें, आणि मागून म्या ती मौज पाहवयास जावें. अकरा वाजण्यास वीस मिन्युटें कमी होतीं, तेव्हां आह्मी लेदी क्यानिंग हीस घेऊन ग्लेनतिल्त दऱ्याकडे जाण्यास निघालों. दिवस मोठा रमणीय दिसत होता, आणि बरें झालें कीं, आह्मी निघालों, नाहीं तर आह्मांस त्या विषयीं हळहळ लागली असती. जरी तो दिवस अत्यंत रमणीय व सुखोपभोग्य होता तथापि आह्मांस पुष्कळ श्रम पडले; असे श्रम कधीं झाले नव्हते. तथापि जर दिवसभर आलबर्त्त साहेब मजबरोबर राहिले असते, तर मी अणखीही त्या सुखाचा उपभोग घेतला असता.

आह्मी सुमारें पीतर फ्रेजरच्या घरापर्यंत गाडींत बसून गेलों. तें घर मारबल लाज् व फारेस्त लाज् ह्या दोहोंच्यामध्यें आहे. एथें मी व

आलबर्त्त साहेब असे दोघे खालीं उतरून थोडेसे पायीं चाललों. थोडा-सा फेरफटका केल्यावर मी व लेदी क्यानिंग् तट्टांवर बसून पुढें चालूं लागलों. माझा तट्टू हातीं धरून लार्द ग्लेन्लयन साहेब हे शेवटपर्यंत चालले. पीतर फ्रेजर ह्मणून जो मुख्य राखणदार तो आह्मांबरोबर वाट दाखवावयास आला होता. हा मनुष्य विलक्षण चपळ होता. सांदी व दुसरे सहा हैलंदरलोक बंदुका व कुत्रे घेऊन चालले होते आणि सर्वांचे पाठीमागें आमचे फराळाचें सामान घेऊन दोन तट्टें आलीं. आलबर्त्त साहेबांचा हमाल हाही आमच्या बरोबर होता. त्याच्या जवळ त्यांची एक बंदूक होती. दुसरी त्याच्या सोईकरितां आलबर्त्त साहेबांनीं स्वतः आपल्या खांद्यावर लटकाविली होती. पुढें आह्मी डोंगराच्या वांकणा वांकणानीं चढलों. भोवतालची सर्व शोभा दृष्टीस पडून मोठा आल्हाद झाला. चाऱ्ही बाजूंनीं सृष्टीसौंदर्य विलक्षण शोभिवंत दिसत होतें आणि जसजसे आह्मी वर चढत गेलों, तसतसा अधिकाधिक देखावा दृष्टीस पडूं लागला. दिवस मोठा रम्य होता, परंतु ऊन फार कडक पडलें होतें. तेथून आह्मांस बेनीग्लो पर्वताचें सर्वांहून शिखर उंच दिसूं लागलें. तें खालून दिसत नाहीं. तलख पर्वतावरून जी लांबची पर्वतांची रांग आह्मीं पाहिली, तीही एथून दिसत होती. तिच्यावर थोडें थोडें धुकें पडलें होतें, तेंही मोठें मौजेचें दिसत होतें. तेथून आह्मी लाखवाख नामक सरोवर पाहिलें, रस्ता चांगला सुरेख होता; आणि वर चढतांना कदाचित हरणांना अवचित गांठूं ह्मणून आह्मांला हळूं हळूं बोललें पाहिजे होतें; आणि वास्तविक आह्मी बहुतेक सर्व दिवसभर तसेंच केलें. वारा अनुकूल होता आणि हरणाचे शिकारींत ही गोष्ट मुख्य आहे. आमच्या जवळ त्यांदसीर चितारी असता तर बरें होतें, त्यानें आमच्या सगळ्या मंडळीची तस्बीर काढिली असती व आह्मी ज्या ठिकाणीं उभे होतों त्या ठिकाणाची छाया हुबेहुब उतरली असती. त्या ठिकाणावरून जिकडे पाहवें तिकडे मौज दृष्टीस पडत होती. मला जर अवकाश असता तर मी सुद्धां तसबीर काढली असती.

ब्रियानन पर्वताच्या माथ्यावर जाऊन उभे राहिलों. तेथून खालीं पाहिलें ह्मणजे डोळे फिरतात. ह्या ठिकाणीं कधीं कधीं गरुड पक्षी बसतात. आलबर्त्त साहेब घोड्यावरून खालीं उतरून पाहूं लागले तों त्यांना मोठा

चमत्कार वाटला. मग कांहीं वेळ पायीं चालून पुनः घोड्यावर बसले. नंतर आम्ही केर्नक्लामेन पर्वताच्या शिखराजवळ गेलों. तेथें आमची फुटाफूट झाली. आलबर्त्त साहेब, पीतर, लाली व दुसरे दोन कुत्रे राखणदार बरोबर घेऊन शिकारीस गेले. मी व लार्द ग्लेन्लयन व लेदी क्यानिंग अशीं अगदी शिखरापर्यंत गेलों, तेथें दाट शेवाळ होतें. खालीं जीं घोडीं उभीं होतीं त्यांची तस्वीर रेखाटण्यासाठीं आम्ही तेथें कांहीं वेळ बसलों, तेव्हां लार्द ग्लेन्लयन व सांदी हे आमच्या जवळच होते. एथील देखावा तर फारच सुंदर होता. आमच्या सभोंवतालीं केवळ डोंगरच होते आणि स्थळ एकांत असल्या मुळें आमचें चित्त वेधलें. आम्ही मारफारेस्त नांवाची डोंगरांची रांग पाहिली आणि डाव्या बाजूस दुसरी रांग पाहिली. ज्या पहाडाकडे आम्ही तोंड करून बसलों होतों, त्या पहाडापासून ती लांबत गेली होती. तो स्कारसाख पहाड, पर्थ, आबरदीन व इन्वरनेस ह्या परगण्याच्या सीमेवर आहे. माझें तट्टू वर आणिलें होतें त्यावर बसून शिखर उतरून मी खालीं आलें, आणि मग आलबर्त्त साहेबांस आमच्याकडे येतांना दुरून पाहून आम्ही त्यांस सामोरे गेलों. पुढें कांहीं वेळानें त्यांची आमची गांठ पडली. त्यांस कांहीं पारध मिळाली नाहीं ह्मणून मला वाईट वाटलें. मग चारीवर बसून आम्ही सर्वांनीं फराळ केला. नंतर फराळ झाल्यावर कांहीं वेळ आलबर्त्त साहेबांच्या बरोबर पायीं चालून आम्ही उभयतां तट्टांवर बसलों. पुढें आम्ही घराकडे जात असतां ग्लेन क्राइन् नांवाच्या दऱ्यामध्यें ज्या स्थळांस "स्यांगतम" ह्मणजे पवित्रभूमी ह्मणतात, तेथें कांहीं हरणें आमच्या दृष्टीस पडलीं. असें सांगतात कीं, ह्या ठिकाणीं पुष्कळ हरणांचे कळपांचे कळप असतात. नंतर लवकरच आलबर्त्त साहेब निघून गेले आणि आम्ही खोनाखो एथें तासभर थांबलों. कारण कीं, लार्द ग्लेन्लयन बोलले होते कीं, आपण थांबलों तर आलबर्त्त साहेबांकडे हरणांस वळवूं. परंतु आपण पुढें चाललों तर आपण सगळ्या मौजेचा बिघाड केला असें होईल. आलबर्त्त साहेब पुढच्या डोंगरावर चालत होते ते आह्मांला डोळ्यांतल्या बाहुलीसारिखे लहान दिसले. आह्मीं हरणांचे कळप चार पाहिले, दोन कळप तर अगदीं जवळून गेले, ते किती सुंदर दिसत होते!

इतक्यांत सूर्य डोंगराच्या आड हळू हळू जात आहेसा पाहिला, आणि अंधार होईल ह्मणून धाक पडला. आमचा नौकर सांदी हा आह्मांस सोडून क्षणभर कोठें गेला होता, त्याला आह्मी भीतीनें हाका मारून सांगितलें कीं, परत येण्याचा इशारा करा. मग आह्मी डोंगर हेऱ्या फेऱ्यानें उतरूं लागलों, तट्टें चांगलीं हुषारीनें सांभाळून चालत होतीं. सूर्य डोंगराच्या खालीं जसा गेला तस तसा देखावा अधिक अधिक रमणीय दिसूं लागला. कोठें आरक्त, कोठें तांबूस सोनेरी रंगाचें व कोठें निळ्या रंगाचें आकाश झालें होतें. पहाड जांभळ्या वर्णाचे सुंदर दिसत होते. शेवटीं सूर्याचा अस्त झाला तेव्हां आकाशांतील रंग कांहीं मंद झाले. आणि पहाडांचा असा विलक्षण देखावा मीं कधींच पाहिला नव्हता. नंतर अगदीच काळोख पडला.

शेवटीं आलबर्त्त साहेब आह्मांस भेटले, आणि मला धास्ती पडेल ह्मणून अगोदरच येऊन ते आमची वाट पाहत राहिले होते. ह्या वेळेसही काळवीट सांपडले नाहींत. निशाण मारीत असतां बंदुक रंजक प्याली, ह्मणून हातची पारध गेली. तरी त्यांची आनंदवृत्ति नित्याप्रमाणेंच होती. आह्मी सर्व सुखरूपपणें पुलावर येऊन पोहोंचलों. डोंगराचे पायथ्याशीं आलों नाहीं तोंच गाढ आंधारानें गांठलें होतें. बिचाऱ्या तट्टांनीं आमचा बराच सांभाळ केला. पुढें मार्बल् लाज् पर्यंत आह्मी पायीं चालत गेलों. मग तट्टांच्या गाडींत बसून महालाकडे गेलों, तेव्हां चांगलें स्वच्छ चांदणें पडलें होतें त्यामुळें सर्व पदार्थ सुंदर दिसत होते; परंतु रस्त्याकडे पाहिलें ह्मणजे जरा मन थरथरत असे.

स्त्रोनाखो पर्वताच्या शिखरावर तार्मिगन पक्षी आमच्या जवळून उडत गेले, त्यांचे पंख पांढरे होते. प्लोवर्स, ग्रौस आणि फेजंत हेही पक्षी आह्मी पाहिले. आह्मांस घरीं पोंहोंचण्यास पावणे आठ वाजले.

### मंगळवार, अक्तोबर ता० १ ली, सन १८४४.

सवाआठ वाजतां आह्मी निघालों. ब्लेर हें स्थळ व हैलंद्स हा देश आह्मांस सोडावयास फारच वाईट वाटलें. तेथील प्रत्येक क्षुल्लक पदार्थ व हरएक जागा प्रिय अशीं मला झालीं होतीं. तेथील आमचा एकांतवास

व स्वतंत्रता, आणि आमचे तद्देशीय चाकर नौकर हीं सर्व मनांस संतोषविणारीं होतीं. आहा माझ्या आवडत्या देशा, तुला सोडून जाण्यास मला कितीरे दुःख वाटलें!

लार्ड ग्लेन्लयन आमच्या बरोबर घोड्यावरून आले आणि आह्मी ज्या मार्गानें गेलों होतों त्याच मार्गानें परतलों. वाटेनें येतानां किलीक्र्यांकी, पितलोखी आणि लागीरेत वगैरे लागलीं होतीं. ब्लेरहून येतानां घाटाच्या तोंडाशीं जें डाव्या हातास मैदान आहे त्यावर किलीक्र्यांकीची लढाई झाली होती. त्या रणभूमीच्या वरल्या बाजूस एक बाग आहे त्यांत लार्ड दंदी ह्यांस गोळी लागून ते मरण पावले. दंकेल्द एथें आह्मी साडे अकरा वाजतां पोहोंचलों. मि० आसवल्द व मि० केर हे उभयतां हैलंदर शिपायांची एक टोळी घेऊन आमच्या सत्काराकरितां आले होते; तेथें एका बंगल्यांत जाऊन मुक्काम केला. हा बंगला रमणीय स्थानीं बांधिला असून सभोवार देखावाही सुंदर होता. खिडकींतून पाहिलें असतां नदी दिसत होती. ब्लेर मधून गाडीवाटेनें आलें ह्मणजे क्रेगी बार्नस् नामक टेंकडी डावे बाजूस लागते.

ह्या गांवीं माजी ड्यूक आफ् आथोल हे घर बांधीत होते तें, व तेथें एक लार्च नांवाचा सुंदर वृक्ष आहे तो पाहवयास आह्मी पायीं गेलों. तें आथोल साहेबाचें घर अद्यापि अर्धवट तसेंच राहिलेलें आहे व हा लार्च वृक्ष स्कातलंद देशांत आणिल्या पूर्वी ह्याच्या जातीचे वृक्ष ह्या देशांत नव्हते. "*आरघेतर्भीन" ह्या तट्टावर बसून मी परत गेलें. ह्या तट्टावर बसण्याची ही माझी शेवटचीच खेप होती. त्यास व माझा विश्वासू चाकर सांदी ह्यास सोडण्यास मला मोठें दुःख झालें. तेथील पुरातन देवालय मोडकळीस आलें आहे, त्याचा एक भाग मात्र भजनाकरितां दुरुस्त केला आहे, तो आह्मीं जाऊन पाहिला. तेथें ड्यूकाचा पुतळा आहे. एथील दन्केल्दचें मैदान अगदी ओळखूं आलें नाहीं, कारण जाते वेळेस तेथें लष्कर होतें. दन्केल्दची शोभा जरी फारच उत्कृष्ट आहे तरी ब्लेरच्या खालींच.

* हा तट्टु ड्यूक आफ् आथोल ह्यांनीं आह्मांस १८४७ सांत दिला. तो अद्यापि आसबर्न एथें जिवंत आहे.

बारा वाजल्यावर आह्मी पुनः मार्गस्थ झालों, लार्ड ग्लेन्लयन आह्मां बरोबर मोठ्या आग्रहानें दंदी पर्यंत आले, ह्मणजे ब्लेर पासून २९ कोश. ते इतके लांब आह्मांस पोहोंचवावयास आले ह्मणून आह्मांस मोठा अचंबा वाटला. दंकेल्द गांवापासून कप्तान जे. मरे हेही आह्मांबरोबर घोड्या वरून आले; एथून पुढें सपाट देश लागला, तो पाहून फारसा संतोष वाटला नाहीं. कूपर आंगस् एथें आह्मांस पाहण्याकरितां लोकांचा मोठा समुदाय जमला होता. दंदी एथें तर त्याहून मोठा, आणि तेथील धक्यावर तर चेंगरा चेंगरी होऊन गेली होती.

लार्ड ग्लेन्लयन ह्यांचा निरोप घेण्यास आह्मांस खरोखर दुःख वाटलें; आणि त्यांसही आह्मांस सोडून जाण्यास तसेंच दुःख झालें. त्यांच्या सारखे राजनिष्ठ व मायाळू थोडकेच असतील.

नंतर आह्मी लहान नौकेंत बसून गलबतावर गेलों, तेव्हां लाटा मोठ्या भयंकर येत होत्या.

### गुरुवार, अक्तोबर ता० ३ री, सन १८४४.

इंग्लंद देशाचा किनारा तर अतिशय सपाट दिसत होता. हैलंद देश मला मनस्वीच आवडतो. व तेथले सुंदर पहाड सोडल्या मुळें मला फार वाईट वाटतें, हें जेव्हां मी लार्ड आबरदीन ह्मांस सांगितलें तेव्हां त्यांनां गहिंवर आला. हैलंद व त्यांतील रहवासी हे मोठे चमत्कारिक आहेत; ते लोक शूर, देखणे व चपळ आहेत; आणि अशा लोकांत राहि-ल्यानें आह्मांस मोठें सौख्य झालें. देश रचनेची शोभा फार होती खरी, परंतु हिच्या शिवाय कंटकाभाव, उपद्रवाभाव, स्वास्थ्य, स्वतंत्रता, व एकांत वास ह्या गोष्टींचें सुख आह्मी त्या देशांत फार भोगिलें.

ऊन चांगलें पडलें होतें खरें, परंतु डोंगरांची हवा जशी स्वच्छ व हलकी व मोकळी असते तशी एथली हवा नव्हती, तर जड व दाट होती. आह्मी वुलिच एथें दोन वाजतां पोहोंचलों आणि लवकरच बंदरांत उत-रलों, तेथून थेट आगगाडीवर गेलों आणि सुमारें चार वाजल्यानंतर विंजर क्यासल एथें पोंहोंचलों.

# स्कातलंद देशाचे पश्चिम किनाऱ्याकडील सफर आणि अर्दवरिकी एथें गमन.

**बुधवार, आगस्त ता० ११ वी, सन १८४७.**

आसबर्न एथील धक्यावरून गलबतावर चढलों. दोन मोठीं मुलें, माझा भाऊ चार्ल्स, ड्यूक व दचेस आफ् नार्फक, प्रधानां पैकीं लार्ड ग्रे, लेदी जोसलीन, जनरल वेम्स, सर जेम्स क्लार्क, आणि मिस हिल्दयार्द इतकी मंडळी आमच्या बरोबर आली. आमच्या बरोबर ज्या आगबोटी आहेत त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—

ब्लाक ईगल, गार्लेद, उन्दीन, फेरी आणि स्कर्ज (ह्या सर्व लढाऊ आगबोटी) आमचे दोन इकेरी ब्लाक् ईगल आगबोटीवर आहेत.

आगबोटी लवकरच हांकारल्या. आसबर्न गांव दिसेनासें झालें, तेव्हां मला माझ्या घरीं ठेविलेल्या लेंकरांची आठवण होऊन वाईट वाटलें.

## विक्तोरिया आणि आलबर्त्त नांवाच्या गलबतावर दार्तमौथ बंदर एथें.

**बृहस्पतवार, आगस्त ता० १२ वी, सन १८४७.**

आज सांगण्यासारिखें कांहीं विशेष वर्त्तमान नाहीं, आमच्या मनासारिखी प्रथम आमची सफर झाली नाहीं. मनुष्याचे संकेत, ईश्वराच्या हातीं सिद्धि. एव्हां फालमौथ बंदरांत जें असावयाचें, तें आतां आह्मी फक्त दार्त्तमौथ बंदरांतच आहों. आह्मी पांच वाजतां निघालों आणि कांहीं वेळानें गलबत खुंटलें असें आह्मांस वाटलें, मग चौकशी अंतीं समजलें कीं, धुकें इतकें दाट पडलें होतें कीं, पुढें जातां कामा नये. शेवटीं कप्तान स्मिथेत ह्यांना गार्लेद आगबोटीवर बसून पुढें धुकें कितपत आहे तें पहाण्याकरितां

जावें असा हुकूम झाला. ते लवकरच माघारे येऊन ह्मणाले कीं, दिनीद-लस्च्या पुढें जाण्यास हरकत नाहीं. त्यावेळेस आह्मी आलंबे मध्यें होतों. मग लागलीच आह्मी आगबोटी हांकारल्या. थोडीशी न्याहारी करून वरच्या मजल्यावर गेलों, तेथें मी कशीदा काढीत व गोष्टी बोलत बसलें. माझी प्रकृती चांगली नीट होती. एकाच्या सुमारास लाटा फारच उडूं लागल्या, ह्मणून ज्या बंदरांत हालीं आह्मी आहों त्या बंदरीं येण्याचा निश्चय केला.

## विक्तोरिया आणि आलबर्त्त नामक गलबत, मिलफर्द हेवन, सौथवेल्स.

### शनवार, आगस्त ता० १४ वी, सन १८४७.

संध्याकाळीं पांच वाजतां ह्या बंदरीं येऊन आह्मी पोहोंचलों. दार्तमौथ बंदर सोडल्यापासून जी हकीकत झाली ती मी आतां सांगतें. गुरुवारीं सायंकाळीं चार्लस साहेबाबरोबर जेवल्या नंतर आह्मी तारवाच्या वरच्या मजल्यावर गेलों. तेव्हां सर्व शहर दिव्यांनीं लखलखीत झालें होतें, असें आह्मी पाहिलें. घरें फार उंच असून चमत्कारिक आहेत आणि तीं समुद्रापर्यंत लागत गेलीं आहेत. त्यांचें प्रतिबिंब समुद्राच्या कांचेसारख्या नितळ पाण्यावर पडलें होतें. ह्यांची फार शोभा वाटली. रात्र शांत व सुंदर होती.

### शुक्रवार, आगस्त ता० १३ वी, सन १८४७.

पहांटेस चार वाजतां गलबत हांकारिलें, आणि दुपारचे तीन वाजतां सीली नामक बेटांस आह्मी आलों. समुद्र फार खवळला होता. हीं लहान लहान बेटें जेथें आह्मी हालीं आहों, तीं मोठीं चमत्कारिक आहेत, ह्यां



पैकीं मुख्य बेट सेंतमेरीज नांवाचें आहे. त्यांत एक लहानसा गांव आहे, एक देवालय आहे आणि एक लहानसें बंदर आहे. त्याच्या अगदीं समोर

त्रेस्को नांवाचें एक बेट आहे, त्यांत मिस्तर स्मिथ याचा वाडा आहे. ड्यूक आफ् कार्नवाल ह्यांनीं ह्या सर्व बेटांचा कौल त्या स्मिथ साहेबास दिला आहे. तेथून कांहीं अंतरावर डावे बाजूस सेंत भग्नेस नांवाचें बेट आहे, त्यांत एक दीपस्तंभ आहे. बेटाच्या सभोंवतीं असंख्य खडक आहेत.

आलबर्त्त साहेब, चार्लस आणि बरती हे ह्या बेटां पैकीं एक बेट पहाण्यास गेले. माझे फार हाल झाले होते, परंतु आलबर्त्त व चार्लस ह्या दोघांस गलबत लागलें नव्हतें. माझ्या लेंकरांसही समुद्र लागला, पण तीं तेव्हांच हुषार झालीं. पांच वाजल्या नंतर जेव्हां आलबर्त्त साहेब व दुसरी मंडळी परत आली, तेव्हां बरोबरच्या सर्व बाया व गृहस्थ ह्यांस घेऊन लहान नौकेंत बसून सेंतमेरी ह्या नांवाचें बेट पहाण्यास आह्मी धक्यावर उतरलों. समुद्र निळा दिसत होता, तरी थोडी खळबळ राहिलीच होती. बंदरा नजीक उंचवट्यावर स्तार क्यासल नांवाचा किल्ला आहे. हें बंदर पाहून मला सेंतहेलियर्स बंदराची आठवण झाली. स्मिथ साहेबानीं तट्टाची गाडी आणिली होती, तींत आह्मी दोघेंजण व चार्लस व लेदी जोसलीन इतकीं माणसें बसलों. आह्मी गांवांतून फिरलों आणि मग किल्या भोंवतीं फिरलों. हा गांव मासे मारणाऱ्यांचा लहानशा गांवा सारखा दिसला. किल्या जवळ समुद्राच्या बाजूनें एक रमणीय फिरण्याकरितां जागा केली आहे. तेथला खडक नेचा आणि हीथ व फर्ज ह्या नांवाच्या वनस्पतींनीं आच्छादून गेला आहे. ह्या बेटांचा व खडकांचा लांबच लांब देखावा फार सुंदर दिसतो. हा गांव जमिनीच्या अरुंद पट्टेवर वसलेला आहे, व दोंही बाजूंस समुद्राचें वांकण आहे. जुन्या किल्या जवळ आह्मी बाहेर पडलों. एका एदवर्द राजाच्या कारकीर्दींत तो बांधल्या विषयींचा तेथें कोरींव लेख आहे. त्याच्या बुरुजा वरून पाहिलें असतां मोठा सुंदर देखावा दिसतो. सात वाजायाच्या सुमारास ज्या रस्त्यानें आह्मी गेलों होतों त्याच रस्त्यानें परत आलों.

### शनवार, आगस्त ता० १४ वी, सन १८४७.

आह्मीं पांच वाजतां गलबत हांकारिलें, समुद्र शांत नसल्या मुळें गलबत फार डळमळूं लागलें; आणि मला पुनः समुद्र फार लागला, तरी दुपारचे तीन वाजतां मी गलबताच्या मजल्यावर आलें, तेव्हां समुद्र अगदीं कांचे

सारखा होता. आह्मी आतां वेल्स देशाच्या किनाऱ्या नजीक आलों होतों.

मिल्फर्द हेवन् हें बंदर फार सुंदर आहे, हें आमच्या सर्व बंदरां पेक्षां मोठें आहे, ह्यांत एक सगळें आरमार देखील मावेल. मिलफर्दच्या समोरच आह्मी नांगर टाकून आहों, एथून पेंब्रीक नांवाचें गांव बरेंच लांब आहे. तेथील समुद्रकिनाऱ्याच्या दरडी तांबूस रंगाच्या असून फार उंच नाहींत.



पेंब्रोक गांव पहावयास आलबर्त्त साहेब व चार्ल्स असे उभयतां फेरी नांवाच्या आगबोटींत बसून गेले. मी नकाशा काढीत बसलें. बंदरांतुन अगणित होड्या येत होत्या; त्यांमध्यें वेल्स लोकांच्या बायका पुरुषांच्या उंच टोप्यांसारख्या टोप्या घालून बसल्या होत्या. बर्तीला पाहून त्यांस मोठा हर्ष झाला. तो प्रिन्स आफ् वेल्स ह्मणून लोकांनीं त्याचा मोठा जयजयकार केला. पावणे आठ वाजतां माझे आलबर्त्त साहेब परत आले. मला दाखविण्या करितां लोकांनीं एक सुंदर गवळ्याची पोर आणिली होती, तिचा सगळा वेल्श पोषाग होता. आह्मी वरच्या मजल्यावर गेलों तेव्हां आमच्या सन्मानार्थ मिलफर्द गांवांत रोषनाई केली होती व जिकडे तिकडे आनंदसूचक अग्नि पेटले होते. असें पाहिलें.

## रविवार, आगस्त ता० १५ वी, सन १८४७.

चार वाजतां पुनः गलबत हांकारिलें, आकाश स्वच्छ होतें आणि समुद्र शांत होता. अकराच्या सुमारास केरनार्वनशयरचा डोंगराळ किनारा आह्मीं पाहिला. तेथील डोंगर उभट व सुरेख आहेत. आलबर्त्त साहेब ह्मणाले कीं, हे डोंगर पाहून मला इस्की बेटाची आठवण होते. तेथेंही समुद्र खोल व निळ्या रंगाचा आहे, व गगन निरभ्र आहे. मिनाई सामुद्रधुनींत आल्यावर आह्मी सर्वांनीं विक्तोरिया आणि आलबर्त्त नांवाचें गलबत सोडलें, आणि फेरी आगबोटीवर आलों. विक्तोरिया आणि आलबर्त्त ब्ल्याक ईगल, (त्यांतील दोन्ही पागे आमच्या बरोबर होते.) उन्दीन आणि स्कर्ब ह्या आगबोटी आंगल्सी बेटास प्रदक्षिणा करून होली-

हेद वरून गेल्या आणि आह्मी फेरी आगबोटींतून बरोबर गार्लेंद आगबोट घेऊन सामुद्रधुनींत शिरलों. आंत शिरतांना तेथील सुंदर पर्वत व त्याच्या वरील हिरवें रान व त्याच्या पायथ्याशीं शेतें व रानें ह्यांची शोभा खरोखर मनोरंजक होती. डोंगरांच्या मध्यें स्नोदन नांवाचा डोंगर सर्वां पेक्षां उंच होता. डावे बाजूकडील प्रदेश अगदीं सपाट आहे. मग केर्नार्वन शहर व फार रम्य स्थानीं बांधलेला तेथील बुनाट भव्य किल्ला दिसला. ह्याच्या समोरच आह्मी जरा आगबोट खुंटविली, पण किनाऱ्यावर उतरलों नाहीं. पहिल्यानें कांहीं वेळपर्यंत डोंगर दिसेनातसे झाले, मग पुनः दिसूं लागले, तेव्हां त्यांची शोभा अधिकाधिकच दिसूं लागली. पुढें आह्मास प्लासन्युइद हा गांव दिसूं लागला. एथें आह्मी पंधरा वर्षामागें सहा आठवडेपर्यंत राहिलों होतों. मला ह्या वेळेस तेव्हांचें सर्व आठवलें. आणि एथील शोभा पहिल्या पेक्षां अधिक रमणीय वाटली.

स्विली राक्स् नांवाच्या डोंगरांवरून आह्मी गेलों, आणि आगीच्या गाडीच्या रस्त्याचा नळ बांधीत होते तो पाहिला. मग मेनाई पुला खालून जाऊन पलीकडच्या बाजूस आगबोट खुंटली. एथें आगबोटीवर व गलबतांवर राजनिष्ठ लोकांची बरीच दाटी झाली होती. ते लोक "गाद सेव दि क्वीन" (ईश्वर राणीचें रक्षण करो) असें गाणें वाद्य वाजवून गात होते, व मनस्वी जयघोष करीत होते.

आलबर्त्त साहेब व चार्लस् हे जमिनीवर उतरून पुलावर फिरावयास गेले. ते परत आल्यावर आह्मी पुढें चाललों. मग एका ठिकाणीं अणखी थांबलों, तें सुंदर ठिकाण होतें. तेथील देखावा बहुतेक स्विझरलंद देशासारिखा होता. त्याच्या समोर कर्नल दग्लस पेनंत ह्यांचा पेनन्हिन् क्यासल आहे. हा किल्ला पहिल्या धन्याच्या ताब्यांत अर्धवट झालेला मी पाहिला होता आणि त्याच्या समोरच ब्यांगर आहे. त्याच्या भोंवताले वृक्ष आहेत, त्यांच्या मधून बोमारीसचा रस्ता दिसतो. आंभळ्या रंगाचे पहाड व त्यांच्या पायथ्याशीं हिरवीं गार मैदानें, व निळा समुद्र हीं अगदीं चित्रासारखीं दिसलीं.

पेनन्हिन् पहाण्यास आलबर्त्त साहेब व चार्लस् असे उभयतां गेले. ते आले तसेच आह्मीं फेरीमध्येंच भोजन केलें. मग आपल्या मुला

माणसां सहवर्तमान आह्मी आठ वाजतां परतून विक्तोरिया आणि आलबर्त्त आगबोटीवर आलों. हा सर्व दिवस आनंदांत गेला.

### सोमवार, आगस्त ता० १६ वी, सन १८४७.

पहांटेस चार वाजतां गलबत हांकारिलें, तेव्हां आह्मी जागे झालों आणि एक तासाच्या आंत गलबत खुंटलें असें समजून आश्चर्य वाटलें. खुंटण्याचें कारण असें होतें कीं, बोटीचें चाक गतवर्षी प्रमाणेंच बिघडलें होतें, तें नीट करावयास सगळे दोन तास लागले. सात वाजतां पुनः हांकारिलें. समुद्र शांत होता, व ऊन्ह चांगलें पडलें होतें. साडे दहा वाजतां ऐल् आफ् मान् नांवाचें बेट दिसूं लागलें, तें फार सुंदर आहे, व तेथील डोंगर व त्यांचीं शिखरें भव्य दिसतात. बारा वाजण्याच्या सुमारास तेथल्या खाडीच्या तोंडाशीं येऊन पोहोंचलों, तेथें दग्लस नांवाचें शहर आहे. ती जागा फारच रमणीय आहे, व अगदीं टोंकावर जो दीपस्तंब आहे त्याच्या नजीकच एक मोठा किल्ला आहे. एथें दहा पंधरा मिनिटें थांबलों. डगरीवर लोकांची दाटी झाली होती. दग्लस पासून रामसेबे पर्यंत टेंकड्या व डगरी उंच उंच व उभट आहेत. तथापि रामसे स्वतः बदखल आहे.

पुढें दोनतास पर्यंत जमीन दिसली नाहीं; तेव्हां मी जाऊन लिहीत बसलें. तीन वाजतां वरच्या मजल्यावर आलें आणि पहातें तों आह्मी स्कात-लंद देशाचे किनाऱ्या नजीक येऊन पोहोंचलों. ह्मणजे मल्ल आफ् ग्यालोवे आणि तौविग्तनशयर ह्यांच्या जवळ होतों. आलबर्त्त साहेब ह्मणाले कीं, अयर्लंदचा किनारा दिसतो, पण तो मला दिसला नाहीं. लाख-रयन नांवाचें सरोवर आह्मांस पांचाच्या सुमारास दिसूं लागलें. तसाच डावे हातास एल्साक्रेग हा डोंगर दिसूं लागला. तो समुद्रपृष्ठापासून एक हजार फूट उंच आहे. लाखरयन फार सुंदर आहे, त्याच्या जवळील पहाड आणि खोऱ्या आणि मुख्यत्वें करून ग्लेनफिन्नार्त नांवाची खोरी फार रमणीय आहे. हें सरोवर फार मोठें आहे; आणि एथील पहाड फार उंच असून त्यावर दाट झाडी आहे. तेथें स्त्रान्‌रार नामक लहानसा गांव आहे.

## मंगळवार, आगस्त ता० १७ वी, सन १८४७.

प्रातःकाळीं साहा वाजतां तारूं हाकारिलें. सकाळीं अभ्रें मुळींच नव्हतीं. आठाच्या सुमारास एलसा क्रेग नांवाचा उभा खडप त्याच्या नजीक आलों, त्या खडपाची रचना मोठी चमत्कारिक आहे. त्यावर सहस्रावधी पक्षी (पाणकोंबडे) होते त्यांजवर आलबर्त्त साहेबांनीं व माझे बंधू चार्ल्स ह्यांनीं त्यास उडवायाकरितां तीन वेळ बंदुक सोडिली. परंतु ते गोळीचे टप्याच्या आंत आले नाहींत. नंतर आह्मी ऐल आफ् आर्रण नांवाचें सुंदर बेट आहे त्याचे नजीक आलों. गोर्तफेल नामक पर्वतांची रांग दिसूं लागून होली ऐलंद ह्यांच्या समोर पुढें आलें ह्मणजे विशेष शोभा दिसते. गोर्तफेल पर्वतां पैकीं जो पर्वत फार उंच आहे त्याची उंची २८००फूट आहे व त्यांचीं टोकें निराळीं स्वच्छ दिसतात. त्या पर्वतांच्या समोर लामलाश नांवाचा गांव आहे. पुढें ब्रोदिक नांवाचें आखात लागलें तेंही सुंदर दिसतें. तेथील पर्वत उंच आहेत व तेथें एक मोठें खोरें आहे. त्याच्या समोर दाट झाडींत लार्द दगलस एक मोठा किल्ला बांधीत होते. मग ऐल आफ् ब्यूत नांवाचें बेट आह्मीं पाहिलें. तेथून क्लेद नदींतून वर गेलों. लार्द ब्यूत व मिस्तर स्तूअर्त ह्याच्या ठिकाणापासून पाहिलें तर नदीचा देखावा सुंदर दिसतो. नदीच्या कांठांनीं मोठमोठाले वृक्ष लागले आहेत व पुढें तिचें पात्र मोठें होत गेलें आहे. तिच्या सभोंवतीं कांहीं अंतरावर डोंगर आहेत. उजवे बाजूस लार्गस् नांवाचें एक लहानसें पण मोठें सुंदर स्थान आहे.

साडेबारा वाजतां ग्लासगो नामक प्रख्यात शहराचें जें ग्रिनक बंदर आहे तेथें जाऊन पोहोंचलों. किनारा व तारवें हीं लोकांनीं भरलीं होतीं. असें ह्मणतात कीं, लोकांनीं गच्च भरलेल्या एकुण चाळीस आगबोटी तेथें होत्या; आणि त्या आमच्या मागोमाग आल्या. अशी गोष्ट कधीं पाहिली नव्हती. ह्या आगबोटीं शिवाय अगणित लहान लहान तारवें व होड्या चोंहीकडे फिरत होत्या, त्यांनीं आह्मांस देखील वाट दिली नाहीं. शेवटीं आह्मी आपल्या फेरी आगबोटींत बसलों आणि नदीच्या वरल्या बाजूस गेलों. धुकें पुष्कळ आलें होतें ह्मणून आह्मांस पुढें कांहीं चांगलेंसें

दिसलें नाहीं. आह्मांस पोर्त ग्लासगो हें शहर लागलें, आणि एक वाजतां दंबारतन क्यासल् एथें येऊन पोहोंचलों. हें अति सुंदर स्थान आहे. मर्दीतून खडक नीट सडक निघतो, सभोंवती पर्वत आहेत व मागच्या बाजूस दंबारतन शहर आहे ह्यामुळें ही जागा विचित्र दिसते. किल्याच्या खालींच आह्मी उतरलों, आणि मुलें व चार्ल्स ह्या सहवर्तमान गाडींत बसून किल्यांत गेलों. आह्मांस पहाण्याकरितां लोकांची दाटी झाली होती, परंतु बंदोबस्त चांगला ठेविला होता. आह्मी वर मोरचे पहाण्यास गेलों परंतु पुष्कळ पायऱ्या चढून जावें लागलें. वाल्लेस नामक योद्धयास एथें कैद केलें होतें. स्काच लोकांची राणी मेरी हिजकरितां ह्या किल्यावरील शिपायी फार वेळ टिकाव धरून लढले. किल्याच्या बुरुजावरून क्लैद नदी व दंबरातन शहर हीं चांगलीं स्वच्छ दिसतात; आणि जर धुकें नसतें तर बेनलौमंदही दिसतें.

अडीच वाजतां परत फेरीवर गेलों आणि ग्रिनक शहरास आह्मांस बोलविण्यास ज्या एकुणीस आगबोटी आल्या होत्या त्यां सहवर्त्तमान आह्मी परत आलों. ग्रिनक सोडल्यावर रोजनीथ ह्मणून जो गांव आहे व जेथें ड्यूक आफ् आरगैल व त्याचें कुटुंब राहतात तो उजवे बाजूस टाकून लाखलौंग नांवाच्या सरोवराकडेस गेलों. हें सरोवर साडेसात कोश लांब आहे. त्याच्या सभोंवतीं उंच उंच पहाड आहेत, त्यांवर हिरवें गार रान आहे, त्यांच्या भोंवतीं हें सरोवर जणूं प्रदक्षिणा घालीत आहे असें भासतें; कधीं कधीं असा भास होतो कीं, पुढें मार्गच नाहीं, केवळ डोंगरच आहेत, असा देखावा स्कातलंद देशाच्या पूर्व भागांत अढळत नाहीं. चार्ल्स ह्मणाले कीं, ही शोभा पाहून मला स्वित्झरलंद व तिरोल प्रांतांचें स्मरण होतें. लाखगाईल कडे जो ह्या सरोवराचा भाग आहे तो फार शोभिवंत आहे. काब्लर ( चांभार ) नांवाचा पर्वत आह्मांस एथून साफ दिसला. ह्याचें शिखर जणूं काय चांभार जोडे तांगडीत बसला आहे असें दिसतें. ह्या सरोवराच्या शेवटास आह्मांस बेनलौमंद सरोवर थोडें थोडें दिसूं लागलें, व खरोखरच आह्मी लौखलामंदचे जवळच होतों.

ज्या वाटेनें गेलों त्याच वाटेनें आह्मी परतलों. सूर्यदर्शन झालेंच नाहीं, मधून मधून धुकेंही होतेंच, तथापि दिवस रमणीय दिसत होता. आह्मी

आठ वाजतां रायसे एथें पोहोंचलों आणि लागलीच विक्तोरिया आणि आलबर्त्त नामक गलबतावर चढलों. श्रम पुष्कळ झाले होते खरे, परंतु करमणुकही पुष्कळ झाली. आमचीं मुलें प्रत्येक गोष्टीपासून फारच सुख पावतात; आणि त्यांनीं नवीन नवीन चिजा पाहिल्या तरी त्यांची तळमळ होत नाहीं. द्यूक आफ् रायसे* ह्यांचा लोकांनीं पुष्कळ जयजयकार केला, आणि प्रिन्सेस आफ् ग्रेतब्रितन हिचाही जयजयकार केला. सर्वत्र हैलंदर लोकांनीं अशीच राजनिष्ठा दर्शविली. रायसे हें सुंदर लहान गांव आहे. हें एका सुंदर वांकणाच्या किनाऱ्यावर वसलें आहे, ह्याच्या कांहीं अंतरावर डोंगर आहेत, व तेथील बंदरही उत्कृष्ट आहे. भोजन झाल्यावर वारवाच्या वरच्या मजल्यावर आह्मी गेलों, तेव्हां गांवांत रोषनाई केली होती ती पाहिली. प्रत्येक खिडकी दिव्यांनीं भरून गेली होती तेणेंकरून सर्व शहर शोभिवंत दिसत होतें.

### बुधवार, आगस्त ता० १८ वी, सन १८४७.

आज प्रातःकाळीं आकाश निरभ्र होतें. डोंगरांच्या शिखरांवर मात्र कांहीं ढग होते. आठ वाजतां फेरींत बसून कैल्स आफ् ब्युत खाडींतून वर गेलों. असजसें पुढें जावें तसतसा मोठा चमत्कार दृष्टीस पडतो. पहाड एका मागून एक असे आडवे असल्या कारणानें असा भास होतो कीं, पुढें मार्गच खुंटला आहे.



* स्कातलंदच्या राजाच्या ज्येष्ठ पुत्राचा हा किताब आहे आणि ह्मणूनच स्कातलंदच्या प्राचीन राजांचो वारस जी राणीसाहेब त्यांचा ज्येष्ठपुत्र प्रिन्स आफ् वेल्स ह्याचा हा किताब आहे.

डावे बाजूस आरन नामक बेट आहे, तें एथून सुंदर दिसत होतें. काल पासून आह्मीं बऱ्याच घिरट्या घातल्या. कारण आह्मी आरन व होली ऐलंद ह्यां जवळून गेलों; नंतर लितल (धाकटें) व ग्रेत (थोरलें) कंब्रे हीं डावे हातास टाकून दंबारतन कडे गेलों. मग पुनः परतून आरन डावे हातास टाकून लाख लौंग एथें जाऊन राथसे एथें गेलों. आरन सोडल्यावर लाखफैन सरोवरांत शिरलों. माझें डोकें दुखत होतें ह्मणून मी खालीं जाऊन निजलें. इनवरेरी एथें पोहोंचण्यास एक तास उरला होता, तेव्हां मात्र मी पुनः तारवाच्या मजल्यावर गेलें. एथें सरोवर फांकत जातें, व त्याच्या दोन्हीं बाजूंच्या टेंकड्या खडबडीत व हिरव्याचार दिसतात, परंतु त्या फार उंच नाहींत.

इनवरेरी कडे जाण्याचा प्रदेश फारच उत्कृष्ट आहे. सरोवर फार रुंद आहे, समोर डोंगरांची एक रांग आहे ती हिरवी, गुलाबी, व जांबळ्या रंगाची दिसते. डावे हाता कडेस इनवरेरी गांव आहे, त्याच्या वरल्या बाजूस इनवरेरी क्यासल नांवाचा वाडा आहे, तो चौबुर्जी असून त्याच्या कोपऱ्यांला मनोरे आहेत; वाड्याच्या सभोंवती सरल झाडांचीं बनें आहेत.

ह्या प्रदेशांत आमचा आदरसत्कार शुद्ध हैलंदी लोकांच्या रीतीचा झाला. द्यूक आफ् आर्गैल व त्यांची पत्नी (प्रियलेदी एलिझाबेथ लेविस्तन गोर), दचेस् आफ् सदर्लंद, लार्द स्ताफर्द, लेदी क्यारोलैन लेविसनगोर आणि ब्लंतैर्स ही मंडळी, आह्मी उतरलों त्या ठिकाणीं आह्मांस भेटावयास आली होती. ती जागा हेथर नांवाच्या वनस्पतीनें सुशोभित केली होती, केल्तिक सोसयती नामक मंडळी आली होती, ती पैकीं इसले एथील क्यांबल साहेब व त्यांचे दोन पुत्र आले होते. त्या मुलां पैकीं वडील प्रौढ होता, धाकटा लहान गोजिरवाणा होता. क्यांबल साहेबांचे नोकर वैगेरे लोक सर्व ओळीनें आमचे गाडी जवळ उभे केले होते. दचेस आफ् आर्गैल व दचेस आफ् सदर्लंद ह्यांस बरोबर घेऊन आह्मी गाडींत बसलों. चार्ल्स व द्यूक आफ् आर्गैल हे उभयतां कोचबाक्सावर बसले. आमचीं मुलें तर तारवावरच ठेविलीं होतीं. असे आह्मी गाडींत बसून दऱ्यांतून फिरलों. दऱ्यांत मोठ मोठे वृक्ष होते व हवा फार चांगली होती. उमदे

वृक्ष, ऊंच पर्वत, आणि शानदार सरोवर ह्यांच्या संयोगानें इनवरेरीची शोभा फार होती. ती पाहून आह्मी थक्क झालों.

आह्मी ड्यूक साहेबाचे घराजवळ आलों तेव्हां आमच्या पुढें ब्यागपैपस्-वाले चालिले, व आमच्या दोहों बाजूंनीं हैलंदर लोक होते; बाहेरच्या बाजूस ड्यूक साहेब ह्यांचा पुत्र मारकिस आफ् लार्न होता, तो त्या वेळेस दोन वर्षांचा होता, तो अगदीं गोरापान असून त्याचे केंस पिंगट होते. तो आई बापां सारखाच असून सुकुमार होता, त्याच्या अंगांत काळ्या मखमालीचा आंगरखा होता, डोक्याला हैलंदी टोपी व अंगावर शेला होता. आह्मी दोन वाजतां फराळास बसलों, त्यावेळेस हैलंदी गृहस्थ भाले व तरवारी घेऊन आमचे जवळ उभे होते. आमचे मुलांस बोलावूं पाठविलें होतें तीं फराळ होत असतांच आलीं. तीन वाजल्याच्या पूर्वी आह्मी इनवरेरी एथून निघालों व मुलें आह्मी आपल्या गाडींतच घेतलीं. आह्मांबरोबर ड्यूक साहेब व त्यांची पत्नी डचेस आफ् सदर्लंद वगैरे मंडळी फेरीवर पोहोंचविण्या करितां आली होती, तेथें त्यांना आह्मी रजा दिली.

लाखफैन सरोवरांतून जातांना डोंगरावर उजेड सुंदर दिसत होता; पांच वाजतां लॉखगिल्प हेद गांवापाशीं आमची सर्व मंडळी उतरली. हा गांव फारच लहान आहे, व पुष्कळ लोक तेथें जमा झाले होते, त्यामध्यें सर जान पी. ओर्द हे गृहस्थ मोठे सभ्य होते. त्यांनीं आह्मांस आपली गाडी दिली, त्या गाडींत बसून आह्मी क्रीनन कनाल नांवाचा कालवा एथें गेलों. त्या कालव्यांत बार्ज ह्मणून एक सुंदर नौका होती तींत आह्मी बसलों. ती नौका उत्तम रीतीनें सजवली होती. तिला ओढण्यास तीन घोडे जुंपिले होते. व त्या घोड्यांवर तांबड्या पोषाखाचे हांकणारे बसले होते. आह्मी हळूहळू पाण्यांतूनच गेलों. आह्मांस अकरा उघड्या ओलांडाव्या लागल्या. कित्येक ठिकाणीं आह्मांस चढउतर लागली, ह्यामुळें आमचा फार खोळंबा झाला, व दीड तास लागण्याच्या बद्दल अडीच तासांपेक्षां जास्ती वेळ लागला. लाख क्रीनन नामक सरोवराजवळ येईपर्यंत आठ वाजले. नंतर लागलेच आह्मी विक्तोरिया आणि आलबर्त्त ह्या गलबतावर गेलों. परंतु ओबन एथें जाण्यास फारच उशीर झाला होता ह्मणून आह्मांस तेथें मुक्काम करावा लागला. हा गांव फार रमणीय आहे, सभोंवतालीं पहाड आहेत, आणि

कांहीं अंतरावर जूरा बेटांतले पहाड दृष्टीस पडले. विक्तोरिया आणि आलबर्त्त ह्मणून जें आमचें गलबत तें मल्ल आफ् क्यांतायर ह्याच्या सभों-वतीं लवकर आलें होतें. आह्मी चार्लस बरोबर भोजन केलें, नंतर तार-वाच्या वरच्या मजल्यावर गेलों आणि पाहतों तों जिकडे तिकडे आनंद-सूचक अग्नि पेटले आहेत, आणि लोक हर्षध्वनि करीत आहेत. आकाशांत अर्ध चंद्र होता व तारेही हिरकणी सारखे चमकत होते व चारही दिशा निवांत होत्या, येणेंकरून आमच्या मनांस मोठा आनंद झाला.

## बृहस्पतवार, आगस्त ता० १९ वी, सन १८४७.

हा दिवस फार छानदार होता. नऊ वाजतां आह्मी क्रीनन सोडून उजवेकडे चाललों. आह्मांस असंख्य बेटें लागलीं व आह्मीं अगणित सुंदर देखावे पाहिले. पहिल्यानें सौंद आफ् जूरा नांवाच्या खाडींतून गेलों. तेथें बहुत लोक लहान लहान होड्यांत बसलेले आह्मीं पाहिले. त्यांवर त्यांनीं लहान बावटे शोभेकरितां लाविले होते. पुढें केररा नांवाच्या खाडींतून ओबन पर्यंत गेलों. हें स्थळ अत्यंत सुंदर आहे. ह्यांत दुनाली क्यासल-नामक किल्ला आहे तो अगदीं पडलेला आहे, तेथून कांहीं अंतरावर एक उंच पर्वतांची रांग आहे. ओबन सोडिल्या नंतर डावे बाजूस आह्मांस ऐल आफ् केररा व उजवे बाजूस दनस्ताफनेज क्यासल हीं दिसलीं. वेस्त मिन्स्तर आबे नामक देवालयांत राज्याभिषेक करण्याची जी खुर्ची आहे, तिच्या खालचा दगड दन्स्ताफनेज एथूनच आणिला होता, तो सर्वांस माहित आहे. ह्याच ठिकाणीं दुसरा आलेक्सांदर नांवाच्या राजास पुरिलें आहे असें ह्मणतात. पुढें लेदी राक नामक खडका जवळून आह्मी गेलों. ह्या खडकावर मेकलीन नांवाच्या मनुष्यानें आपली बायको पाण्यानें वाहून जावी ह्मणून सोडून दिली होती; परंतु ती बिचारी वांचली.

नंतर तोबरमोरी वरून आह्मी सौंद आफ् मल्ल नांवाच्या खाडींत आलों. तोबरमोरी हें स्थळ लहान असून फार रम्य आहे आणि एथून पुढें उत्कृष्ट देखावे आह्मांस लागले. एक वाजतां रम, एग आणि मक, हीं बेटें आह्मांस दिसूं लागलीं. हीं किंचित् मोठीं आहेत. तीं सर्व लार्ड सालिसबरि साहेबांनीं थोड्या वर्षांमागें विकत घेतलीं. लांबट व सपाट

अशीं कोल व तिरी ह्या नांवांचीं बेटें नंतर लागलीं. एथील रहिवासी लोकांनीं गेल्या हिवाळ्यांत दुर्दैवानें जो दुष्काळ पडला होता त्या मुळें फार संकटें भोगिलीं. पुढें जवळच उजवे बाजूस त्रेशिनिश ऐलस नांवांचे विलक्षण आकृतीचे खडक आह्मीं पाहिले. ह्यांतून एकाची अगदींच चमत्कारिक आकृति आहे. त्यास दचमान्स क्याप (दच मनुष्याची टोपी.) असें नांव दिलें आहे.



तीन वाजतां स्ताफा नजीक आह्मी नांगरून राहिलों, आणि लागलेंच चार्लस, मुलें आणि बाकीची मंडळी ह्यां सुद्धां लहान नौकेंत बसून गुंफे कडे गेलों. त्या भूशिरास वळसा घातल्यावर एक चमत्कारिक खडक आमच्या नजरेस पडला. त्याचा देखावा फारच विलक्षण आहे. फिंगल नांवाच्या प्रख्यात गुंफेकडे गेलों. तेव्हां असें काय आह्मी एका महान घुमटाच्या दिवाणखान्यांत प्रवेश करीत आहों असें वाटलें. आंत जातांच किंचित् भय वाटलें आणि आमची नौका पाण्याच्या लाटामुळें नाचूं लागली. ही गुंफा फारच उंच आहे. तरी २२७ फुटीहून अधिक लांब नाहीं; आणि तिची रुंदी केवळ ४० फुटी असल्यामुळें ती माझ्या अनुमाना पेक्षां कमी भरली. मुहेंत पाणी फार खोल आहे. पाण्या खालचे खडक हिरवे, निळे, लाल रंगाचे असून ते फारच सुंदर विचित्र दिसत होते. ग्रेतब्रितनची राणी व तिचा भतार व मुलें अशीं सर्व आपल्या निशाणा सहवर्तमान हींत जाण्याचा हा पहिलाच प्रसंग होता, ह्मणून लोकांनीं तीन वेळां हर्षध्वनि केली. तिचा नाद तेथें पुष्कळ गुंगला. आह्मी बाहेर परतून आलों आणि दुसरी गुंफा पाहण्यास कांहींसे पुढें गेलों. ती निराळ्या प्रकारची होती. मग हर्दसमन भूशिर पाहण्यास गेलों. भरतीस आरंभ झाला होता आणि एक तास भर जर आह्मांस उशीर लागला असता तर आमच्यानें आंत जाववलें नसतें.

गलबतावर आह्मी परत आलों, परंतु आलबर्त्त व चार्लस हे पुनः स्ताफा एथें उतरले ते पाऊण तासांत परत आले. तेथून आह्मी ऐओना एथें

गेलों. एथें आलबर्त्त व चार्लस हे उतरले, व एक तासानें आले. मी व दुसऱ्या स्त्रिया चित्रें काढीत बसलों. तारवावरूनच आह्मी सेंत ओरनचें प्राचीन पडकें देवालय पाहिलें. आलबर्त्त व चार्लस हे परत आले; आणि सांगूं लागले कीं, ती पडकी इमारत मोठी चमत्कारिक आहे. तेथें दोन मठ प्राचीन काळीं होते. प्राचीन राजांचे क्रूस व कबरीही तेथें पुष्कळ अढळतात. तें मला केव्हां तरी पाहिलें पाहिजे. आलबर्त्त परत आल्यावर पुनः चालते झालों; आणि नऊ वाजतां तोबरमोरी एथें दाखल झालों. गांवांत चोहींकडे रोषनाई केली होती.

### शुक्रवार, आगस्त ता० २० वी, सन् १८४७.

सकाळीं साडेसात वाजतां आह्मी उठलों तेव्हां पाऊस पडत होता, आणि साडेआठ वाजतां आह्मीं तोबरमोरी सोडली तेव्हां तर मुसळधार लागली होती. मी खालीं गेलें आणि चित्रें काढून रंग भरला. सुमारें साडेदहा वाजतां उघाडी झाली आणि मी वरचे मजल्या वर गेलें. लाखलीन्हेचा देखावा मोठा भव्य आहे. तेथील पर्वत तर फारच सुंदर आहेत. लाखलीन्हे सोडून लाखऐल एथें जाऊन तेथून लाखलेवनचा रस्ता उजवा घालून आह्मी पुढें गेलों. लाखलेवनच्या शेवटीं ग्लेनको आहे. एथला देखावा मोठा सुंदर आहे व एथें तिसऱ्या विल्यमच्या कारकीर्दींत माक्‌दानल्द ह्या घराण्याची मोठी भयंकर कत्तल उडाली ह्याविषयीं हें प्रख्यात आहे.

फोर्त विलयम एथें आह्मी एक वाजण्याच्या सुमारास आलों. हें स्थल फार लहान आहे. दोन प्रहरानंतरची वेळ सुप्रभ होती, व त्या वेळेस जो देखावा पाहिला तोही सुंदर होता. फराळ झाल्यावर आलबर्त्त व चार्लस हे फेरीमध्यें बसून ग्लेनको पाहण्यास गेले, ते सात वाजून वीस मिनिटांनीं परत आले. ग्लेनकोच्या चांगलेपणाविषयीं आलबर्त्त ह्यांनीं जें अनुमान केलें होतें त्याप्रमाणें जरीं तें नव्हतें, तथापि तें बरेंच चांगलें आहे, असें आलबर्त्त ह्यांस वाटलें. तीस मनुष्यें बसतील अशा एका मोठया विलक्षण रथांत बसून ते गेले होते. गांवचे लोकांनीं आलबर्त्त साहेबांस जेव्हां ओळखिलें तेव्हां त्यांनीं आपली इतकी राजनिष्ठा दाखविली कीं, ते घोडे सोडून आग्रहानें आपणच रथ ओढूं लागले.

संध्याकाळीं थंडी अतिशयच पडली होती व पावसाची सर वरचेवर पडे. उद्यां आह्मांस हें गलबत सोडावें लागणार ह्मणून मला फार दुःख वाटतें, ह्यांत आह्मी फार सुखानें राहिलों आहों. आणि पश्चिमेकडील सरोवरें व बेटें ह्यांतील ही आमची सुखकारक सफर संपली, ह्याचेंही दुःख वाटतें. हीं सरोवरें व बेटें फार सुंदर आहेत, व त्यांच्या संबंधीं कवितेच्या गोष्टी, कल्पित गोष्टी, दंतकथांच्या गोष्टी, व इतिहासाच्या गोष्टी पुष्कळच आहेत.

### आर्दवरिकी, लाखलागन सरोवर,

### शनिवार, आगस्त ता० २१ वी, सन १८४७.

हाय हाय! सकाळीं मोठा पाऊस पडत होता. आह्मी नऊ वाजण्याच्या पूर्वींच तारवावरून उतरण्यास तयार झालों होतों, परंतु आमच्या गाड्या आल्या नव्हत्या ह्मणून खोळंबा झाला. शेवटीं फोर्त विलयम एथें आह्मी सर्वजण उतरलों. एथें हैलंदर लोकांचा मोठा समुदाय जमला होता. त्यांनीं आपापले पोषाग केले होते. त्यांचे अघाडीस लार्द लवत व मि० स्तुअर्त मेकेन्झी हे होते. चार्लस् व आपलीं दोन मुलें त्याच्या सहवर्त्तमान आह्मी एथें गाडींत बसलों. आह्मांस निघतांना पाहण्या करितां फार दाटी झाली होती. रानांतून एक आडवळणाची वाट होती त्या वाटेनें आह्मी गेलों. ही वाट पुढें पुढें तर फारच सुंदर आहे. जिकडे तिकडे डोंगर व ओढे आहेत. ह्यामुळें आह्मांस ग्लेनतिल्त नामक दऱ्याची आठवण झाली. आह्मी एकदां मात्र घोडे बदलले. मग पुढें लाखलागन सरोवरा जवळ आलों. तें जरी आह्मी मागें जीं सरोवरें पाहिलीं त्यां पेक्षां लहान आहे तरी सुंदर आहे; व त्याच्या आसपास मोठे सुंदर पर्वत आहेत, व त्याच्या किनाऱ्यावरून जो रस्ता जातो तो फार रम्य आहे. लार्द आबरकार्न ह्यांच्या आर्दवरिकी नांवाच्या वाड्या जवळ येऊन पोहोंचण्याच्या पूर्वींच तो वाडा आह्मीं पाहिला. लागन एथें एकच लहान सराई आहे, व सरोवराच्या कांठीं एक लहानशी तर आहे. एथें पर्जन्य पडत होता तरी पुष्कळ हायलंदर लोक जमले होते. त्यांच्या बरोबर क्लनीचे माकफरसन साहेब व त्याचे तीन लाडके मुलगे, तलकचे देविद्सन, लार्द आबरकार्न, वगैरे मंडळी हायलंदी पोषाग करून आली होती. गाडींतून

उतरून तरीवरून सहा सात पळांत पलिकडे गेलों. नंतर आमचे तट्टांचे गाडींत बसून आर्दवरिकी एथें एका घटकेंत येऊन पोहोंचलों. ही हवेली सरोवराच्या नजीकच आहे. ज्या खिडक्यां जवळ मी आतां लिहावयास बसलें आहें तींतून दिसणारा प्रदेश जरी पर्जन्या मुळें चांगला दिसत नाहीं तरी तो फार सुंदर व केवळ अरण्यमय आहे. दोन अडीच कोशांचे आंत गांव किंवा घर अथवा झोंपडें नाहीं. इकडे येणें झाल्यास तरी-वरून किंवा नौकेंत बसून सरोवरांतून वळवूनच यावें लागतें. हें घर शिकारी करितां जाऊन राहण्यास फार सोईचें आहे. हें दगडी असून त्यास सुंदरशा पुष्कळ खोल्या आहेत. काळविटाचीं शिंगे बाहेरून व दारांत लाविलीं आहेत. दिवाणखान्याच्या व ओसरीच्या भिंतीवर ल्यांदसीर ह्या चितान्याच्या हातचीं चित्रें लाविलीं आहेत.

आर्दवरिकी एथें आमचा मुक्काम झाला त्याविषयीं लिहिण्या जोगें फारसें नाहीं. तो देश फार चांगला आहे; आह्मी तेथें होतों तेव्हां नेहमी पाऊस पडत असे.

अठ्ठाविसावे तारखेस पांचाचे सुमारास तरीवरून सरोवराचे पलिकडे जाऊन आलबर्त्त साहेबांनीं मला गाडींत बसवून किंगस्सी रस्त्यानें फिराव-यास नेलें; आणि एथून वनशोभा भव्य दिसत होती. डोंगर उंच असून दाट झाडीनें आछादलेले आहेत. दऱ्यांतून ओहोळ वाहाताहेत व एका ठिकाणीं एक लहानसा धबधबा आहे. चोहोंकडे कुरणें असून त्यांत लोक गवताची कापणी करून वाळवीत होते व कोठें कोठें झोंपड्या होत्या. त्यामुळें आह्मास थूरिंगनची आठवण झाली. शेतांतील ज्या घरांत कर्नल माकफरसन हल्लीं राहत आहेत तेथें आह्मी गेलों. त्याचें नांव ख्याथ-माशी आहे. मग तेथून घरीं आलों. एकंदर आठ कोसांची सहल झाली. हा अत्यंत सुंदर, वन्य व विलक्षण देखावा पाहून आह्मांस फार संतोष झाला. सभोंवती फार दाट झाडी आहे ह्यामुळेंच तो प्रदेश अधिक शोभिवंत दिसतो.

**बृहस्पतवार, सप्तेंबर ता० १६ वी, सन १८४७.**

क्यालिदोनियम कनाल नामक कालवा पाहण्याकरितां आज सकाळीं सहा वाजतां इन्वर्नेस एथें आण्यास आलबर्त्त साहेब निघाले.

### शुक्रवार, सप्तेंबर ता० १७ वी, सन १८४७.

दोन वाजतां मी मुलांसहवर्त्तमान अर्दवरिकी सोडलें आणि साडे- सहा वाजतां फोर्ट विलियम एथें येऊन पोहोंचलें. तेथें मला आलबर्त्त साहेब तारवावर भेटले. सर्व यथास्थित चाललें होतें, परंतु हवा फार वाईट पडली होती. आलबर्त्त साहेब ह्मणाले, दाखफूर हें फार सुंदर आहे. हें घर नवें सुंदर व सोईचें आहे. पुढें एक छान्दार बाग आहे. आणि मिस्तर व लेदी आर्जिआना बेली हीं बोलून चालून गोड आहेत.

आलबर्त्तास इन्वर्नेस एथें बाल ( नाच ) पाहवयास जावें लागलें. तेथें त्यांचें फारच आगतस्वागत झालें. आज सकाळीं त्यांनीं फाल्स आफ् फोयर्स नांवाचा धबधबा पाहिला, तो फार उंचावरून पडतो व तो मोठा भव्य दिसतो असें ते ह्मणतात. ते अणखी असें ह्मणतात कीं, क्यालि- दोनियन क्यनाल नामक कालवा मोठा पाहण्याजोगा आहे.

### मुक्काम रयन सरोवर,

### शनवार, सप्तेंबर ता० १८ वी, सन १८४७.

पांच वाजतां आह्मी फोर्त विलियम सोडिलें, प्रातःकाळीं हवा चांगली होती; परंतु औळें सुटून बंदरांत सुद्धां समुद्र खवळलेला होता. आह्मी तारवाच्या वरच्या मजल्यावर आलों, तेव्हां आह्मी ऐल आफ् ज्यूरा नांवाच्या बेटा समोर होतों. ह्याचा किनारा फार सुंदर व उभट दिसतो. आह्मी तसेच लाखक्रिनन नामक सरोवरापर्यंत गेलों आणि मग आपल्या लहान नौकेंत उतरलों. एथें समुद्र फारच खवळला होता व पाऊसही पडत होता. परंतु पूर्वी एक महिन्यामागें जेव्हां आह्मी संध्याकाळीं एथें आलों होतों, तेव्हां हवा मोठी छान्दार होती. आह्मी क्रिनन एथें उतरलों. मिस्तर मालकम् ह्यांनीं आमचें आगतस्वागत केलें. एथून समोरच त्यांचा वाडा आहे. आह्मी दाहा वाजतां कालव्याच्या होडीवर चढलों. माग- ल्या खेपेपेक्षां ह्या वेळेस आह्मी जलदीनें चाललों. लोक धांवत येत होतेच व प्रत्येक दरवाज्यावर एकेक ब्यागपैप वाजिवणारा ठेविला होता. पाऊस तर एकधार लागला होता. तशा भर पावसांत बारा वाजतां आह्मी लाख- गिल्पहेद एथें येऊन पोहोंचलों व ब्ल्याक ईगल नामक आगबोटीवर चढलों.

आमच्या गलबताला मल्ल आफ् क्यांतयर ह्यास फिरून वळसा घालून आह्मांस क्यांबलतौन एथें मिळावें असें भाग पडलें. आह्मी आलों तेव्हांच्या आणि आतांच्या हवेंत केवढा फरक हा!

आह्मीं तारूं हांकारिलें आणि किलब्रानन सौंदद व आरन ह्यां वरून चाललों. कांहीं वेळ पर्यंत आह्मी तारवाच्या वरच्या मजल्यावर गेलों होतों, परंतु पावसामुळें पुनः खालीं यावें लागलें; तथापि कांहीं वेळानें तारवाच्या वरच्या मजल्यावर राहतां येई इतका पाऊस कमतावला. आह्मीं पांच वाजण्यास वीस मिनिटें कमी होतीं तेव्हां क्यांबिल तौन एथें येऊन पोहोंचलों. हें क्यांतायरच्या पायथ्याशीं आहे. हें लहान असून सुंदरही नाहीं. आह्मी पोहोंचल्यावर सुमारें अर्ध्या तासानें आमचें गलबत येऊन पोहोंचलें, त्याच्या बरोबर "गार्लंद," "फेरी" आणि "स्कर्ज" ह्या आगबोटी आल्या. लागलेच मग आह्मी गलबतावर चढलों. वाटेंत येतांना गलबताचे फार हाल झाले होते, आणि कपतान क्रिसपिन ह्मणाले कीं, आपण गलबतावर ह्मणजे "विक्तोरिया आणि आलबर्त्त" ह्याजवर नव्हतां ह्मणून बरें झालें. ह्यामुळें व संध्याकाळीं वारा झपाट्यानें वाहत होता आणि आकाशही स्वच्छ नव्हतें ह्मणून उद्यां काय होईल ह्याची धास्ती आह्मांस पडली. आतां पुढें कसें करावें ह्याची पुष्कळ वाटाघाट झाल्यावर शेवटीं असें ठरलें कीं, उदईक चार वाजतां निघावें, आणि जर समुद्र फारच खवळला तर लाखरयन सरोवरांत किंवा मल्ल आफ् ग्यालोवे एथें किंवा बे आफ् रामसे आखातांत जावें; नाहीं तर ऐल आफ् म्यान ह्या बेटांत दगलस एथें जावें.

**मुक्काम लाखरयन सरोवर,**

**रविवार, सप्तेंबर ता० १९ वी, सन १८४७.**

चार वाजतां आह्मी निघालों. गलबत फारच डचमळूं लागलें, परंतु आह्मांतून कोणासही समुद्र लागला नाहीं. सात वाजतां मोठें तुफान होईलसें दिसलें ह्मणून गलबतावरच्या सर्व खिडक्या लावून घेतल्या. आलबर्त्त साहेब नुकतेंच निजून उठले होते, त्यांस लार्द अदालफस ह्यांनीं जाऊन सांगितलें कीं, आतां मोठें तुफान होईल; तेव्हां त्यांनीं थोडेसें मागें परतून लाखरयन सरोवरांत जावें असें ठरविलें. त्याप्रमाणें तेथें जाऊन

आह्मीं साडेआठ वाजतां नांगर टाकला. पाऊस व धुकें इतकें होतें कीं, एथें आह्मीं पूर्वी होतों तेव्हां जें कांहीं सुंदर दिसत होतें, तें आतां ओळखूं देखील येईना.

मागल्या खेपेंत जेव्हां आह्मी लाखरयन सरोवरांत होतों तेव्हां आणि आतां सुद्धां लार्ड आर्कनी ह्यानीं आह्मांस मोठ्या सत्कारानें कांहीं शिकार व निरनिराळ्या प्रकारच्या वस्तु पाठविल्या.

बारा वाजतां लार्ड अदालफस ह्यानीं मंडळी मिळवून ईश्वराची प्रार्थना केली. नंतर आह्मी आमच्या सफरीविषयीं व दिवस फारच खराब आहे, पाऊस एकसारखा पडतो आहे व वाराही मोठ्या झपाट्यानें वाहतो आहे, ह्मणून आतां कसें करावें ह्याविषयीं गोष्टी बोलत बसलों. सर शेवटीं असा बेत ठरला कीं, पुनः तीन वाजतां निघून संध्याकाळीं मल्ल आफ् ग्यालोवे एथें जावें, कारण समुद्र खवळला असला तरी तेथें जाण्यास आह्मांस तीनच तास लागतील. सरोवरांतून बाहेर पडतांक्षणींच आमची आगबोट हेलकावे खाऊं लागली. तेव्हां समुद्र तर खवळून मोठा भयंकर दिसत होता. मला मनस्वीच समुद्र लागला, आमच्या मुलांस किंचित्सा, पण आलबर्त्त साहेबास मुळींच लागला नाहीं. मग कांहीं वेळानें आह्मांस मल्ल आफ् ग्यालोवे दिसूं लागलें, तेथें मोठ्या खडकावर एक दीपस्तंभ आहे. हीच स्कातलंद देशाची व आमची शेवटची भेट.

### सोमवार, सप्तेंबर ता० २० वी, सन १८४७.

सहा वाजतां तारूं हांकारिलें आणि दोन तास झोके खात खात ऐल आफ् म्यान ह्या बेटा नजीक आलों, तेव्हां समुद्र अगदीं स्थिर होता. मग साडेआठ वाजतां रामसेबे नामक आखातांत येऊन नांगर टाकिला.

आलबर्त्त साहेब किनाऱ्यावर उतरले, इतक्यांत सोदर व म्यान एथील मुख्य धर्मोपदेशक व दुसरी कांहीं मंडळी आह्मांस भेटावयास तारवावर आली. आलबर्त्त साहेब बारा वाजतां परत आले आणि एक वाजतां पुनः आह्मीं तारूं हांकारिलें. आमच्या तारवाचें चाक बिघडल्यामुळें प्रथम आह्मांस हळूहळू जावें लागलें व दुसरें कारण असें

होतें कीं, आह्मी लवकर गेलों असतों तर आह्मी आपल्या टिपणाच्या अगोदर येऊन पोहोंचलों असतों.

सात वाजतां आह्मीं फ्लीतवुद बंदरांत नांगर टाकिला. बंदराचें तोंड फारच अरुंद असून मोठें अवघड आहे. आमचें गलबत अगदीं धक्याशीं ओढून घेतलें होतें, नाहीं तर तें भरतीमुळें मागें फिरलें असतें. मी वरच्या मजल्यावर गेलें तेव्हां तेथें एकच हूल होऊन गेली होती. कोणी हिकडून तिकडे धांवत होते, कोणी एकमेकांस हांका मारीत होते, कोणी दोर ओढीत होते आणि दुसरें कांहीं अशाच प्रकारचें तेथें चाललें होतें. तेव्हां संध्याकाळ होती. वारा जोरानें वाहत होता, आणि चित्तास उदास वाटत होतें.

**मंगळवार, सप्तेंबर ता० २१ वी, सन १८४७.**

दाहा वाजतां आह्मी तारवावरून उतरलों, आणि आगगाडींत बसून लंदन शहरास गेलों.

# हैलंद नामें पाहाडी प्रांतांत आमचें राहणें.

### सन १८४८ पासून १८६१ पर्यंत.

जिथें रान माजे; उदी रंग साजे;
जिथें नांदती डंग; शोभा विराजे;
शिरीं जेंवि बोवा जटाजाल ठेवी,
किती दाट फांद्या! दिसे डंग तेंवी. ( १ )
जिथें कडे थोर; नदी खळाळे;
जन्मास ते पूर्वज जेथ आले;
ती भूमि तूं. माय मलाहि पोरा;
हा संव्गडी खष्ट तुझा किनारा. ( २ )
आतां ताडा तोड माझी कराया
आहे कांहो शक्ति कोणास! कां? या.
जैसा पाहें मी तुझा हा पसारा,
आहे ठावा गे! तुझा रंग सारा. ( ३ )
तुझी आजची, गे! दशा काय आहे?
अर्धीची कशी? मी विचारून पाहें.
तरी वाटतें सर्व गेलें असे कीं,
नद्या फक्त, हे डंग आहेत बाकी. ( ४ )

हे मित्र नुस्ते उरले. अरेरे !
त्यांचा मला लोभ तरी खरारे.
झाला कडेलोटचि, दुःख माझे;
पाहा! तरी प्रीति तुझीच गाजे. (५)



**बालमारल एथील जुना वाडा.**

BALMORAL—THE OLD CASTLE.

## बालमारल ह्या स्थलाविषयीं प्रथम मनोग्रह.

**मुक्काम बालमारल,**

**शुक्रवार, सप्टेंबर ता० ८ वी, सन १८४८.**

पावणेतीन वाजतां बालमारल एथें आम्ही येऊन पोहोंचलों. हा वाडा लहान असून सुंदर आहे. ह्याची बांधणी स्कातलंद देशांतील जुने तऱ्हेची आहे. पुढच्या भागीं एक मौजेचा मनोरा व एक बाग आहे, तसीच एक उंच टेंकडी आहे, व त्या टेंकडीवर दाट झाडी आहे. पाठिमागच्या बाजूस देखील झाडी आहे; ती झाडी ह्या वाड्यापासून थेट दी नदी पर्यंत लागून गेली आहे. आणि सभोंवतीं सर्व टेंकड्या लागून गेल्या आहेत.

ह्या वाड्यांत एक लहानसा सुंदर "हाल" आहे, व त्याच्या लगत्यास बिल्यर्ड्स खेळण्याची खोली आहे. मग अवळच जेवण्याची मोठी खोली आहे. माडीवर जाण्यास उजव्या हाताला चांगला रुंद जिना आहे. माडीवर जेवण्याच्या मोठ्या खोलीच्या वर आमची बैठकीची खोली आहे, ही चांगली मोठी प्रशस्त आहे. ह्या ठिकाणीं पूर्वी बसण्याचा दिवाणखाना होता. ह्या खोलीच्या लगत्यास आमची निजावयाची खोली आहे. ह्या खोलीच्या आंतच पोषाग करण्याची एक लहानसी खोली आहे, ती आलबर्त्त साहेबाकडे आहे. डाव्या हाताला दोन चार पायऱ्या उतरल्यावर मुलें व मिस हिल्दयार्द ह्यांच्या तीन खोल्या आहेत. आमच्या स्वारींतल्या बाया खालींच असतात आणि पुरुषमंडळी वरच्या मजल्यावर असते.

वस्तीस उतरतांच आम्हीं फराळ केला, आणि साडेचार वाजतांच पायीं फिरावयास बाहेर पडलों. आमच्या खिडक्यां समोर जी टेंकडी होती व जिच्यावर फार दाट झाडी होती, त्या टेंकडीवर आम्ही चढून गेलों. त्या ठिकाणीं एक दगडाचा वरंडा आहे; आणि त्या वरंड्यावरून सुंदर नागमोडी वाट आहे. एथें उभे राहून खालीं घराकडे पाहिलें म्हणजे मोठी मजा दिसती. डाव्या हाताला लॉखनगारचे सभोंवतालच्या सुंदर टेंकड्या दिसतात, आणि उजव्या हाताला बालातराकडे एक दरी दिसते, त्या दरींतून ही नदी वांकणानें वाहते. ज्यांच्यावर दाट झाडी लागून गेली आहे अशा टेंकड्याही एथें आहेत. ही जागा पाहिल्यानें थूरिंगरवाल्द ह्या जाग्याची आठवण झाली. जिकडे तिकडे निवांत होतें; तेथें आम्हास चिटपाखरूं देखील भेटलें नाहीं; म्हणून इकडे तिकडे पाहिल्यानें आपणास मोठा उपयोग झाला. डोंगरांतले स्वच्छ हवेनें हुशारी वाटली. अशा ठिकाणीं असतां मन स्वस्थ व निष्काळजी होई आणि संसारांतील सर्व दुःखांचा विसर पडे.

जिकडे तिकडे माळरान दृष्टीस पडत होतें खरें, परंतु तें ओसाड नव्हतें. लॅग्गन ह्या स्थळापेक्षां, ह्या ठिकाणीं पीक पाणी चांगलें असून सर्व गोष्टींची सुबत्ता आहे असें दिसून आलें. अणखी एथील जमीन दलदलीची नाहीं, चांगली कोरडी आहे. वाड्याच्या मागल्या बाजूस जवळूनच ही नदी वाहत आहे. पाण्यास ओढ फार आहे; पात्र मोठें सुंदर आहे. ह्या नदीचे कांठीं आम्हीं पायीं फिरलों. इंनवरकाल्दच्या बाजूचे पहाड फारच मौजेचे दिसतात.

साडेसहा वाजतां मी घरीं परत आलें. जवळच्या जंगलांत काळविटें होतीं, त्यांतून कांहीं हातीं लागतील तर पाहवीं, म्हणून आलबर्त्त साहेब बाहेर गेले. परंतु जाऊन कांहीं फळ झालें नाहीं. हीं काळविटें संध्याकाळचे प्रहरीं चरत चरत अगदीं घराजवळ येतात.

# लॉखनगार ह्याजवर चढण्याची पहिली खेप.

शनवार, सप्तेंबर ता० १६ वी, सन १८४८.

साडेनऊ वाजतां आलबर्त्त साहेब व मी मिळून गाडींत बसून निघालों. बालखबुई ह्या ठिकाणाच्या झाडींतील पुलाजवळ गाडी गेली. बालमारल पासून ही बाग अडीच कोश आहे. ह्या ठिकाणीं आमचीं घोडीं माणसें पुढें जाऊन उतरलीं होतीं. एथें आह्मी गाडींतून उतरून घोड्यावर चढलों आणि आमचे बरोबर वाट दाखविण्यास मिस्तर फार्कोर्सन ह्याचा कोणी मनुष्य होता. माक्‌दानल्द ह्मणून दुसरा मनुष्य होता त्यानें अंगांत शिकारी पोषाग घातला होता, व घागरा नेसला होता, ह्मणून तो मोठा चमत्कारिक दिसत होता. ग्रांत ह्मणून तिसरा एक मनुष्य होता. दोन टोपल्यांमध्यें आमचें फराळाचें सामान घेऊन हा तट्टावर बसला होता. बातरबरी ह्मणून चौथा मनुष्य दुसऱ्या तट्टावर बसला होता. सुमारें एक कोशभर ती सुंदर झाडी आह्मांस लागली, मग एक वळण लागलें, मग हळू हळू चढण लागली. जसजसें पुढें गेलों तसतसी मौज अधिक दिसूं लागली. रस्ता मुळींच नव्हता; परंतु पायांखालची जमीन वाईट नव्हती; ह्मणजे शेवाळ होतें, हेंथेर नांवाची वनस्पति होती, आणि दगड होते. आह्मांस बाहेर निघून सुमारें पाऊण तास झाल्यावर आलबर्त्त साहेबांचे दृष्टीस कांहीं हरणें पडलीं. छपून छपून त्यांना मारण्यास ते झट्‌कर निघून गेले. इकडे आह्मी विसावा घ्यावयास थांबलों. ते वेळेवर पोहोंचले असते, पण एका पळानें चुकले. तेथें एक ओढा आहे, त्यांत गोटे फार आहेत. ह्या ओढ्यांचे पलीकडे माझी वाट पहात आलबर्त्त साहेब उभे होते. आमच्या विश्वासू हैलंदर लोकांनीं दगड एकीकडे सारून रस्ता नीट केला, आणि मग मी घोड्यावर बसून तो ओढा उतरून गेलें. थोडीशी वाट

सरल्यावर, मी घोड्यावरून खालीं उतरून कांहीं वेळ पायीं चाललें आणि मग पुनः तट्टावर बसलें. तट्टू माक्दानल्द ह्यानें हातांत धरलें होतें. बेन्‌भूर्द आणि त्याचे सभोंवतीं सर्व कांहीं मोठें सुंदर दृष्टीस पडत होतें, परंतु आह्मी कांहीं अधिक चढल्यावर लौंखनगारचे शेंड्यावर धुकें बसलें आहे, असें दिसूं लागलें. तार्मिगन पक्ष्यांचे मागें लागण्याकरितां आलबर्त्त साहेब मला सोडून गेले, ग्रांतही त्यांचे बरोबर गेला. बाकी सर्व माणसें माझे पाशीं राहिलीं. तीं मला फार जपत होतीं. माक्दानल्द हा फार चांगला व प्रामाणिक माणूस आहे, आणि श्रम करण्यास मागें हटावयाचा नाहीं. आणि बिचारा ब्यातरबरी हाही मोठी काळजी बाळगून वागत असे.

तार्मिगन नामक पक्ष्यांला मी उडतांना पाहिलें. आलबर्त्त साहेबही त्यांचेवर बंदूक झाडीत आहेत असें दृष्टीस पडलें. ते मग पुढें मला दिसेनासे झाले आणि मी पुढें चालू झालें. लॉखनगारचे शेंड्यावर जेव्हां आह्मी जाऊन पोहोंचलों तेव्हां थंडी फार पडली होती, व धुकें फार पडलें होतें. मधलेच जवळचे रस्त्यानें घटका अर्ध्या घटकेनें आलबर्त्त साहेब दोन तार्मिगन पक्षी मारून घेऊन आले. एथें जमीन अगदीं मऊ होती, आणि चालायाला चांगली होती. तेथून आह्मीं खालीं पाहिलें तों नामियन् ह्या गांवाचीं दोन तळीं दृष्टीस पडलीं. टेंकड्यावर उंच असल्या मुळें तीं मोठीं मौजेचीं दिसलीं. आलबर्त्त साहेब अगदीं दमून गेले होते ह्मणून पुनः तट्टावर बसले. मीही थोडीशी पायानें चाललें होतें, जेव्हां लॉखनगारचे शेंड्या जवळ जवळ आह्मी पोहोंचलों, तेव्हां धुक्याचे जणूं दाट ढगाचे ढगच उठले आहेत काय? शंभर दोनशें हातांवर कांहीं वस्तु दृष्टी पडेनाशी झाली. तें शिखर ग्रांतचे घराजवळून चांगलें दृष्टीस पडतें. डोंगराचे शिखराजवळ पोहोंचल्या नंतर आह्मी खालीं उतरलों आणि पायीं चालूं लागलों. पुनः कांहीं कडे तुटलेल्या मोठ्या धोंड्यावरून वरती गेलों, तों तेथें लहानशा कोपऱ्यामध्यें बसण्याजोगी जागा दृष्टीस पडली. एथें आह्मीं फराळ केला. बराबर दोहोंचा अम्मल होता ह्मणून चढून जाण्यास एकंदर चार तास लागले.

परंतु अरेरे! आमचे दृष्टीस कांहींच पडलें नाहीं. थंडी पडली होती, वारा फार सुटला होता, आणि चित्तास उदास वाटत होतें. दोन वाजून

सरासरी वीस मिनिटें झाल्यावर आह्मी परतून डोंगर उतरावयास लागलों. वादळ सुटलें, धुकें पावसा सारिखें होतें, आणि तेणेंकरून जिकडे तिकडे आंधार गुडुप झाला होता. बोमन नांवें मिस्तर फार्कार्सनचा मनुष्य आणि माक्‌दानल्द हे दोन असामी आमचे पुढें चालत होते, ते केवळ भुतां सारिखे दिसले. थोडासा रस्ता आह्मी पायीं चाललों. पुढें मला दम लागला, ह्मणून मी पुनः तट्टावर बसलें. माझें आंग मी शालीनें अगदीं गुंडाळून घेतलें होतें. ज्या रस्त्यानें पूर्वी आलबर्त्त साहेब चढले होते त्याच रस्त्यानें आह्मी खालतीं उतरूं लागलों, तो रस्ता जवळचा होता तरी फारच उभा होता. तट्टू मोठे मौजेनें चाललें, परंतु धुकें फार असल्यामुळें मला कसेंचसें वाटूं लागलें.

तार्मिगन पक्षी सांपडावेत ह्मणून आलबर्त्त साहेब आह्मांस सोडून पुढें चालत होते, परंतु मग त्यांनीं पक्ष्यांचा नाद सोडून दिला. सुमारें सवातास दीडतास आह्मी चालल्यावर जणूं कांहीं चेटक व्हावें, ह्या प्रमाणें धुकें झटकन नाहींसें झालें, आणि एकदम चहूंकडे खालीं लख्ख ऊन पडलें. ह्या जाग्यापासून डोंगराचा शेंडा हजार फूट असावा असा आह्मांस अजमास वाटला. अरे! अरे! काय त्रास हा? तरी ऊन व उजेड पाहून मनाला आनंद वाटला.

डोंगर उतरते वेळेस इंनवरकाल्द, व बालख बुई नांवाचें बन ह्यांज-कडे वरून पाहिलें असतां डोळ्यांस फारच संतोष वाटतो. खालीं बना-मध्यें आमच्या दृष्टीस कांहीं हरणें पडलीं. घोड्यावर बसून आह्मी चा-ललों होतों. पुढें ओढा उतरलों आणि बनाच्या जवळ येऊन पोहोंच-लों. ज्या रस्त्यानें आह्मी वर चढलों होतों त्याच रस्त्यानें खालीं आलों नाहीं, परंतु दुसऱ्या पुष्कळ अवघड वाटेनें खालीं उतरलों. आणि मग बनांतील रस्त्यापासून फाल्स आफ् दी गारभाल्त ह्या नांवाचे धबधब्यांपर्यंत आह्मी पायीं चढून गेलों. हे धबधबे फारच सुंदर आहेत. तेथील खडक मोठे धिप्पाड असून भव्य दिसत होते. आणि तेथील लहान पुलावर व त्याच्या जवळच्या बसण्याच्या जाग्यावर उभें राहून पाहिलें असतां जिकडे तिकडे फारच रम्य दिसत होतें. रस्त्यावरती आमच्या

गाड्या उभ्या होत्या त्या आह्मास अढळल्या. गाडींत बसून आह्मी सहा वाजतांना घरीं परत आलों. कपतान गार्दन, लार्द जान रसल, व सर जेम्स क्लार्क ह्यांची आमची गांठ वाटेवर पडली. आह्मी कोणीकडे गेलों होतों हें पाहण्याकरितां ते आले होते. आह्मी जेव्हां घरीं गेलों, तेव्हां दोघी बाया केव्हां आह्मी घरीं येऊं ह्मणून एक सारिख्या वाट पाहत बसल्या होत्या, असें आह्मांस दिसून आलें.

# बालख बुई एथें गाडींत बसून फिरणें.

सप्टेंबर ता० १८ वी, सन १८४८.

सवा दहा वाजतां बर्ती ह्याला बरोबर घेऊन गाडींत बसून आह्मी निघालों. मिस्तर फार्कार्सन ह्याचे बालख बुई एथील राखणदाराचे घराला मागें टाकून पुढें आमची गाडी गेली, मग आह्मी गाडींतून उतरून घोड्यावर बसलों. बर्ती ग्रांतचे घोड्यावर बसला. त्या घोड्याचें खोगीर सांबराच्या कातड्याचें होतें. अणखी एका हुजऱ्यानें तो घोडा हातीं धरला होता. ग्रांत त्या घोड्याचे बाजू बाजूनें पायीं चालत होता. माक्‌दानल्द आणि दुसरे हुजरे आमचे बरोबर चालले होते. बोमन आणि वृद्ध आर्थर फार्कार्सन हे पुढें चालत होते. हा गृहस्थ इनवरकाल्द एथें हरणाची शिकार करण्याचे कामावर आहे. ह्यानीं आमच्याकरितां एक सुंदर वाट काढली. बालख बुई एथें मोठमोठाले वृक्ष व झाडी झुडी पुष्कळ आहे, त्या मधून ती वाट जाते. सुमारें एक कोश दीड कोश आह्मी चालत गेलों, तों हरणें दृष्टीस पडलीं. आमचे बरोबरचे लोक कानास कान लावून खलबत करूं लागले. जणूं काय लढाईची मसलत चालली आहे! मग आह्मी मागें परतलों, आणि जितके चालून आलों होतों, तितकेच माघारे गेलों; आणि ज्या ठिकाणीं त्या देखरेख करणाऱ्याची वस्ती होती त्या ठिकाणीं पोहोंचलों. पुढें क्रेगदेन ह्याच्या खालच्या दरींतून वळण मारलें. तेथें एक सुंदर बन आह्मांस लागलें. मग त्याच रस्त्याचें धोरण धरून आह्मी पुढें चाललों. सरते शेवटीं त्या पहाडाचे पायथ्याशीं येऊन पोहोंचलों, मग आह्मी सर्वजण गाड्यांवरून उतरलों.

नंतर कड्यासारिखी एक उंच जागा होती, त्या जागीं मेटाकुटी येऊन पोहोंचलों. त्या ठिकाणीं चौकोनी लहानशी पेटी होती; ती ताट्याची केलेली होती. मधून मधून त्यांतून झाडांच्या फांद्या गुंफल्या होत्या. तिची ऊंची सुमारें पांच फूट होती. ह्या ठिकाणीं बर्तीला घेऊन आह्मी जाऊन

बसलों. माक्‌दानल्द हा आमचे जवळचे झुडपांत दडून टपत बसला. दुसरे कांहीं लोक इकडे तिकडे रान उठविण्यास पसरले, व अणखी दुसरे कांहीं लोक कांहींशा अंतरावर उभे राहिले होते. आह्मी हालचाल न करितां मुकाट्यानें बसलों होतों, अणखी थोडकीशी रानाची तस्बीर रेखली. माझ्या पुढें जो प्रदेश दिसत होता त्या प्रदेशाची व मोठे मोठे झाडांची तसबीर रेखण्याचें काम मी केलें, आणि माक्‌दानल्द जो दडून टपत बसला होता त्याची तसबीर आलबर्त्त साहेबानें रेखली. असें हें सुमारें एक तास चाललें होतें. पुढें दुरून कांहीं आवाज ऐकूं आलासा आलबर्त्त साहेबांस वाटलें; आणि दोनचार पळें गेलीं नाहींत तों "माझे दृष्टीस सांबरें पडलीं हो पडलीं" ह्मणून हळूच माक्‌दानल्द बोलला; अणखी तो असें आलबर्त्त साहेबांस ह्मणाला कीं, महाराज, दमानें सावकाश बंदुकीचे नेम धरावे. पुढें सांबरें बाहेर पडलीं, आणि बसलेल्या जाग्यावरून निघून गेलीं, अशी आह्मांस चाऊल समजली. आलबर्त्त साहेबानें पेटीवरून एकदां बंदुक झाडली. सांबरें सारीं उलटून गेलीं, परंतु एका सांबरास गोळी खास लागली असें आलबर्त्त साहेबांस वाटलें. ते धांवत धांवत शिकारी लोकां जवळ गेले. इतक्यांत "सांबर सांपडला हो सांबर सांपडला," असी त्यानें खालून आरोळी ठोकली आणि काय झालें हें पहावयास आलबर्त्त पुढें धांवले; मी जरा थांबलें. मग लवकरच माक्‌दानल्दचे हाताला धरून बर्तीला बरोबर घेऊन हळूच हातपाय टेंकीत टेंकीत मी खालीं उतरलें. तेव्हांच आलबर्त्त तेथें आले आणि पहातें तों आलबर्त्त साहेबानें गोळी मारल्याबरोबर एक मोठें सुंदर व भव्य सांबर गोळी लागून एक शिकारी उभा होता त्याच्या पायाजवळ पडलें होतें. शिकार खूब साधली आणि आह्मां सर्वांस आनंद झाला. माक्‌दानल्द आणि दुसरे शिकारी लोक ह्यांस तर विशेष आनंद झाला. माक्‌दानल्द ह्मणूं लागला कीं, राणी साहेब एथें बाहेर आल्या आहेत ह्मणून आमचें दैव उघडलें. माझा पायगुण चांगला असें ह्या लोकांस वाटतें. हैलंदर लोकांमध्यें पायगुणाचें मोठें माहात्म्य आहे. जेथून आह्मी डोंगर चढलों तेथेंच खालीं परत आलों. गाडीमध्यें बसून अडीच वाजतांना घरीं येऊन पोहोंचलों.



आलत्ना गुइथ साखचीं खिंड. महाराणीनें स्वतः काढलेला नकाशा.

THE SHIEL OF ALT-NA-GIUTHASACH.

AFTER A SKETCH BY THE QUEEN.

# आलत्ना गुइथ्साख एथें आमचा पहिला वास.

आगस्त ता० ३० वी, सन १८४९.

आपलीं पत्रें लिहिल्या नंतर आह्मी घोड्यावर बसून निघालों. मिस-टौंसन, माक्‌दानल्द, ग्रांत, ब्यातरबरी, हामिश कूस इतकेजण आह्मांबरोबर होते. गुदस्तां आह्मी आलों होतों तेव्हां पेक्षां एथील रस्ता चांगला आहे; अझून तरी तो उंच सखल आहे, तथापि नदी नाला उतरावा लागत नाहीं; आणि रस्त्यावर ह्मणण्याजोगी कोणतीही अडचण पडत नाहीं. घोड्यावर बसून सगळी वाट आह्मी चाललों. आलबर्त्त साहेब मात्र सरते शेवटीं पायीं एक कोशभर चालले. गेलिक् ह्मणून एक भाषा आहे, ती माक्‌दानल्द ह्याला फारच शुद्ध बोलतां येते. आह्मी घोड्यावर बसून चाललों होतों, तों माक्‌दानल्दाला विचारून व जेमी कूस बरोबर त्याला बोलायास लावून आलबर्त्त साहेब ती भाषा शिकत होते. आलबर्त्त साहेबांला इकडून तिकडून पुष्कळ शब्दांची माहिती झाली आहे. ती भाषा लिहि-ण्याची तऱ्हा एक, आणि बोलण्याची तऱ्हा एक आहे, ह्मणून शिकण्याला मोठी कठीण पडते.

आमच्या करितां छपरी काढली होती, त्या ठिकाणीं आह्मी दोन वाज-तांना येऊन पोहोंचलों. तेथें पूर्वीं होतें काय आणि आतां झालें काय ? हें पाहून आह्मांस मोठें नवल वाटलें. दोन नव्याच झोंपड्या उठविल्या आ-हेत; एका झोंपडीला लागून एक लांकडी सोपा काढला आहे; एक लहानशी टुमदार जेवण्याची जागा आहे, बसण्याची जागा आहे, निजण्याची जागा आहे, व पोषाग करण्याची जागा आहे. ह्या खोल्या एकमेकांस ला-गून सोईच्या आहेत. अणखी एक धाकटी खोली आहे, तींत क्यारालैन

दॉसनची निजण्याची जागा आहे; तशीच तिचे दासीची निजण्याची जागा आहे. अणखी अन्न, पाणी, दहीं, दूध, झांकून ठेवण्यासाठीं एक जागा आहे. दाहा वीस हातांच्या अंतरावर दुसरी झोंपडी आहे, तींत स्वयंपाक करण्याची जागा आहे. ह्या ठिकाणीं लोक बहुधा बसत असतात. दुसरी एक खोली आहे, तींत आमचे चाकरलोक जेवणखाण करीत असतात. दुसरी एक जागा आहे, ती कोठी ह्मटली असतां चालेल. आणि एक माळा आहे, त्यावर आमचे चाकरलोक निजतात. माझी दासी मार्गरेतफ्रेंच, कारोलैनची दासी आणि आलबर्त्त साहेबांचा खिदमतदार, लोहलैन एक स्वयंपाकी, शाकल नांवाचा पाईकआणि माग्दानल्द; इतके लोक आमच्या बरोबर आमच्या घरांत आहेत. ह्मातारा जान गार्दन आणि त्याची बायको हींही आहेत. आमच्या जाग्याच्या भिंतीला व छताला मोठे मजेचे कागद लाविले आहेत, आणि घरांतील सामान फार चांगलें आहे. आह्मीं येऊन पोहोंचतांच फराळ केला. तीन वाजतां हवा खाण्यास बाहेर पडलों, वीस मिनिटें चालल्या नंतर म्युइख ह्मणून एक तळें आहे तेथें गेलों. कोणी लोक असें ह्मणतात कीं, म्युइख शब्दाचा अर्थ काळोख किंवा दुःख असा आहे. ह्या ठिकाणीं एक मोठी होडी सांपडली, तींत आह्मी बसलों. माकदानल्द, दंकन्, ग्रांत, कूल्स इतकेजणांनी त्या होडीला वल्हीं मारलीं. जाळीं घेऊन दुसरे एका होडीमध्यें बसून ह्मातारा जान गार्दन आणि दुसरे दोघेजण मिळून निघाले. वल्हीं मारीत मारीत ते त्या तळ्याचे शेवटास जाऊन पोहोंचले. वरतीं पलीकडचे बाजूला धूलाख ह्मणून एक तळें आहे त्या तळ्यांतुन निघून म्युइक नदी वहात वहात ह्या ठिकाणीं येती.

जिकडे जिकडे नजर लावावी तिकडे तिकडे सर्व कांहीं सुंदर आहे, असें दृष्टीस पडतें. झाडा झुडांची व रानाची ठेवण मोठी ढपदार आहे, हैलंद देशाची काय जी मौज ती एथें खरोखर दिसून येते. भोंवतालची जमीन उंच आणि मध्येंच सखल ठिकाणीं झाडें आहेत. होडीमध्यें व होडीच्या बाहेर आह्मांला बऱ्याच झटापट्या खाव्या लागल्या. तीन ससाणे दृष्टीस पडले व त्रौत ह्या जातीचे सुमारें सत्तर मासे धरिले. कोणी एकादा कुशल तसबीर काढणारा कारागीर ह्या ठिकाणीं ह्या वेळीं असता, तर बरें

झाले असतें. ती होडी, तें मासे धरण्याचें जाळें, ते चोळणे घालून पाण्यांत शिरलेले लोक, किनाऱ्यावर उभे राहिलेले लोक, वा! काय मौज! जणूं काय त्याचें चित्रच काढून घ्यावें. परत बातांना आलबर्त्त साहेबानीं वल्हें मारलें आणि माक्दानल्दानें सुकाणू धरिलें. जागोजाग नानाप्रकारचा अत्यंत सुंदर प्रकाश पडत असे त्याची मोठी मौज वाटली.

सवासात वाजतां आह्मी घरीं आलों आठ वाजतां जेवण केलें. लोहलैन, माक्दानल्द, शाकल, ह्यानीं ढ७या बिढण्याचें काम केलें. जेवल्या नंतर कारोलैन दासन हिच्याशीं आधळे तिरळे खेळलों. मग लहानशा बागेंत हवा खात इकडे तिकडे फिरलों; जिकडे तिकडे सामसूम होतें, फर झाडांच्या पानांचें हालणें एवढाच काय तो आवाज, येणेंकरून मनाला धाक बसायाचा.

# आबर् गेल्दींचें रान काढणें.

सप्तेंबर ता० ३ री, सन १८४९.

सवा अकरा वाजले होते तेव्हां आह्मी गाडींत बसून निघालों. आमच्या बरोबर जाणारे तिघेजण गृहस्थ दुसऱ्या गाडींत बसले. लार्द पोर्तमन आणि आह्मी मिळून परवां ज्या रस्त्यावरून गेलों होतों, त्या रस्त्यापाशीं येऊन पोहोंचलों. तेथून एक लहान वाट फुटली, ह्या ठिकाणीं गाडी सोडून देऊन मी घोड्यावर बसलें. आलबर्त्त साहेब आणि दुसरे कांहींजण पायीं चालूं लागले. पुढें गिनाखायल् ह्या जागीं आह्मी आलों. ह्या ठिकाणचा भव्य देखावा पाहून आलबर्त्त साहेबाच्या मनाला फारच आनंद झाला. जागोजाग नानाप्रकारचा अत्यंत सुंदर प्रकाश पडत असे त्याची मोठी मौज वाटली. परंतु ऊन मोठें कडक पडलें होतें त्यामुळें फार उकडत होतें.

माळावर गेल्यावर आह्मी उजवे हाताकडे वळलों. मग मी घोड्यावरून उतरून पायीं चालूं लागलें. एक मोठा थोरला दगड होता त्याचे आड आह्मी बसलों. आह्मांबरोबर माक्दानल्द मात्र होता. तो बंदुका भरून तयार करी आणि एखादें जनावर बिनावर दृष्टीस पडलें ह्मणजे कळवी, असें करीत तो जमिनीसरसा पडून राहिला होता. आमचे बराबरचे गृहस्थ खालीं रस्त्यावर उभे होते. त्यांनीं रान हांकिलें परंतु कांहीं जनावर बाहेर पडलें नाहीं ह्मणून आह्मी पुढें चालू झालों आणि एका दरींत उतरलों. ही दरी फारच सुंदर होती आणि ह्या ठिकाणीं दाट सुंदर झाडी लागून गेली होती. आह्मी हातपाय टेंकीत टेंकीत उतरलों. मग पुनः हातपाय टेंकीत टेंकीत मोठ्या मेठाकुटीं येऊन दरीचे

दुसऱ्या बाजूवर चढलों आणि दडून बसलों. अशा प्रकारचें रान हुसकविण्याचे झपाट्यांत आलबर्त्त साहेबानें एका हरणीस गोळी घालून मारिलें आणि मला वाटतें कीं, दुसरीं हरणें त्यानें मारलीं असतीं परंतु मध्येंच एक विघ्न उद्भवलें. एक ह्मातारी अकस्मात् तेथें आली. तिचें रूप डाखणी सारखें होतें. बंगलांतून अक्राळ विक्राळ कुबड्या टेंकीत निघाली. तिनें साऱ्या शिकारीची मौज बिघडली. अशी बाई आलबर्त्त साहेबा पुढें येते तों त्यानें त्या हरणीस गोळी घातली. तो आवाज ऐकून ती बाई फारच दचकली. आमचे जवळचे लोकांनीं तिला खालीं यावयास सांगितलें. मग ती खालीं निघून गेली, आणि निमूटपणें रुमालानें डोकें गुंडाळून दरीमध्यें बसली. रान काढणाऱ्या मंडळी पैकीं दोघेजण खालीं उतरून आले तेव्हां आलबर्त्त साहेबानीं त्यांना सांगितलें कीं, ती हरणी उचलून घ्या. ते प्रथम ती ह्मातारी पाहून दचकले. वा! ही मोठी पाहण्याजोगी मौज झाली. मग मी घोड्यावर बसून थोडीशी वाट चाललें. तेथें एक दारूची भट्टी होती. भट्टीचे शेजारी एक बंगल होतें, त्या बंगलाचे मागचे बाजूस एका झुडपाचे आड आह्मी बसून राहिलों, पण ह्या वेळीं रान उठवण्यापासून कांहीं हांशील झालें नाहीं. जवळच एक काळा कोंबडा आलबर्त्त साहेबानें मारिला. मग दुसऱ्यांदा रान उठवण्याचें सुरू झालें. सव्वातीन वाजतां आह्मी सर्वजण घरीं परत आलों.

## धूलॉख वगैरे ठिकाणीं जाणें.

सप्तेंबर ता० ११ वी, सन १८४९.

प्रातःकाळ झाला होता; हवा फार चांगली पडली होती; आकाश निरभ्र होतें. जर्मन् भाषेमध्यें थोडीशी कविता मुलांकडून मी पाठ ह्मणवून घेतली. लेदी दुरो ह्या बाईस घेऊन आह्मी गाडींत बसून दहा वाजतां बाहेर जावयास निघालों. इंचबाबर्द हें मार्गें टाकून आमची गाडी पुढें गेली. बिर्खाल ह्या ठिकाणीं गाडीचे घोडे बदलले. लिन आफ् म्युइख ह्या नदीच्या कांठीं गाडी क्षणभर उभी केली. ह्या ठिकाणीं आमचे घोडे दृष्टीस पडले, मग गाडी सोडून देऊन आह्मी घोड्यावर बसलों. नदी उतरून गेलों आणि लवकरच एक झोंपडी जवळ पोहोंचलों. ह्या ठिकाणीं फक्त क्षणभर थांबून पुनः एकदम घोड्यावर बसलों, आणि ग्रांत, माक्दानल्द, चार्ली कूत्स, जेमी कूत्स आणि जान ब्रौन ही इतकी मंडळी आमचे बरोबर होती. माक्दानल्द हा माझा घोडा धरून चालला, हा आमचे फार उपयोगीं पडला, व हा मोठा दक्ष आहे. जेमी कूत्स हा लेदी दुरोचा घोडा धरून चालला. अणखी जान गार्दन हा ह्मातारा मनुष्य आमचा वाटाड्या होता. ह्या घराला लागून पाठीमागचे बाजूला एक टेंकडी आहे, ती आह्मी चढूं लागलों, तेव्हां साडेबारांचा अम्मल होता. टेंकड्यांवरून चालतां चालतां वरतीं पुष्कळ उंच चढून गेलों. तेथून जिकडे पाहवें तिकडे फार मजा दिसत होती. डोंगराच्या पायथ्याला लागून सरोवर आहे आणि तेथून पलीकडील बाजूला ग्लेनम्युइख दृष्टीस पडत होतें. अहा! हा! काय नजर दूर पोहोंचत होती. परंतु रस्ता अधिक वाईट वाईट लागत चालला. ग्लासाल्त नांवाचा ओहोळ जेव्हां आह्मी उतरलों, तेव्हां तर रस्ता फारच वाईट लागला. हा ओहोळ त्या सरोवरास मिळतो. हा ओहोळ तुडुंब

भरून चालला होता, पाऊस पुष्कळ पडला होता, ह्मणून नद्यांना व ओहळांना पूर आले होते; आणि जमीन दलदलीत झाली होती. आह्मी घोड्यावर बसून खोन नांवाच्या पहाडावरून शेंड्यावरतीं गेलों तेव्हां वारा मोठ्या जोरानें वाहत होता. पहिल्या पासून आलबर्त्त पायींच चालत होते. त्यानीं एक ग्रीस नांवाचा पक्षी व एक ससा शिकार करून मारिला. झाडाझुडांतून पुष्कळ ससे बाहेर हुसकटून काढिले. धूलॉख ह्या तळ्याचे कांठीं डगरींत एक खबदड होती, त्या ठिकाणीं आह्मी पायीं चालत चालत जाऊन बसलों. साडेतीन वाजतां तेथें बसून फराळ केला. त्या तळ्याची लांबी सुमारें अर्ध कोश आहे आणि तेथें झाडेंझुडें, डोंगर रान पुष्कळ आहे. खडकाचे ढिगाऱ्यांचे ढिगारे लागून गेले आहेत व उभे मोठे कड्याचे कडे तुटून पडले आहेत.

एक अर्धा तास झाल्यावर आह्मी घरीं जाण्यास निघालों. आह्मी म्युइख नदीच्या कांठानें थेट खालीं आलों. मोठमोठ्या दगडींवरून आणि खडकांवरून, दरींतून ही नदी खालीं वाहते, तेणेंकरून मोठी शोभा दिसते. आह्मी घोड्यावर बसून खालीं उतरलों. पुढें ग्लासाल्त ओहळ लागला त्याचा उतार नागमोडीच्या वळणा सारखा आहे. आयास केल्या-वांचून ओहळ उतरतां येत नाहीं, ह्मणून आह्मांस घोड्यावरून खालीं उतरावें लागलें. रस्ता खरबरीत होता. ज्या वाटेनें आह्मी गेलों त्या वाटेपेक्षां ह्या वाटेला चिखल कमी होता. लाखनगार ह्या नांवाच्या घोडयावर मी प्रथम बसलें होतें; परंतु तें पाणथळ रान पाहून तो बुजतो असें वाटून मी त्याला सोडून कर्नल गार्दनचा घोडा होता, त्यावर बसलें. परंतु गार्दनचा घोडा छातींत फुटला होता, व दलदलीत जमिनींत चालतां चालतां त्याची त्रेधा उडाली, ह्मणून ह्याचाही मला मोठा त्रास आला.

त्या सरोवराचे कांठीं येऊन पोहोंचण्यास फक्त एक तास लागला. संध्याकाळ झाली होती, हवा फार चांगली पडली होती. परंतु त्या सरोवरावर मोठा दांडगा वारा सुटला होता, ह्मणून होडी कांहीं चालेना. होडीमध्यें बसणें हें मला नीट वाटलें नाहीं. आह्मी होडीवर चढलों होतों खरे; परंतु खालीं उतरावें असें मी ह्मणूं लागलें, माझ्या पोटांत

इतकी भीति पडली होती. लेदी दूरो ह्या बाईचें ह्मणणेंही माझे सारिखेंच पडलें, ह्मणून आह्मी होडींतून खालीं उतरलों आणि घोड्यावर बसून घरीं जावयास निघालों. त्या सरोवराचे कांठानें मेंढरें जाण्याची लहानशी वाट होती, ह्या वाटेनें आह्मांस घरीं पोहोंचण्यास पाऊण तास लागला. वाट चिंचोळी असून भारी उखर वाखर होती. तळ्याला लागून एक टेंकडी होती, त्या टेंकडीचे कांठानें ही वाट जाती. ह्या वाटेवरून त्या टेंकडीची उंची सुमारें सातशें फूट होती. आणि ह्या वाटेपासून त्या सरोवराचा कांठ आजमासें शंभर फूट खोल होता. असें असतांही आपल्या झोंपडीपाशीं सात वाजावयास वीस मिनटें कमी आहेत तों आह्मी सुरक्षित येऊन पोहोंचलों. वाटेवरल्या ज्या अडचणी लागल्या व जे धक्के खावे लागले, त्या सर्वांतून आह्मी पार पडलों, कांहीं इजा झाली नाहीं, ही ईश्वराची कृपा. आलेलें संकट निवारण झालेंसें पाहून मनास आनंद वाटतो.

लेदी दूरो ह्या बाईस बरोबर घेऊन आठ वाजण्याचे पूर्वी आह्मी जेवण केलें. मग तिच्याशीं गंजिफा खेळलों.

ह्मातारा जान गार्दन ह्याचें भाषण ऐकून आलबर्त्त साहेबाचे मनास करमणूक झाली. बोलतां बोलतां जो आह्मांस वाईट रस्ता लागला होत त्याची त्यानें गोष्ट काढिली. तो ह्मणाला, “ ती वाट कांहींशी उभी आहे आणि कांहींशी खरबरीत आहे, एवढेंच कायतें तीमध्यें सर्वोत्कृष्ट आहे.” त्याचे पोटांतला अभिप्राय ती वाट अगदीं वाईट आहे असें ह्मणण्याचा होता. त्यानें हें जें उत्तर दिलें तें त्याचें त्यालाच साजतें; इतकें खुबीदार होतें.

# बेन्नाभूर्द नांवाचे डोंगरावर चढून जाणें.

सप्तेंबर ता० ६ वी, सन १८५०.

साडेदहा वाजतां लेदी दूरो, अर्नेस्त लैनिन्गेन* आणि आह्मी बाहेर आवयास निघालों. गाडींत बसून इन्वरकाल्द एथपर्यंत गेलों. हें ठिकाण आमचे घराचे पलीकडे सुमारें पाऊण मैलावर आहे. आमचीं घोडीं माणसें पुढें गेलीं होतीं, तीं ह्या ठिकाणीं आमची वाट पाहत होतीं. अर्थर फार्क्वार्सन, शेवीन, अणखी दुसरे कांहींजण हेही एथें होते. थोडीशी वाट आम्ही पायीं चाललों, मग घोड्यावर बसून बेन्नाभूर्द एथें जाण्याच्या चढणीवर चालूं लागलों. लाखनगार नांवाचा माझा तट्टू ह्याची काढणी माक्‌दानल्द ह्यानें धरिली होती. लेदी दूरो ह्या बाईच्या तट्टाची काढणी जेमी कूल्स ह्यानें धरिली होती. रस्ता चांगला होता. बहुतकरून चिंचोळा होता खरा, परंतु चांगला बांधलेला होता; तरी बांधण्याचें काम शेवटाला गेलें नव्हतें. कोश सवाकोश बांधण्याचें राहिलें होतें ह्मणून पुढें वाट उभी व खडकाळ लागला. ह्या ठिकाणीं जें पाहवें तें सुंदर दिसत होतें. पहिल्यानें एका दऱ्यांतून गेलों त्या दऱ्यांतून ग्लासाल्त नदी वाहते. फार्क्वार्सन नामक घराण्याचा फिन्ला नांवाचा मूळ पुरुष होता, तो ज्या घरांत जन्मला त्या घराचा एक दगड अद्यापि लोक दाखवितात. पुढें गेलें ह्मणजे एक दरी लागते, तिचें नांव स्लगन आहे. स्लगन ह्या शब्दाचा अर्थ "गट्टकरणें" असा होतो. ह्या दरीमध्यें मोठे मोठे कडे तुटलेले आहेत, खडकांचे मोठे ढिगारांचे ढिगार पडलेले आहेत, अणखी ही दरी अगदीं चिंचोळी आहे. ह्याच्याही जरा अणखी पुढें गेलें ह्मणजे

* आमचा पुतण्या.

देश खुला होतो. त्याचे डाव्या बाजूला बेन्नाभूर्द ह्या नांवाचा डोंगर जणूं उभाच राहिला आहे असें वाटतें. मग पुढें फारेस्त आफ् मार ह्या नांवाचें बन लागतें. लार्द फैफ ह्या गृहस्थापासून ड्यूक आफ् लीद्स ह्यानीं हें बन भाड्यानें घेतलें आहे. इनवरकाल्द ह्यापासून बेन्नाभूर्दचे शेंड्याला जाण्याचे अर्ध्या वाटेवर एक झोंपडी आहे, ती मोठी नीट नेटकी आहे. शिकार करितांना शिकारी लोक ह्या ठिकाणीं विसांवा घेतात. त्या झोंपडीचें नांव स्लगनकातेज आहे. कोइख ह्मणून जी एक नदी उतरावी लागली, ती एथून खालीं वाहते. बांधलेल्या रस्त्याचा शेवटला भाग एका टेंकडीचे माथ्याच्या कडेवरून आहे, त्याची चढण लांब व उभी आहे. ह्या टेंकडीचे नांवाचा अर्थ "दांताचा खडपा" असा आहे. ह्या सर्व नांवांचा अर्थ माक्दानल्द ह्यानें आह्मांस सांगितला. बांधलेली वाट संपल्यावर जी चढण लागते तिजवर दगड फार आहेत, व खरोखरच ती नुस्त्या ग्रानित ह्या नांवाच्या दगडाची आहे. आलबर्त्त साहेब पायीं पुष्कळ चालत होते; आणि जेव्हां रस्ता उंचसखल लागला, तेव्हां आह्मी बाया मंडळी घोड्यांवरून खालीं उतरलों. एथून डोंगराचा शेंडाही फार दूर नव्हता. पुढें केर्नगार्मस ह्या नांवाचे लहान लहान असंख्यात दगड लागले. हे दगड वेचावयाचें काम आह्मीं सुरू केलें. आह्मांस कांहीं सुंदर दगड सांपडले. डोंगराचे माथ्यावर चढून गेलों, तेथें ती जमीन अगदीं सपाट असून केवळ पाषाणमय आहे. कोठें कोठें ओलें शेवाळ आहे. ग्रानेत ह्या नांवाचा दगड एथें अढळण्यांत आला नाहीं, परंतु डोंगरमाथ्याचे खालीं जरा सरकलें ह्मणजे तो पुष्कळ दृष्टीस पडतो. एथें दगडाचा एक वरंडा होता त्यावर बसून आह्मीं फराळ केला. वारा फारच गार सुटला होता, परंतु जरा वाऱ्याचे आड झालें ह्मणजे उष्मा फार होत होता. डोंगराचे माथ्यावरून मोठा भव्य देखावा दिसतो. तेथून दृष्टि फार लांब पोहोंचते. बेन्नाभूर्द डोंगराची उंची तीन हजार नऊशें चाळीस फूट आहे. बेनीघ्लो हा डोंगर साफ तेथून आमचे दृष्टीस पडत होता. दुसरे कडले अंगाला अगदीं जवळ लागून केर्नगार्म आणि बेनम्युइखधुई हे डोंगर स्पष्ट दृष्टीस पडत होते. आणि मोरेफर्थ नांवाची खाडी दिसली, व दुर्बिणींतून गलबतें देखील दृष्टीस पडलीं, आणि पलीकडचे बाजूला लाखनगार ह्या

नांवाचा पर्वत दिसला. आहा! हा! सर्व डोंगरांचा हा डोंगर शिरोमणि असें ह्मटलें तर साजेल.

फराळ झाल्यावर आह्मी खालीं उतरूं लागलों. बांधलेल्या रस्त्या पर्यंत आह्मी पायीं चाललों, पुढें घोड्यावर बसलों. उतरतांना वाट सहज सरली; माझा घोडा भारी घाईघाईनें चालला खरा, तरी तो केव्हां केव्हां कुलुलीला येत असे. स्लगन ह्या नांवाचे ठिकाणीं सुंदर चुमुकले, पाणीदार, पैलूदार स्फटिक आलबर्त्त साहेबांना सांपडले. राहिलेली वाट आलबर्त्त साहेब पायीं चालले. आह्मी बाया घोड्यावरून उतरल्यावर अर्ध पावकोश पायीं चाललों, मग आमची गाडी आह्मांस मिळाली. त्या इनवरकाल्द पासून बेन्नाभूर्दचा शेंडा नऊ मैल आहे, त्यावरून निदान आमचे अठरा मैल घोड्यावर बसून व पायीं मिळून चालणें झालें. आमचे ह्या सहलीनें आह्मांस फारच आनंद झाला. आह्मी गाडींत बसलों तेव्हां सहा वाजले होते आणि सुमारें सवासहा वाजतां घरीं येऊन पोंहोंचलों.

# मंडळीचा जमाव.

**सप्टेंबर ता० १२ वी, सन १८५०.**

आह्मीं लवकरच फराळ केला आणि अडीच वाजतां बाहेर पडलों. आमची सारी मंडळी व मुलें बाळें आह्मांबरोबर निघालीं. लेदी दूरो मात्र नव्हती. ब्रेमार क्यासल एथें मंडळी जमली होती तिकडे आह्मी गेलों. गतवर्षींही आह्मी असेच तिकडे गेलों होतों. दफ्, फार्कार्सन, लीद्स ह्यांच्या घराण्यांतले लोक आणि त्यांचे घरीं पाहुणे जे आले होते ते, अशी सारी मंडळी जमली होती. कपतान फार्बस हाही तेथें आला होता, त्याचे पदरचीं चाळीस मनुष्यें आलीं होतीं. हे लोक स्त्राथदान ह्या ठिकाणाहून आले होते. आमचे पदरचे कांहीं लोकही एथें आले होते. नेहमींप्रमाणें ही मंडळी एथें खेळ खेळली. ती येणेंप्रमाणें. १ "दगड झोंकण्याचा खेळ," २ " हातोडा व गदा फेकण्याचा खेळ," आणि ३ "दौड मारण्याचा खेळ." क्रेगक्युनिख ह्या टेंकडीवर दौड मारिली, साडेसहा मिनिटें झालीं नाहींत तों दौड पुरी झाली. दंकन ह्मणून आमचा हुजऱ्या आहे, तो रूपानें चांगला असून जवान व चपळ आहे. त्यानें ही दौड जिंकिली, हें पाहून आह्मां सर्वांस आनंद झाला. त्याचे बरोबर पळणाऱ्या सगळ्या मंडळीस त्यानें मागें टाकिलें. आणि निघालेल्या जाग्यापासून दौड समाप्त होई तोंपर्यंत तो एकसारखा पुढें होता. हें दवडीचें काम ह्मटलें ह्मणजे भारी श्रमाचें आहे. मिस्तर फार्कार्सन त्या दंकनाला घेऊन मजजवळ आला. दौडमारणारे अठरा एकुणीस जण होते. ते निरनिराळ्या रंगाचे घागरे नेसले होते. अणखी पांढरे कमीज आंगांत घातले होते. ( कारण दौड मारते वेळीं सर्व लोक आपले अंगरखे काढून टाकितात. ) मग ते लोक जंगलांतून धक्के खात-

खात पळाले. जंगलाचे शेवटाकडून ते हळू हळू दृष्टीस पडूं लागले आणि पुढें ते टेंकडीवर चढले. अशा प्रकारें त्या लोकांस पळतांना पाहून आह्मांस मोठी मौज वाटली.

हा खेळ झाल्या नंतर आह्मी वाड्यांत गेलों आणि तेथें थोडासा नाच पाहिला. मिस्तर फार्कार्सन ह्याचे मुलांनीं आणि दुसरे कांहीं मुलांनीं रील नांवाचा नाच केला. तेणेंकरून तर मोठी मौज वाटली. जान अथोल, मिस्तर फार्कार्सनचा चवथा मुलगा, ह्यानें "घिली कालम" नांवाचा नाच केला. हा खेळ तर पाहण्याजोगा झाला. सगळीं बाराजण मुलें एथें होतीं. त्यांमध्यें दोन वर्षांचें तान्हें बाळही होतें.

पुढें ब्रेमार ह्या ठिकाणीं माझी आई, चार्लस व अर्नेस्त, हे येऊन आह्मांस मिळाले. मामाला ( आईला ) तर हा खेळ फारच आवडला. ह्याचे पूर्वी तिनें स्कातलंद देश कधींच पाहिला नव्हता. नाच झाल्यावर आह्मी वाड्यांतून निघालों.

# सामन मासे भाल्यानें मारणें.

**सप्टेंबर ता० १३ वी, सन १८५०.**

चार्ल्स अणखी आमचे मुलगे बरोबर घेऊन आह्मी पायीं चालत निघालों. आमची मुलगी विकी ही आह्मांबरोबर होती. ज्या ठिकाणीं नदीला पूल आहे त्या ठिकाणीं आह्मी गेलों. आमची सारी रयत मंडळी हातामध्यें लांबलांब काठ्या व भाले घेऊन आली होती. सामन नांवाचे मासे धरायाचे होते. हे सारे लोक नदीमध्यें शिरले आणि पाण्यामध्यें वरतीं व खालतीं असें फिरत सुटले. दगड लागले ह्मणजे ते त्यांच्या खालीं काठ्यानीं ढोशीत. तेथें कांहीं लोकांनीं जाळें लाविलें होतें त्या जाळ्यांत ते मासे शिरत. सुमारें शंभर लोक नदीमधून फिरत होते. कांहीं जणानीं चोळणे घातले होते व हातांमध्यें काठ्या व भाले घेतले होते. साऱ्या मंडळीमध्यें मोठी गडबड चालली होती हें पाहून आह्मांस मोठी मजा वाटली. ह्या ठिकाणीं एकही मासा हातीं लागला नाहीं. मग आह्मी नदीच्या जरा वरच्या बाजूस सरकलों, आणि ही जागा सोडून दुसरी आणि ती सोडून तिसरी अशा दोन चार जागा पाहिल्या, परंतु एक देखील मासा हातास लागला नाहीं. एकदोन होते परंतु ते निघून गेले. एका दगडावर आलबर्त्त साहेब उभे राहिले होते. कर्नल गार्दन आणि लार्द जेम्स मरे हे सारावेळ पाण्यांत फिरत होते. दंकनानें काल पुष्कळ श्रम केले होते व जमलेल्या मंडळीकडे चालत गेला व आला तरी तो आज सारा दिवस पाण्यामध्यें फिरला. पुढें वस्त्रें धुण्याच्या जाग्या जवळच आमचीं माणसें मासे धरूं लागलीं व मासे सांपडतात कीं नाहींत हें पाहूं लागलीं. एका ठिकाणीं नदींत फार खोल डोह होता, त्यामध्यें

दोघेजण गैर माहितीनें शिरले, आणि त्यांतील एकास तर मुळींच पोहतां येत नव्हतें. पुढें एकाएकीं ते बुडतात असें आमच्या दृष्टीस पडलें. पुष्कळ मंडळी नदीमध्यें होती खरी! पण एका निमिषांत त्या दोघांजणावर बुडून मरण्याचा प्रसंग जणूं आला. "अरे! धांवारे! धांवा" अशी ओरडा-ओरड झाली. पुढें सारे लोक एकदम त्या नदीच्या कांठावर धावूं लागले, त्यामध्यें आलबर्त्त ही होते. असा हा प्रसंग पाहून मला फारच भय वाटलें. माझें चित्त ठिकाणीं नव्हतें आणि भयानें वेडी होऊन मी लार्द कारलैल ह्याच्या हातास झोंबलें. इतक्यांत दाक्तर राबर्तसन पाण्यामध्यें शिरून पोंहत पोंहत त्या बुडणाऱ्या मनुष्या जवळ गेला आणि त्याला ओढून बाहेर काढिलें. असें झाल्यावर सर्व मंडळी स्वस्थ झाली. तथापि हा मोठा भयंकर प्रसंग खरा.

त्या मासे धरणाऱ्या मंडळींतून एकानें एका माशास भाला मारिला. पुढें आह्मी नदीला उतार होता तेथें गेलों व जाऊन फळही झालें. सात मासे सांपडले; त्यांतून कांहीं जाळ्यानें धरिले व कांहीं भाल्यानें मारिले. आलबर्त्त साहेब कांहीं वेळ पाण्यामध्यें उभे होते खरे, पण त्यांचे हातास एक देखील मासा लागला नाहीं. आहाहा! ह्या ठिकाणीं काय शोभा दिसत होती! लोकांची काय गडबड चालली होती- जणूं काय ह्या जाग्याची तसबीरच काढून घ्यावी अशी ही जागा दिसत होती. अरेरे! लान्दसीर ह्मणून जो एक तसबीर काढणारा होऊन गेला, त्या सारखी मला तसबीर काढतां येती तर बरें होतें. ऊन मोठें कडक होतें. बारावर तीन वाजल्या नंतर आह्मी परत आलों. मग आह्मीं फराळ केला. नंतर दचेस आफ् गार्दन पुढें आह्मांस भेटावयास आली आणि ती अजून आमच्या एथें बसली आहे तों इकडे कपतान फार्बस ह्यानें आपली मंडळी घेऊन आमच्या जमीनवाडीमध्यें कवाईत चालविली. अघाडीस ब्यागपैप वाजविणारे लोक चालले होते. ही कवाईत त्यानें मला विचारूनच केली. ही कवाईत करणारे लोक तीन वेळ थांबले आणि त्यानीं तीन तीन वेळां टोप्या काढून व वर फेंकून जयजयकार केला. मग एकदम चाल करून ते निघून गेले. ब्यागपैपांचा घोष चालला

होता व दुरून मनुष्यांचा शब्द ऐकूं येत होता, तेणेंकरून आह्मांस मोठा आनंद झाला.

कपतान फार्बसच्या साऱ्या लोकांना आमच्या लोकांनीं पाठुंगळी घेऊन नदी उतरून अलिकडे आणिलें, असें आमच्या ऐकण्यांत आलें. फार्बसच्या लोकांनीं नदींत मासे धरण्याचें काम चाललें आहे असें पाहून नदीच्या पलिकडच्या तिरीं आले. आमच्या लोकांची त्यांची सलामी झाल्यावर ते ह्मणाले कीं, आह्मी नदी उतरून अलिकडे येतों. आमची सारी मंडळी नदी उतरून पलिकडे आली. आणि त्यांस खांद्यावर घेऊन एका क्षणांत अलिकडे आली. कपतान फार्बस ह्याला पाठुंगळी घेऊन मागदानल्द हा सर्वांच्या अघाडीस चालला. हा त्याचा मोठा सभ्यपणा होय; आणि जुन्या काळच्या शौर्याच्या, संभावितपणाच्या व औदार्याच्या त्या गोष्टी आहेत, त्याप्रमाणेंच हें आचरण खरें.

# लॉखम्युइरख.

सप्तेंबर ता० १६ वी, सन १८५०.

ज्या झोंपडींत आह्मांस जाऊन उतरावयाचें होतें, त्या झोंपडींत आह्मी तीन वाजतां जाऊन पोहोंचलों. सरोवर पाहण्याकरितां आह्मी साडेच्यार वाजतां जाऊन पोहोंचलों. आमची पदरची सगळी मंडळी बरोबर घेऊन आह्मी एका होडींत जाऊन बसलों. दंकन, जे. ब्रौन, पी. कूल्स, आणि लीज ह्यांनीं वल्हीं मारिलीं. वल्हीं मारीत मारीत त्यांनीं होडी सरोवरा पलिकडचे कांठास नेली. . आहा! हा! काय सुंदर कांठ तो; आणि पाण्याचे मोठमोठे ओढे ह्या सरोवरांत येऊन पडतात, तेणेंकरून ह्याच्यां कांठीं मोठमोठ्या ओघळी पडल्या आहेत व कडे तुटून गेले आहेत. पाण्याच्या किनाऱ्यावर बर्च नांवाचीं व एलदर नांवाचीं झाडें लागून गेलीं आहेत. एक ओघळींतून ब्ल्याकबर्न ह्या नांवाचा ओढा वाहत येतो. त्या ओघळीचे पायथ्यापाशीं एक लहानशी जागा होती. ह्या ठिकाणीं वाळूही सुंदर जमलेली होती. मग होडींतून उतरून ह्या ठिकाणीं आह्मी गेलों. एथील जमिनीस ओलावा नाहीं, तरीही एलदर झाडांवर आणि मौंतन आश नांवाच्या झाडांवर दाट फळें लागून तीं झाडें त्या ठिकाणावर पुढें आलेलीं होतीं येणेंकरून तसबीर काढण्या जोगें हें स्थान दृष्टीस पडलें. ह्या सरोवराचा वरचा शेंडा मोठा शोभिवंत आहे. कधींही आह्मी सरोवर पाहण्यास आलों ह्मणजे ज्या ठिकाणीं होडींतून आमची उतरण्याची चाल आहे त्या ठिकाणीं आह्मी जाऊन उतरलों, आणि घोड्यावर बसून चालते झालों. चांगला नवा रस्ता बांधिला आहे, हा रस्ता सरोवराचे कांठा कांठानें जातो.

चंद्रोदय झाला होता व त्याचें प्रतिबिंब सरोवराचे पाण्यांत पडून मोठी शोभा आली होती. सरोवराचे कांठीं उंच हिरव्या चार टेंकड्या लागून गेल्या

होत्या, ह्यांच्या योगानें सरोवर सुंदर दिसलें. होडीमध्यें कूत्स ब्यागपिप वाजवीत होता, तेणेंकरून वर सांगितलेल्या हरएक गोष्टींची शोभा अधिक वाटून मनाला विलक्षण उल्लास झाला. लोक काय चपळाईनें छान्दार वल्हीं मारीत होते! व ज्या तालावर रील नाच खेळतात, त्या तालावर जेव्हां जेव्हां तो गत वाजवी तेव्हां तेव्हां वल्हीं मारणारे लोक शाबासकी देऊन ओरडत. "लेदी आफ् दी लेक" ह्या नांवाचें सर वाल्तर स्कात ह्यानें जें काव्य केलें आहे, त्यामध्यें खालीं लिहिलेल्या पांचसात ओळी आहेत, ह्याची आठवण मला झाली.

जसजसे उदकीं वर चालती, तसतसे मुरली रव बोलती.
अधिकशी ध्वनि ती निघती पुढें, मुरलिनें बहुरंग सदा चढे.
दुरुनि जों ध्वनि कोमलसी सुटे, प्रथम तों मृदु फार जळीं उठे.
अधिक वेळ जिथें ध्वनि घोळती, बहु कठोर तिथें स्वर नासती.

पुढें सात वाजल्यावर थोड्याशा वेळानें आह्मी घरीं येऊन पोहोंचलों. आपल्या झोंपडीच्या जवळचे बनांत आह्मी शिरलों. तेव्हां जिकडे तिकडे सामसूम होतें, तेणेंकरून मोठी मौज वाटली आणि आमच्या झोंपडींतून दिवा लिकलिकतो आहे, असें आमचे दृष्टीस पडलें.

# कारीम्युली ह्या ठिकाणीं मशाली लावून नाच.

सप्तेंबर ता० १० वी, सन १८५२.

नेहेमीप्रमाणें नव्हे पण फराळास मंडळी जमली असली, ह्मणजे जीं वस्त्रें नेसावयाचीं तशीं नेसून सवासहा वाजतां आह्मीं जेवण केलें, आणि सात वाजतांना कारीम्युली ह्या ठिकाणीं आह्मी जाण्यास निघालों. त्या ठिकाणीं उघड्या पसाऱ्यांत मशाली लावून नाच होणार होता. मी पांढरी टोपी घातली होती. आंगावर धूसर रंगाचें पाणीदार रेशमी वस्त्र घेतलें होतें आणि वरून हैलंद देशाचे रीतीप्रमाणें चोगा पांघरल्यें होतें. आणि रोज संध्याकाळीं हैलंद देशाचे तऱ्हेचा आलबर्त्त साहेब पोषाग करितात तसाच् आज त्यांनीं केला होता. गाडींत बसून आह्मी निघालों. दोघीजणी बाया, लार्द दर्बी, आणि कर्नेल गार्देन दुसऱ्या गाडींत बसून निघाले.

संध्याकाळ झाली होती. जिकडे तिकडे शांत होतें खरें, तरी पाऊस पडेल असा रंग दिसला; परंतु मारब्धयोगानें पाऊस पडला नाहीं. साडेआठ वाजून गेले होते, अंधार गुडुप्प पडला होता, मग आह्मी तेथें जाऊन पोहोंचलों. मिस्तर दफ आणि त्याची पत्नी लेदी आमिस दफ, हीं आमचा सत्कार करण्याकरितां दरवाज्यापाशीं उभीं राहिलीं होतीं आणि एक-दम तीं आह्मांस घरांतून नाचाचे ठिकाणीं घेऊन गेलीं. पडदे टांगले होते आणि त्या पडद्याचे आड नाचाची तयारी केली होती, ह्मणून प्रथम आमचे कांहीं दृष्टीस पडलें नाहीं; परंतु जेव्हां पडदे एकीकडे सारले तेव्हां आहा हा! काय शोभा! काय विलक्षण मौज दृष्टीस पडली! ह्या ठिकाणीं सर्व मंडळी जमली होती; शंभर फूट लांब आणि साठ फूट रुंद,

एवढी जागा तक्तपोशी करून तयार केली होती. सभोंवतालीं हैलंदर लोक मशाली हातांत घेऊन उभे राहिले होते. सात असामी ब्यागपैप वाजवीत होते; माकै त्यांमध्यें मुख्य होता. आह्मी जातांक्षणींच नेहमीप्रमाणें कुरनिशात करून त्यांनीं "नीश" "नीश" "नीश" ह्मणून जयजयकार केला. आह्मीं इंग्रेज लोक जसें "हिफ" "हिफ" "हिफ" ह्मणून जयजयकार करितों, तसे हैलंदर लोक "नीश" "नीश" "नीश" ह्मणून करितात. नंतर मोठ्या बहाराचा रील नांवाचा नाच झाला. हैलंदर साठ असामी होते व दुसरेही साठ असामी होते. हैलंद देशांतील गृहस्थ मंडळी आणि दुसरे जे कोणी स्काच लोक होते, त्यांनीं चोळणे घातले होते व संध्याकाळीं जीं वस्त्रें नेसावयाचीं तीं बायामंडळीं नेसली होती. हैलंदर लोक व इतर लोक फेरपाळीनें नाचले. तरवारीचेही दोन तीन नाच झाले. मंचक तयार केला होता त्यावर आह्मी बसलों होतों; त्या मंचकावर छत दिलें होतें. सर्व नाचास मोठा रंग भरला आणि पाहण्यासारखी मौज झाली. आलबर्त्त साहेबाला आनंद झाला. हातांमध्यें मशाली घेऊन आठजण हैलंदर ह्यांनीं रील नांवाचा नाच केला ही गोष्ट सांगितली पाहिजे.

साडेनऊ वाजतां आह्मी निघालों ते अकरा वाजण्याचे बेताला आह्मी घरीं येऊन पोहोंचलों. खरोखरच टप्पा लांब होता, तो चवदा मैल असावा असा माझा अजमास आहे.

# ड्यूक आफ् वेलिंगतन ह्यांच्या मृत्यूचें वर्त्तमान आलें त्याची हकीकत.

मुक्काम आल्तना गुइथसाव,

बृहस्पतवार, सप्तेंबर ता० १६ वी, सन १८५२.

आज सकाळीं सात वाजतां कर्नेल फिप्स ह्यापासून एक पत्र आलें, तें वाचून आमच्या काळजाला धडकी बसली. त्यामध्यें तारेची बातमी होती, व सन् नामक वर्त्तमानपत्राच्या सहाव्या आवृत्तीचे पत्रकावरून अशी बातमी उतरून घेतली होती कीं, ड्यूक आफ् वेलिंगतन पर्वांचे दिवशीं मृत्यु पावले. ही बातमी खरी नाहीं, असें आह्मांस वाटलें. ईश्वर करो आणि ही बातमी खोटी होवो. आजच्या दिवशीं असें झालें नसतें तर बरें झालें असतें.

मिस सीमोर इला घेऊन आह्मीं न्याहारी केली. मग थोडें लिहिणें वाचणें केलें, मग आमचे पदरचे हैलंदर लोक आणि आह्मी फिरावयास गेलों. थंडी फार पडली नव्हती परंतु वरचेवर सर पडत असे तेणेंकरून वाईट झालें. असें जर झालें नसतें तर हवा फारच चांगली झाली असती. सरोवराला जाण्याचा रस्ता फारच चांगला आहे. तो अलिकडे रुंद केला आहे आणि त्यावरून गाडीस देखील जातां येईल. मग आह्मी सरोवरास जाऊन त्याचे कांठा कांठानें चाललों. "आल्त्ना दीर्ग" ह्या नांवाचा एक धबधबा आहे त्या ठिकाणीं आह्मी गेलों. पाण्यास फार ओढ आहे ह्मणून धबधबा मोठा मजेचा दिसतो. चढून जाण्याकरितां वळणा वळणाची एक वाट केली आहे, त्या वाटेनें आह्मी घोड्यावर बसून गेलों. कांहीं कांहीं ठिकाणीं ही वाट इतक्या चढावाची आहे कीं, घोड्यावर बसवां येत नाहीं.

तांबड्या रंगाचा ग्रानित दगड आहे, त्यावरून तो धबधबा पडतो. खालीं दरीमध्यें बिर्च, पर्वतावर रुझणारें आश, आणि एलदर ह्या जातीचीं झाडें दृष्टीस पडतात. आह्मी घोड्यावरून उतरून स्त्रोन व मास आफ् मान्एल्मी एथपावेतों कडा तुटलेल्या टेंकड्यांच्या माथ्यावरून पुष्कळ पायीं चाललों. त्या टेंकड्यांचे खालीं तें सरोवर आहे. तेथून लार्द पानम्यूर ह्याचे तांब्यातील मुलुख, मौंत कीन नांवाचा पहाड, ओगिलवी हिल्स नांवाच्या टेंकड्या, वगैरे प्रदेश दिसतात. जमीन टणक व कोरडी असून पायीं चालायाला चांगली आहे; तरीं जेथून सरोवराचें टोंक दिसतें, व ग्लासाल्त एथील झोंपडी दिसते अशा एका टेंकडीच्या टोंकावर थांबून आह्मीं थोडा दम घेतला. एथें पाहतें तों माझें घड्याळ सांपडेना; हें घड्याळ ड्यूक आफ् वेलिंगतन ह्यानीं मला दिलें होतें. ह्याच ड्यूकाची मजवर ममता असे. पण मी हें बरोबर घेतलें होतें कीं नाहीं ह्याचा मलाच संशय पडला, ह्मणून म्याकेन्झीला सांगितलें कीं, जाऊन चौकशी कर. आह्मी पायीं चालत चालत गेलों. मग ग्लासाल्त नदीचा उगमाकडचा भाग उतरून आह्मी पलिकडे गेलों. तीन वर्षें झालीं ह्याच टेंकड्यावरून धूलाक सरोवरावर आह्मी गेलों होतों; परंतु त्यावेळीं जमीन भुसभुशीत होती. घोड्याला पाऊल टाकतां येईना इतके रस्ते वाईट होते.

मग ग्लासाल्तचे उतरणीवर चालूं लागलों. त्या उतरणीवर फार चांगल्या तऱ्हेचा रस्ता बांधला आहे. त्या ठिकाणीं फारच शोभा दृष्टीस पडते; अरण्याची छाया मारते, आणि सर्व कांहीं भव्य असें दिसतें. ब्लेर ह्या ठिकाणीं ब्रुआर नदीचा जो धबधबा आहे, तेवढाच हा धबधबा आहे. ह्याची उंची सुमारें एकशें पन्नास फूट आहे. सरोवराचे पायथ्यापासून एकंदर उंची पांचशें फूट आहे. घोडीं व हैलंदर लोक सरोवराचे कांठा कांठानें वळणें घेऊन जात आहेत, हें पाहून फारच मजा वाटली. ग्लासाल्ताचे कांठा जवळ श्री नवी झोंपडी बांधली आहे, तेथें आह्मी जाऊन पोहोंचलों, त्या झोंपडींत आमच्याकरितां एक छानदार मजेची खोली आहे. त्या खोलींतून मोठे मजेचा देखावा दिसून येतो. आह्मी आपल्या बरोबर जें फराळाचें घेऊन आलों होतों तें एथें खाल्लें. मग घोड्यावर बसून धूलाख नांवाच्या सरोवराकडे आह्मी चालते झालों. मोठ्या मोठ्या दगडां-

च्या चिपा पडल्या आहेत त्यांवरून ओढा खालीं वाहत आहे. वरून एक चांगला रस्ता चालला आहे, त्यावर आह्मी चाललों; जिकडे पाहवें तिकडे उत्कृष्ट शोभा दिसून येते. बर्नऑफ दी स्पलान ह्या नांवाचा आह्मांस एक धबधबा लागला. पाऊण तासानें आह्मी धूलॉख सरोवरावर येऊन पोहोंचलों. एथें विचित्र शोभा आहे व अरण्याची छाया मारते.

आह्मी घोड्यावरून उतरल्यावर, बाग्याची तस्बीर रेखीत मी खालीं बसलें, इतक्यांत म्याकेन्झी कांहीं पत्रें घेऊन आला, आणि ह्मणूं लागला कीं, "आपलें घड्याळ घरीं आहे." त्या पत्रां पैकीं लार्द दर्बी कडून आलेलें एक पत्र होतें, तें मी फोडलें. अरे! अरे! त्या पत्रावरून तें दुष्ट वर्त्तमान खरें असें समजलें. इंग्लंद देशाचा तर काय, परंतु साऱ्या ब्रितन देशाचा लाल कींहो हरपला! मोठा पराक्रमी गेला! अरेरे! मोठा शूर वीर कींहो गेला! आज पर्यंत ब्रितन देशामध्यें जे जे पराक्रमी लोक झाले, त्या लोकांमध्यें हें एक रत्नच होतें. अरेरे! असें रत्न कींहो गेलें ! काय हा दु:खाचा दिवस उगवला! केवढी ही आमचे देशाची हानि झाली! अणखी ही हानि आतां कशानें नाहींशी होणार!

लार्द दर्बीचे पत्रांत लार्द चार्लस वेलस्लीच्या हातच्या चार ओळी होत्या, त्यांत लिहिलें होतें कीं, माझा प्रिय, मोठा पराक्रमी बाप मंगळवारीं दोन तीन तास दुखणाईत होऊन तीन वाजतां मृत्यु पावला. त्याला कांहीं क्लेश नहोतां सुखानें त्याचा प्राण गेला. ईश्वराचे मर्जीप्रमाणें सर्व जग चालणार. मरणें हें कोणास चुकत नाहीं. ड्यूकाचें वय त्र्यायशीं वर्षांचें झालें होतें व फार वेळ आजारी न पडतां व त्याची विशाळ बुद्धि जशाची तशीच राहून त्याला देवाज्ञा झाली हें ठिकच झालें. अरे! ज्याची कीर्त्ति अमर असा कींहो हा वीर! कोणी इग्लंद देशाचें नांव घेतलें ह्मणजे त्याला ह्या वीर पुरुषाची आठवण व्हावयाचीच. असा कींहो हा ड्यूक गेला! अरेरे! केवढी हानि ही!

जो मनुष्य राजा नसतो त्यास ह्या जगतामध्यें जो काय मान मिळण्याचा संभव आहे तो बहुतकरून ह्या ड्यूकाला मिळाला होता. राजा खेरीज करून सर्वांमध्यें उंच पदवीस तो चढला होता. राज्यप्रकरणांत जे निर-

निराळे पक्ष असतात त्यांतून तो कोणत्याही पक्षास लागून नव्हता. सर्व लोक ह्याचा सन्मान करीत होते. सर्व लोकांचे मनांत ह्याचे विषयीं पूज्यबुद्धि होती. राजाचा मित्र कींहो हा. अशी अब्रू मिळाली असतां हा किती साध्या व भोळ्या रीतीनें चाले! ह्यानें कोणतेंही काम एकदां हातांत धरिलें ह्मणजे धरिलेंच. केवढा ह्याचा प्रमाणिकपणा! केवढें ह्याचें शौर्य! खरेपणानें हा सारीं आपलीं कामें करीत असे. ह्याची राजाला केवढी मदत! आणि ह्याची राजभक्ति काय अचल! ह्याचा विश्वास काय दृढ! हा राजसेवेमध्यें किती तल्लीन! असा राजसेवक आजपर्यंत कधींही झाला नव्हता, आणि पुढेंही कधीं होणार नाहीं, असें वाटतें. अरेरे ज्यांचा अनुभव मोठा व ज्यांची योग्यता मोठी, असे आमचे पुष्कळ मित्र मृत्यु पावले, ह्मणून ड्यूकाचे मरण्यानें जी आमची हानि झाली ती आतां कशी नाहींशी होणार! जेव्हां जेव्हां प्रसंग पडे व कांहीं उपयोग घडून येण्याची संधी येई तेव्हां तेव्हां दोन गोष्टी सांगण्यास व मदत देण्यास ह्यांची काय तयारी असे! कोणतेंही संकट पडो, तें निवारण करण्यास ह्यांची काय हुशारी असे! अशी तयारी कोणाचीही कधीं नव्हती. आलबर्त्त साहेबावर तर ह्यांचा पूर्ण भरंवसा होता, व फारच मेहरबानी होती. गत गोष्टीविषयीं काय ह्यांची माहिती! केवढा ह्यांचा अनुभव! जे दिवस निघून जाऊन आज पुष्कळ वर्षें होण्यास आलीं, त्या दिवसांच्या गोष्टी त्यांच्या द्वारानें आह्मांस समजत. त्या दिवसांचा व हल्लींच्या दिवसांचा संबंध जुळणारा तो लगाच होय. साऱ्या देशांत एकाही मनुष्याच्या डोळ्यांस पाणी आल्या वांचून राहणार नाहीं.

लॉख म्युइख ह्या सरोवराचे टोंकावर आह्मी पायीं चालत चालत जलदीनें गेलों; मग घोड्यावर बसलों आणि परत आल्तना गुइथ साख ह्या ठिकाणीं घरीं येऊन पोहोंचलों. वाटेनें एका पावसाचे सरीनें आह्मांस खूप झोडपलें. सारी मजा बिघडून गेली आणि आमची सर्वांचीं मनें विरस झालीं.

मग लार्ड चार्लस वेलस्ली आणि लार्ड दर्बी ह्यांचे पत्रांस उत्तरें लिहून पाठविलीं.

# क्रेग्गोवन ह्यावर उतरंड रचणें.

सोमवार, अक्तोबर ता० ११ वी, सन १८५२.

आजचा दिवस मोठा सुखानें गेला. प्रारब्धानें मोठी कृपा केली. ह्या दिवसाचा आह्मांस कधीं विसर पडणार नाहीं. हवा छान पडली होती. आकाश निरभ्र होतें. अरे! रे! पण हा आमचा स्कातलंद देशांत राहण्याचा सरते शेवटचा दिवस.

आलबर्ताची आणि मिस्तर वालपोलाची भेट व्हावयाची होती, ह्मणून सुमारें अकरा वाजत तोंपर्यंत क्रेग्गोवन डोंगराचे शिखरावर जाणें झालें नाहीं. हें स्थान आह्मांस प्रिय आहे; ही जागा आमचे हातीं लागली, ह्या गोष्टीचें स्मरण राहवें ह्मणून दगडांची जुनी उतरंड काढून घेऊन दुसरी नवी रचावी असें आमच्या मनांत आलें. बाया मंडळी, गृहस्थ मंडळी व आमचीं मुलें ह्यांस घेऊन आह्मी निघालों. आमचे पदरचे चाकरलोक बहुतकरून आघाडीस गेले होते. जे राहिले ते आमचे बरोबर निघाले. ग्रांत आणि माक्‌दानल्द हे त्यां पैकीं होते. अर्ध वाटेवर मॉस हौस ह्मणून एक घर आहे, त्या ठिकाणीं माकै येऊन आमचे मंडळींत मिळाला, आणि ब्यागपैप वाजवीत वाजवीत क्रेग्गोवन ह्या खडप्याच्या शिखरा पर्यंत आमचे पुढें चालला. दंकन आणि दानल्द स्त्युअर्त हे दोघेजण माकैच्या पुढें चालले. आमचे पदरचे चाकरलोक आणि आमची रयत तेथें येऊन जमली होती; त्यांचे बरोबर त्यांच्या बायका मुलें ह्मातारे कोरिब नातलगही आले होते. आमची लहान साहान सारी मित्र मंडळी आली होती. त्यामध्यें मेरी सिमन्स, लीझी स्त्युअर्त, ग्रांतचे घराण्यांतील चवघेजण व दुसरे असी मंडळी होती.

मग आह्मी जरासे पुढें गेलों, तों मोठें छानदार एक सांबर दृष्टीस पडल.



आलबर्त्त साहेबानें गाडी बाहेर उडी टाकून बार काढला. तें जनावर धाडकन खालीं पडलें मग पुनः उभें राहून पुढें पळालें. आलबर्त्त साहेब त्याचे पाठीमागें लागले. मग लवकरच गोंगाट ऐकूं आला ह्मणून आह्मी खालीं धांवलों, आणि पुढें पाहतों तों ग्रांत आणि दानल्द स्त्युअर्त त्या सांबरास धरून ओढीत आहेत, असें दृष्टीस पडलें. हा! हा! किती सुंदर त्या सांबराचें तोंड हें! आलबर्त्त साहेब तसेच पुढें गेले होते, त्यांचे मागून ग्रांतही चालता झाला. मी व आमची विकी, दानल्द स्त्युअर्त, तो बिचारा सांबर, अणखी कुत्रीं ह्यांच्या जवळ मागें राहिलों. त्या सांबराची तस्बीर मी रेखीत खालीं बसलें. इतक्यांत कायरे झालें हें! आमची विकी बिचारी चुकून गांधील माशांच्या घरट्यावर जाऊन बसली आणि तिला त्या खूप डसल्या. दानल्द स्त्युअर्त ह्यानें तिला सोडवून घेतलें. माझा जीव भ्याला ह्मणून माझे हातून तिला सोडवून घेणें झालें नाहीं. दहा वीस मिनिटें गेल्या वर आलबर्त्त साहेब माघारे आले. परंतु तो सांबर पडला कीं नाहीं हें त्यांचें त्यांनाच माहित नव्हतें. आहा! काय आनंदाचा दिवस हा! परंतु आतां आह्मी स्कातलंद देश सोडून जाणार. हा आमचा सरते शेवटचा दिवस असें मनांत येऊन वाईट वाटूं लागलें. साडेसहा वाजतां आह्मी परत घरीं आलों. आह्मी परत माघारे आल्याचे पूर्वीच तो सुंदर सांबर त्यांनीं तेथें आणून ठेवला होता. त्याचें सौंदर्य पाहून आह्मांला मोठें आश्चर्य वाटलें.

# आमच्या नव्या वाड्याच्या पायाचा मूळ दगड घालण्याचा समारंभ.

सप्तेंबर ता० २८ वी, सन १८५३.

प्रातःकाळीं आकाश निरभ्र होतें आणि पाऊस पडेल असा कांहीं रंग दिसत नव्हता, पण साडेदाहा वाजतां आह्मी घरा बाहेर पडलों तेव्हां पाऊस पडूं लागला, पुढें दम खाऊं देईना असा त्यानें भडिमार सुरू केला. प्रारब्धाचा योग! दोन वाजण्याच्या पूर्वीं पाऊस उडून गेला आणि चक्क ऊन पडलें. आमच्या नव्या वाड्याच्या पायाचा मूळ दगड घालण्याचा समारंभ व्हावयाचा होता, त्यास हें ऊन अनुकूळ होतें. आबरगेलदी ह्या गांवाहून आमची आई साहेब आपली सारी मंडळी घेऊन तीन वाजण्याच्या सुमाराला येऊन पोहोंचली. समारंभ अमक्या रीतीनेंच व्हावयाचा असें ठरलें होतें. ह्या ठरावांत जराही अंतर न पडतां सर्व समारंभ यथास्थित झाला आणि मोठी मौज उडाली. समारंभ कसाकसा व्हावा ह्याचा ठराव खालीं लिहिल्या प्रमाणेंः—

"मूळ दगड तयार करून ज्या दगडावर तो बसावयाचा, त्याजवर तो लोंबत ठेविला पाहिजे. एका शिशीमध्यें चर्मपत्र व नाणीं भरावयाचीं आहेत. त्या शिशीसाठीं खालच्या दगडांत खळगा असला पाहिजे.

"सगळी कामकरी मंडळी ह्यानीं मूळ दगडापासून थोड्या अंतरावर अर्ध-वृत्ताकृतीनें उभें रहावें. त्यांचे आंतल्या बाजूला बायका मंडळीनीं आणि आमच्या पदरच्या चाकरलोकांनीं उभें राहावें.

"मग राणीसाहेब महाराज आणि त्यांचे पति, राणी साहेबांचीं सारीं मुलें, डचेस आफ् केन्त, राणी साहेबांची सारी पाहुणे मंडळी व राणीसाहे-बांची स्वारी, इतक्यांनीं घराहून निघावें.

"राणीसाहेब महाराज, त्यांचे पति, आणि राजकुळांतील सारी मंडळी इतक्यांनीं दगडाचे दक्षिण बाजूला उभें राहावें. स्वारीचे मंडळीनें दोहों बाजूंला आणि मागच्या बाजूला उभें राहावें.

"मग रेवरेंद मिस्तर अंदरसन हा या इमारतीवर ईश्वराची कृपा असावी ह्मणून ईश्वराची प्रार्थना करील. अमक्या दिवशीं हा पायाचा मूळदगड घातला असा ज्या चर्मपत्रावर लेख आहे त्यावर राणीसाहेब महाराज आपली सही करतील. राणीसाहेब महाराजांची सही झाल्यावर प्रिन्स आलबर्त्त साहेब सही करतील. मग राजकुलांतील मुलाच्या सह्या होतील, मग दचेस आफ् केन्त सही करतील. मागून ज्याना ज्यांना राणी साहेब महाराज सह्या करा ह्मणून सांगतील ते सह्या करतील, आणि मग तें चर्मपत्र शिशींत घातलें जाईल.

"राणीसाहेबांच्या कारकिर्दीत जीं नाणीं चालू आहेत त्या सर्वांतलें एक एक नाणें त्या शिशींमध्यें घातलें पाहिजे; आणि शिशीचे तोंडास मोर्तब करून ती शिशी दगडाच्या खळग्यांत घातली जाईल. मग आबरदीन शहरचा राहणारा मिस्तर स्मिथ ज्यानें घराचा बेत रेखटला त्यानें राणीसाहेब महाराज ह्यांचे स्वाधीन कर्णी करावी. मग ह्या कर्णीनें राणीसाहेब महाराजांनीं दगडावर चुना पसरल्यावर लोंबकळत ठेविलेला दगड खालीं सोडला जाईल.

"मग पानसाळ व काटकोन्या लावतील आणि दगड बरोबर बसला कीं नाहीं हें पाहतील. दगड बरोबर बसला असें समजल्यावर क्लार्क आफ् दी वर्क्स ह्मणून मिस्तर स्तुअर्त हा राणीसाहेबांचे हातांत मोगरी देईल; तेव्हां ह्या मोगरीनें त्या दगडावर ठोकून आतां हें पायाचा मूळदगड घालण्याचें काम झालें, असें राणीसाहेब ह्मणतील. तेल व द्राक्षारस ह्यांनीं भरलेली एक शिशी दगडावर ठेविली जाईल आणि राणीसाहेब महाराज तेल आणि द्राक्षारस त्या दगडावर ओततील. ब्यागपैप वाजवितील. मग राणीसाहेब महाराज सहकुटुंब सहपरिवार निघून जातील.

"जेवण तयार होतांक्षणींच सारे कामकरी लोक जेवावयाला बसतील. जेवण झाल्यावर मिस्तर स्मिथ हा खालीं लिहिल्याप्रमाणें लोकांनीं सन्मानार्थ पान करावयाकरितां नांवें सांगेल:—

"राणीसाहेब महाराबांचें नांव.

"त्यांचे पति आणि त्यांच्या घराण्यांतील मंडळी ह्यांचें नांव.

"बालमारल नामक वाडा ह्याची आबादी व त्यांतील राहणारे ह्यांचें कल्याण.

"कामकरी लोक जेवणाची जागा सोडून मैदानावर जातील व हैलंद तऱ्हेचे कांहीं खेळ तेथें खेळतील. मग सात वाजल्यावर नाचण्याच्या दिवाणखान्यामध्यें नाच सुरू होईल."

समारंभाच्या जाग्याला आह्मी चाललों. आमचे आघाडीस मार्कि चालला. मिस्तर आंदरसन ह्यानें प्रसंगाला योग्य अशी देवाची प्रार्थना केली. वारा फार सुटला होता तरी जसें आमचे मनांत होतें, तसा सर्व समारंभ घडून आला.

सगळा समारंभ पुरा झाल्यावर सगळ्या कामकरी मंडळींनीं एकच जयजयकाराची आरोळी केली. पाऊण तास झाल्यावर आह्मी आंत जेवावयाला मंडळी बसली होती, ती पाहण्यास गेलों. मग क्रेगगोवन ह्या ठिकाणीं कांहीं शिकार आलबर्त्त साहेबाला सांपडेल कीं नाहीं हें पाहण्याकरितां गेलों.

आह्मीं लवकरच पोषाग केला, आणि दिवाणखान्यांत लोक नाचत होते ते पाहण्यास आंत गेलों. नाचायाचें काम खूप हुशारीनें रगडून चाललें होतें. मग वीस मिनिटें झाल्यावर आह्मी जेवावयास गेलों.

# देऊळ.

**अक्तोबर ता० २९ वी, सन १८५४.**

नेहमी प्रमाणें आह्मी बारा वाजतां देवळांत गेलों. तेथील भजन रेवरेंद नार्मन मक्लौद, ग्लासगो शहरचा राहणारा ह्यानें केलें. हा दाक्तर मक्लौद ह्याचा पुत्र होय. ह्यानें केलेल्या भजनापेक्षां अधिक सुंदर भजन करतांना मी कधींही ऐकिलें नाहीं. सगळें व्याख्यान त्यानें तोंडानें दिलें आणि तें मोठें सुरस व फार सुबोध होतें. वाक्पांडित्य उत्कृष्ट असून त्यांतील विषयाची रचना सुगम व फारच चांगली होती. निकोदिमस येशूख्रिस्ताचे भेटीस रात्रीं आला, ह्या विषयावर तें व्याख्यान केलें. हा विषय योहानानें लिहिलेलें पवित्र शुभवर्त्तमानाचे तिसरे अध्यायांत आहे. आह्मी सर्व स्वार्थाकरितां कसे झटतों, स्वार्थाकरितां कसे वर्त्ततों ही गोष्ट मिस्तर मक्लौदानें ह्या व्याख्यानांत दाखविली. स्वार्थाचे पाठीमागें धांवतां धांवतां जिवाला कधीं विश्रांति मिळत नाहीं असेंही तो ह्मणाला. आमच्या करितां बळीं जावें ह्मणूनच केवळ येशूख्रीस्तानें अवतार घेतला असें नाहीं, तर कोणत्या रीतीनें आह्मी आचरण करावें, हें दाखविण्याचाही त्यावा हेतु होता. दुसऱ्यांदा त्यानें प्रार्थना केली ती ऐकून काळीज भेदून गेलें. आमचे विषयीं त्यानें जी प्रार्थनेंत गोष्ट काढिली ती सहज काढिली. प्रार्थना करितां करितां आमचें नांव घेऊन ह्मणाला, हे ईश्वरा; त्यांचे मुलांचें कल्याण कर; लढाईत जखमी झालेले, मरायास टेंकलेले, विधवा व अनाथ मुलें, ह्याविषयीं जेव्हां त्यानें प्रार्थना केली तेव्हां तर माझा कंठ दाटून आला. तें व्याख्यान ऐकून लोकांस आनंद झाला. अशा प्रकारचा भाव मनामध्यें उत्पन्न झाला असून देवळांतून घरीं परत येण्यांत किती सुख आहे! आमच्या पदरचे नौकर लोकांस व हैलंदर लोकांस असाच आनंद झाला.

## बालमारल एथील नव्या वाड्यांत येऊन पोहोंचणें.

सप्टेंबर ता० ७ वी, सन १८५५.

सवासात वाजतां आह्मी बालमारल एथें येऊन पोहोंचलों. ही जागा आह्मांस फार आवडती. जुना वाडा व त्याची पडशाळा ह्यांच्या मधला भाग तोडून काढला होता ह्मणून आमची गाडी जुन्या वाड्यावरून किंबहुना जुन्या वाड्यामधून गेली हें आह्मांस नवल वाटलें. नवा वाडा फारच सुंदर दिसतो. वाडा व पडशाळा ह्यांच्या मधल्या भागांतील खोल्या व वाड्यावरला इमला ह्यांचें काम अर्धवट मात्र झालें, आणि पडशाळा बांधण्याचें काम अजून सुरू झालें नाहीं, ह्मणून मंत्री खेरीजकरून सर्व गृहस्थलोक व बहुतकरून सर्व चाकरलोक जुन्या वाड्यांत राहतात. आमच्या स्वारी बरोबर जो मंत्री असतो तो नव्या वाड्यांत राहतो.

नवा वाडा व पडशाळा ह्यांच्या मध्यें पडवीचा रस्ता आहे. नव्या वाड्यांत आह्मी शिरूं लागलों, तेव्हां आमचें कल्याण व्हावें ह्मणून आह्मी पुढें चालत असतांना मागून फाटका जोडा उडविला होता. वाडा फार रमणीय आहे. त्यांतल्या खोल्या मनासारख्या आहेत. सामान सुमान व भिंतीला लाविलेले कागद ह्यांनीं तर सौंदर्याची सीमाच केली आहे.

## नव्या वाड्याविषयीं प्रथम मनोग्रह.

सप्तेंबर ता० ८ वी, सन १८५५.

आमचे वाड्यांतील खोल्यांच्या खिडक्यांतून व त्यांच्या खालीं पुस्तकें ठेविण्याची खोली, दिवाणखाना, वगैरेच्या खिडक्यांतून फार रमणीय देखावा दिसतो आणि ज्या खोऱ्यांतून ही नदी वाहते तें खोरें दिसतें. पाठी मागचे बाजूला मोठे पर्वत लागून गेले आहेत तेही दिसतात. जुन्या वाड्यांतून हे पर्वत दृष्टीस पडत नसत. आह्मी इकडे तिकडे फिरलों व नदीचे कांठानें चाललों. आजपर्यंत काम किती होऊन संपलें व पुढें किती व्हावयाचें आहे ह्याची चौकशी केली. मग आपल्या आवडत्या जुन्या वाड्यांत गेलों आणि ज्या ठिकाणीं आमची बसण्याची उठण्याची चाल होती त्या ठिकाणीं गेलों, आणि त्या ठिकाणीं आतां चिट पाखरूं देखील नाहीं, हें पाहून मनास मोठें उदासपण वाटलें. मग कोण कोणत्या जिनसा त्या ठिकाणाहून न्याव्या ह्याविषयीं आह्मीं बंदोबस्त केला.

# सिबास्तोपोल किल्ला घेतल्याचें वर्त्तमान.

सप्टेंबर ता० १० वी, सन १८५५.

आई साहेब व त्यांच्या स्वारीबरोबरची बाई व गृहस्थ इतकींजणें जेवावयाला होतीं.

तारेवरून केव्हां वर्त्तमान येईल, केव्हां वर्त्तमान येईल, असें सर्वजणें एक-सारखीं आज वाट पाहत बसलीं होतीं. साडे दाहा वाजतां दोन लाखोटे येऊन पोहोंचले. त्यांपैकीं एक लाखोटा माझा होता, व एक लार्ड ग्रानविल ह्यांचा होता. माझा लाखोटा लार्ड क्लारेंदन ह्यांनीं लिहिला होता, व त्यांत रूस देशाच्या गलबतांचा कसकसा नाश झाला, ह्याविषयीं विशेष मजकूर मार्शल पेलिसिये ह्यांनीं लिहिला होता. हा लाखोटा मी वाचूं लागलें तों लार्ड ग्रानविल येऊन ह्मणाले कीं, आपल्या वर्त्तमानापेक्षां माझें वर्त्तमान फार चांगलें आहे. मग जनरल सिम्सन ह्याजपासून आलेली तार त्यांनीं वाचून दाखविली. ती अशी कीं, सिबास्तोपोल हा किल्ला आमच्या व मित्रमंडळीच्या हातीं आला. ईश्वरा! तुझी स्तुति केली पाहिजे. आह्मांला फारच आनंद झाला. परंतु ही गोष्ट खरी असेल असें आह्मांस वाटेना, इतके दिवस आह्मांस वाट पाहवी लागली, इतके दिवस काळजी वाहवी लागली, ह्मणून ही गोष्ट झाली तरी कशी असेल हें आह्मांस समजेना.

आलबर्त्त ह्मणाले, चला आपण एकदम जाऊन मोठा जयसूचक अग्नि पेटवूं. मागल्या वर्षी हा किल्ला घेतला अशी जेव्हां खोटी बातमी येऊन पोहोंचली, तेव्हां हा जाळ करण्याविषयींची व जयजयकार करण्या विषयींची तयारी केली होती; परंतु अजून जाळ करण्याची संधी आली

नाहीं; ह्मणून लांकूड फांटीं तशींच राहिलीं. नवेंबरचे पांचवे तारखेस इनकरमान ह्या नांवाची लढाई झाली, ते दिवशीं रचलेलीं लांकूड फांटीं वाऱ्यानें उडवून दिलीं, अशी मोठी नवलाची गोष्ट झाली. आणि आतां काय तरी नवल हें! आह्मी जावें, बाळ पेटवावा, ह्या करितां लांकूड फांटीं अणूं तयारच आहेत.

नव्या वाड्याचा पायगुण चांगला खरा. कारण ह्या घरांत आह्मीं पाय ठेवल्यापासून एक एक आपलें चांगलें वर्त्तमान ऐकूं येतें. थोडक्या वेळानें आलबर्त्त साहेबानें व दुसऱ्या गृहस्थ मंडळीनीं निरनिराळ्या तऱ्हेचे पोषाग करून बाहेर पडले. आमच्या पदरची सारी चाकर मंडळी व गांवचे सारे लोक हेही बाहेर पडले. अशी मंडळी बरोबर घेऊन आलबर्त्त साहेब झटदिशीं टेंकडीच्या माथ्यावर उतरंड रचली होती तिकडे गेले. कसा काय जाळ करितात हें पाहवें ह्मणून आह्मीं दम खात बसलों. जयजयकार करून लोकांनीं तो जाळ पेटविला. त्याचा मोठा भडका झाला आणि त्याच्या भोंवतीं जी मंडळी उभी राहिली होती, ती आमच्या दृष्टीस पडली. कांहीं लोक नाचत होते, कांहीं आरोळ्या मारीत होते. रास हा ब्यागैपिप वाजवीत होता आणि ग्रांत व माक्‌दानल्द हे एकसारिखे बंदुक सोडीत होते. इकडे असें चाललें असतांना बिचारा ह्मातारा फ्रांस्वादालबर्त्तान्‌सन ह्यानें खालीं उभें राहून कांहीं फटाके सोडले. परंतु त्यांतील बहुतेक फटाके उडालेच नाहींत. एक पाऊण तास झाल्या नंतर आलबर्त्त साहेब खालीं उतरून आले, आणि ह्मणाले कीं, अशी मौज आपण जन्मांत कधीं पाहिली नव्हती; व खूप धामधूम उडाली, व खूप बहार झाला. आह्मी तुमचें आरोग्य चिंतितों असें ह्मणून एकमेकांचीं नांवें घेऊन लोक विस्की नांवाची दारू पीत होते व आनंदांत अगदीं दंग होऊन गेले होते. सगळ्या घरामध्यें मोठें नवल वाटण्याजोगी मौजेची गडबड चालली होती, पण कांहीं केल्यानें मुलें जागीं होईनात. सरते शेवटीं तीं जागीं झालीं तेव्हां उतरंड होती तेथें चढून जाऊं चला असें आह्मांस ह्मणूं लागले.

सवाबारा वाजत तोंपर्यंत आह्मी असेच बसलों होतों, पुढें. पोषाग उतरून ठेवावयाचें मनांत आलें. तों सारे लोक खिडकीखालीं येऊन उभे

राहिले. कांहीं लोक ब्यागपैप वाजवीत आहेत, कांहीं गात आहेत, कांहीं बंदुकीचे बार काढीत आहेत आणि कांहीं जयजयकार करीत आहेत. प्रथम त्यां सर्वांनीं माझें नांव घेऊन जयजयकार केला, मग आलबर्त्त साहेबांचे नांव घेऊन जयजयकार केला, मग फ्रेंच देशाचे बादशाहाचें नांव घेऊन जयजयकार केला. पुढें सिबास्तोपोल किल्ला घेतला ह्मणून जयजयकार केला.

# प्रिन्सेस रायल ह्मणून वडील राजकन्या हिच्या लग्नाचा ठराव.

**सप्तेंबर ता० २९ वी, सन १८५५.**

फ्रेदरिक विलयम नामक प्रुशिया देशांतील राजपुत्र ह्यास आमची प्रिय कन्या विक्तोरिया वाचादत्त झाली. आज पंधरा दिवस झाले तो आमच्या कडे आला. विसावे तारखेला आपले मनांत काय गोष्ट आहे ती त्यानें आह्मांस बोलून दाखविली. परंतु आमची मुलगी अगदीं अल्पवयाची आहे ह्मणून त्यानें आपल्या मनांतील गोष्ट तिला कळवावी किंवा परत येई पर्यंत बोलणें तहकूब ठेवावें, ह्या विचारांत आह्मी पडलों होतों. मग शेवटीं आमचे मनांत असा निश्चय झाला कीं, राजपुत्रानें आमचे कन्येला अभिप्राय बोलून दाखवावा हें बरें आहे. मग आज दुपार झाल्यावर घोड्यावर बसून आह्मी सर्व क्रेगनाबान ह्या डोंगरावर चढत असतां त्यानें एक पांढरें फूल तोडून घेतलें आणि आमचे मुलीस दिलें. हें फूल चांगलें पायगुणाचें आहे असें मानतात. मग हें असें फूल देऊन आपले मनामध्यें काय मतलब आहे, काय धोरण आहे, हें त्यानीं गोष्टी बोलतां बोलतां सुचविलें. त्यावेळीं तीं दोघें ग्लेनगिर्नोख खिंडींतून घोड्यावर बसून उतरून येत होतीं. ह्याप्रमाणें हा मंगलदायक विवाहनिश्चय झाला.

# देऊळ.

**अक्तोबर ता० १४ वी, सन १८५५.**

बारा वाजतां देवळास गेलों. स्कातलंद देशामध्यें नामांकित जे उपदेशक व ज्यांस ईश्वर ज्ञानाची माहिती चांगली अशा पैकींच रेवरेंद जे. केर्द हा एक आहे. ह्यानें भजन केलें; आणि एक सुंदर व अति सुरस व्याख्यान देऊन सर्व श्रोत्यांच्या मनाची उठावणी केली. हें व्याख्यान सुमारें तासभर चाललें तरी श्रोत्यांचीं मनें एकतान होऊन गेलीं. रोमेकरास पत्र ह्मणून जो एक पवित्र शास्त्राचा भाग आहे त्याचे बारावे अध्यायांतील अकरावे ओवीवर त्यानें हें व्याख्यान दिलें, ती ओवी कोणती ह्मणाल तर "उद्योगांत आळसी होऊंनका, आत्म्यांत आवेशी व्हा, प्रभूची सेवा करा." खरा धर्म काय आहे, आपले आचरणामध्यें खरा धर्म चहूंकडे कसा बाणला पाहिजे, खरा धर्म केवळ आदितवाराचे दिवशीं आचरावा असें नाहीं. कोठडीमध्यें दार बंद करून ध्यान केल्यानें खरा धर्म प्राप्त होतो असें नाहीं. संसार सोडून अरण्यवास करणें हाही खरा धर्म नव्हे. चांगलीं पुस्तकें घेऊन वाचतां वाचतां डुलक्या खाणें हाही खरा धर्म नव्हे. तर खरा धर्म ह्मणजे काय? नेहमी सद्गुणी असणें व सदाचारानें चालणें ह्मणजे ख्रिस्ती धर्माचा बाणा बाळगून हरयेक गोष्ट घडूं देणें. त्यानें अशा ह्या गोष्टीची सुलभ व अति सुरस रीतीनें फोड करून सांगितली. हें व्याख्यान किती सुंदर होतें ह्मणाल तर गतवर्षी जितकें मिस्तर मक्लीदचें व्याख्यान गोड लागलें, तितकेंच हेंही लागलें. ह्या व्याख्यानाचे योगानें आह्मांस पुष्कळ उपदेश झाला. मग आह्मी घरीं गेलों.

## जुना वाडा नाहींसा झाला ह्याविषयीं.

**आगस्त ता० ३० वी, सन १८५६.**

संध्याकाळीं सातवाजतां बालमारल एथें येऊन पोहोंचलों. वाड्यावरला इमला व पडशाळांच्या जागा सर्व बांधून तयार झाल्या, आणि जुना वाडा नाहींसा झाला असें आमचे नजरेस आलें. एकूण नवा वाडा भव्य दिसतो.

## नव्या वाड्या भोंवतालच्या बागा वगैरे.

**आगस्त ता० ३१ वी, सन १८५६.**

नदीचे कांठानें आणि घराचे बाहेरल्या बाजूनें आह्मी पायीं फिरलों. नव्या बांधलेल्या पडशाळांच्या जागा आणि आंगणाच्या जागा फारच उत्तम आहेत. पश्चिमेचे बाजूला लहानशी बाग आहे, ती फारच सुंदर आहे. त्या बागेमध्यें एक कारंजें आहे, त्या कारंजाची तोटी गरुडपक्ष्याच्या चोंची सारखी आहे. हें कारंजे प्रुशिया देशाचे राजानें मला दिलें, तें आजपर्यंत विन्‌बर ह्या ठिकाणचे बागेमध्यें होतें. ही नदीच्या समोर ज्या भिंती आहेत त्या भिंतीचे खालीं फुलझाडांचे वाफे काढलेले आहेत. वे फार सुंदर आहेत. निरनिराळ्या ढाळ्यांवर निरनिराळीं चित्रें खोदून काढलीं आहेत. त्या चित्रांवर मुलामा चढविला आहे. हीं चित्रें मोठीं मजेचीं दिसतात. आणि आमचे खिडकी खालीं एक चित्र खोदून काढलें आहे, त्यावर मुलामा चढविला नाहीं. तें चित्र कोणाचें ह्मणाल? तर तें सेंत ह्युबर्त्त ह्याचें आहे. त्याच्या एके बाजूला सेन्त ऑन्ड्रू काढला आहे. दुसरे बाजूस सेन्त जार्ज काढला आहे. मिस्तर तामस ह्याची ही सारी कारागिरी आहे.

## बालमारल ह्या जाग्यावर माझा लोभ.

अक्तोबर ता० १३ वी, सन १८५६.

बालमारल हें स्थळ केवळ इंद्रभुवन आहे, असें ह्मटलें तरी चालेल. ह्या जाग्यावर वर्षानुवर्ष माझा लोभ अधिक अधिक वाढतो. हें इंद्रभुवन माझे प्रिय आलबर्त्तसाहेबांची सृष्टि आहे. जशी ऑजबर्न ह्या ठिकाणीं त्यांची नजर, बेतबात, तशीच त्यांची ह्या ठिकाणीं आहे. ऑजबर्न ठिकाणच्या इमारती आलबर्त्त साहेबांनीं स्वतः नमुना दाखवून जशा बांधविल्या तशाच ह्या ठिकाणींही बांधविल्या. त्यांची रसिकता व त्यांचें कौशल्य हीं मोठीं आहेत; आणि ती त्यांची रसिकता आणि तें त्यांचें कौशल्य, ह्या इमारतीचे बांधणावळीमध्यें व मांडणुकीमध्यें स्पष्ट दिसून येतें. आज सारा दिवस ते खटपटीमध्यें आहेत आणि पुढल्या वर्षी आह्मी एथें आलों ह्मणजे सर्व गोष्टीं विषयीं कसाकाय बेत करावा, कशी तजवीज ठेवावी हें ते ठरवून देत आहेत.



बालमारल वाड्याचा वायव्य दिशेकडील देखावा.

BALMORAL CASTLE FROM THE NORTH-WEST.

## दी नदीवर पूल बांधला होता, त्यावरून वाट सुरू केली.

**सप्टेंबर ता० ८ वी, सन १८५७.**

दीड वाजतां हैलंद तऱ्हेचा डामडौल करून आह्मी निघालों. आलबर्त साहेबानीं मोठा भव्य स्त्युअर्त तऱ्हेचा पोषाग आंगावर घेतला होता. मी आणि मुलींनीं त्याच तऱ्हेच्या कापडाचे घागरे घातले होते. मारलाज्ज ह्या ठिकाणीं नाच पाहून सकाळीं पांच वाजतां बाया मंडळी नुकतीच परत आली होती ती आह्मां बरोबर निघाली. पुरुष मंडळीही आह्मा बरोबर निघाली. आह्मी सर्व मिळून दी नदीच्या धबधब्या जवळ नवा पूल बांधला होता, त्यावरून प्रथमच वाट चालू करण्याची होती त्या ठिकाणीं गेलों. ज्या खोऱ्यांतून नदी वाहते, तें खोरें सुंदर दिसत होतें. आह्मी गेलों ह्मणून जयोत्सवाची कमाण उभी केली होती. ह्या ठिकाणीं आमचें आगत स्वागत करण्याकरितां लार्ड फैफ व मिस्तर ब्रुक हे दोघेजण आले. ते आमचे गाडीच्या बाजूला पायीं चालले. कांहीं लोक ब्यागपैप वाजवीत होते आणि दफचे पदरची मंडळी दोन्ही बाजूंनीं उभी राहिली होती. पुलावर जेव्हां आह्मी गेलों, तेव्हां लेदी फैफ ह्या बाईनें आमचें आगत स्वागत केलें. आणि "ह्या पुलाचा उदयकाळ होवो," असें ह्मणून आह्मी सर्वजण विस्की नांवाची दारू प्यालों. ह्या ठिकाणीं उभें राहून पाहिलें असतां धबधबा चांगला दिसतो.

नदीचे कांठीं एक तंबू मारला होता, त्या तंबूमध्यें उभें राहिलें ह्मणजे हा पूल चांगला नजरेस पडत असे. ह्या तंबूचे बाहेरले आंगास सारी मंडळी, अणखी एक ब्यांदबाजा उभा होता. ह्या तंबूमध्यें आह्मी बसून

थोडासा चहा प्यालों, मंडळीशीं थोडेंसें भाषण केलें, आणि मग गाडी-मध्यें बसून मारलाज्ज ह्या जागेवरून घरीं परत आलों. लार्द फैफ व त्यांची पत्नी हीं आपल्या वतनवाडीचे सीमेपर्यंत आमचे आघाडीस चाललीं. मागें एकदां मंडळीचा जमाव झाला होता त्यावेळेस जे लोक आले होते, ते सारे आतां एथें आले होते. क्यामदेन, एराल, व एरली ह्यांच्या घराण्यांतील लोक, म्हातारी झालेली जी लेदी दफ्फ आणि मिस्तर आणि लेदी एल. ब्रूक, आणि दुसरे कांहींजण होते. साडेपांच वाजतां आह्मी घरीं येऊन पोहोंचलों. घरीं येतां येतांना रस्त्यानें थोडासा पाऊसही लागला.

# ह्मातान्या स्त्रियांची भेट.

शनवार, सप्तेंबर ता० २६ वी, सन १८५७.

आलफ्रेद ह्याला घेऊन आलबर्त्त साहेब आज बाहेर गेलें आणि दोघी मुली, व लेदी चर्चिल ह्यांस घेऊन मी पायीं हिंडावयास गेलें. वाटेला एक दुकान लागलें तेथें उभी राहून गरीब गरीब लोकांकरितां कांहीं जिनसा विकत घेतल्या. मग गाडीमध्यें बसून थोडीशी वाट चाललों. मग गाडी सोडून दिली; आणि पायीं चालत चालत टेंकडीवर चढून बालनाक्राफ्त ह्या ठिकाणीं गेलों. ही जागा मिसस फार्कार्सन ह्या बाईची आहे. गरीब लोक कोठें राहतात हें आह्मास दाखवावया करितां व मी कोण आहें, हें गरीब लोकांस सांगावयाकरितां ती बाई आह्मांबरोबर फिरण्यास आली. कोणत्याही झोंपडींत आह्मी गेलों नाहीं तों एक ह्मातारी बायको आह्मांस भेटली. मिसस फार्कार्सन ह्मणाली ही ह्मातारी फार गरीब आहे. अठ्यांयशी वर्षांचें हिचें वय आहे. माजी कलालाची ही आई आहे. तिला मी एक ऊबदार घागरा दिला. मग त्या ह्मातारीच्या सुरकुत्या पडलेल्या गालावरून आनंदाचीं आसवें कोसळलीं. मग तिनें मला सलाम केला आणि ईश्वर तुझें कल्याण करो, असें ती ह्मणाली. ही गोष्ट माझे मनाला लागण्या सारखी होती.

कितीकीर ह्मणून एक ह्मातारी आहे तिचे लहानशा झोंपडींत मी गेलें. तिचें वय शांयशी वर्षांचें आहे, तरी तिची काठी वांकली नव्हती. थोरपणाचे डौलानें तिनें आमचें आगत स्वागत केलें. ती खालीं बसून सूत काढूं लागली. तिलाही मी एक ऊबदार घागरा दिला. ती ह्मणाली, "ईश्वर सदां तुह्मांवर व तुमचे मुलांबाळांवर कृपादृष्टि करो. इहलोकीं व

परलोकीं तुमचें कल्याण करो, आणि तुह्मांस सन्मार्ग दाखवो आणि सर्व संकटां पासून तुमचें रक्षण करो." आमची विकी इतकी उंच आहे असें पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें. ह्या आमचे विकीवर कोणा पाहिजे तिचें मन झटकन जडतें. ज्या झोंपडींत पूर्वीं जेन गार्दन राहत असे त्या झोंपडींत आह्मी गेलों. एथें सिमन्स नांवाची एक विधवा आह्मांस भेटली. हिचें ऐशीं वर्षांवर वय आहे; पण हिच्या तोंडावर छान्दार गुलाबाच्या फुला सारखी टवटवी मारती. पण हिचें कुबड निघून नाक जमिनीस लागलें आहे. ही फार गोड बोलणारी आहे. आह्मां सर्वांचे हातांत हात घालून हिनें सलाम केला, व ह्या मंडळींतील महाराणी कोणती ह्मणून विचारलें आणि पुष्कळ दुवा मागत सुटली. ती ह्मणाली, "ईश्वर तुह्मांस आनंदी करो, आणि इहलोकीं व परलोकीं ईश्वर तुह्मांजवळ असो." आमच्या विकीचें लग्न होणार आहे, असें जेव्हां तिला कळलें, तेव्हां ती विकीला ह्मणाली, "आजपासून पुढें तुला ईश्वर मार्ग दाखवो आणि नेहमी तुला सुख प्राप्त होवो." ही ह्मातारी फार बोलकी होती आणि जेव्हां तिला मी ह्मटलें कीं, तुह्मी भेट पुढल्या वर्षीं घेण्याचें माझे मनांत आहे, तेव्हां ती ह्मणाली, "माझें काय, मला केव्हां देवाचें बोलावणें येईल कोण जाणें." असेंच आह्मांस कितीकीर* ह्मातारीही ह्मणाली.

मग दुसऱ्या तीन झोंपड्यांत आह्मी गेलों, ह्मणजे मिसेस सिमन्स नांवाच्या बायकोच्या झोंपडींत गेलों. शेजारीं राहणाऱ्या ह्मातारीची ही सून आहे. हिचे मुलग्यास बरें वाटत नव्हतें. मग लहानसा ओढा उतरून दुसऱ्या ह्मातारीच्या झोंपडींत गेलों. मग ब्लेर ह्या नांवाच्या सारंगी वाजविणाऱ्याच्या झोंपडीमध्यें जातां जातां आह्मीं नजर टाकली. पुढें गाडींत बसून आह्मीं परतलों. मग गाडी सोडून दिली आणि पायीं चालत चालत मिसस ग्रांत ह्या ह्मातारीचे घरीं गेलों. ही ग्रांतची आई आहे. हिची राहण्याची रीत मोठी टापटिपीची आहे आणि हिचे घरीं जिकडे तिकडे चकपक असतें. तिला मी एक झगा व रुमाल दिला. मग ती ह्मणाली, "तुह्मी मजवर फारच कृपा करितां. एवढ्या कृपेस मी पात्र

* ती सन १८६७ चे जानेवारी महिन्यांत मरण पावली.

नाहीं. दर वर्षी तुह्मी मला अधिक अधिक देत जातां आणि दर वर्षी मी ह्मातारी होत जातें." तिच्याशीं मी थोडा वेळ बोलत बसलें. मग ती ह्मणाली, "आपण मोठ्या सुंदर दिसतां ह्मणून मला मोठा आनंद वाटतो." तिचे डोळ्यामध्यें पाणी आलें होतें. आमची मुलगी विकी हिचें लग्न होऊन सासरीं जाण्याची गोष्ट निघाली तेव्हां ती ह्मणाली "मला मोठें वाईट वाटतें, आणि आपले मुलीलाही वाईट वाटत असेल." तेव्हां आतां तिची माझी भेट होणार नाहीं असें बोलून तिनें आपलें बोलणें सांवरलें. मग ह्मणाली कीं, "असें बोललें ह्मणून मला वाईट वाटतें व त्या मुलीचें वाईट व्हावें असें माझे मनांत नाहीं व जें माझे मनांत येतें, तें मी बोलून नेहमी सोडतें. व कोठें कसें बोलावें हें माझें धोरण चुकतें." हा हा! ही ह्मातारी बाई, ह्या ह्मातारीला पाहून मोठें गोड वाटलें.

हे बिचारे चांगले लोक आहेत. हरएक गोष्टी विषयीं कळकळ करतात, आह्मांस पाहून ह्या लोकांस मनापासून आनंद होतो. ह्या लोकांची ममता पाहून खरोखरच काळीज भेदून जातें व मोठा संतोष वाटतो.

# फीतहार्त ह्या ठिकाणीं आलबर्त्त साहेबांची छावणी पडली होती तेथें आह्मी गेलों.

**मंगळवार, अक्तोबर ता० ६ वी, सन १८५७.**

बारा वाजतां मी गाडीमध्यें बसलें. आमच्या दोघी मुली मजबरोबर होत्या. ज्या ठिकाणीं लोखंडाचे सोटे पडले आहेत तेथपर्यंत गाडींतून गेलों. मग गाडी सोडून आह्मी घोडयावर बसलों आणि फीतहार्त ह्या ठिकाणीं गेलों. आह्मां बरोबर राबर्त्तसन आणि ब्रौन हे आमचे चाकर पायीं



चालत आले. वाट मजेची नवी होती. कारीबुई हें ठिकाण लागलें, मग पुढें फीतलुई हेंही लागलें. मग फीतहार्त ह्या ठिकाणीं चढून जातांना मोठी चढण जी लागते तिचे पायथ्याजवळ आलों. मग घोड्यावरून उतरून आह्मी पायीं चढूं लागलों. वाट सरून डोंगराचे शेंड्याला गेलों नाहीं तों एका एकीं आलबर्त्त साहेबांची जी लहानशी छावणी पडली होती ती दृष्टीस पडली, जो नागमोडीचा रस्ता चालला त्याच्या कडेस ती छावणी होती.

ह्या ठिकाणीं आलबर्त्त साहेब नव्हते, कारण कीं सहा वाजतांना ते बाहेर निघून गेले होते. पण लोहलैन आणि दुसरी हुजरे मंडळी तेथें होती. ह्या ठिकाणीं धाकटेंसें घर होतें त्यांत दोन चार पेट्याबिट्या ठेवण्याकरितां घडवंची होती. पण बसायाला खुरची पाट कांहीं नाहीं. एक धाकटीशी चूल होती. कसें ह्मटलें तरीं हें घर ठीक व सोईदार नाहीं असें वाटलें नाहीं; पण वारा मोठा दांडगा आणि फारच झपाट्याचा सुटला होता. पाव तास तेथें आह्मी वाट पाहिली. मग आलबर्त्त साहेब आले. सहा वाजल्यापासून बाहेरच ते रानामध्यें होते. त्यांनीं तीन काळवीट मारले, पण वाईटसा फक्त एकच त्यांचे हातीं लागला. काल संध्याकाळचे शिकारींत त्यांनीं एकच छान्दार काळवीट मारला, पण त्यांना श्रम फार पडले. गेल्या रात्रीं थंडी फार पडली होती तिनें मोठा त्रास करून दिला व वाराही फार सुटला होता; तरीं आलबर्त्त साहेबाला झोंप लागली. आलबर्त्त साहेबांच्या झोंपडींत उघडलेल्या दारापाशीं बसून आह्मीं फराळ केला. चाकर लोकांकरितां दुसरी झोंपडी होती. फराळ झाल्या नंतर आह्मी बालखबुई ह्या टेंकडीवरून चाललों व ज्या ठिकाणीं दलदलीत जमीन लागली त्या ठिकाणीं घोडयावर बसलों. आह्मी खालीं उतरत असतां पुष्कळ हरणें आमचे दृष्टीस पडलीं. एकाएकींच रस्त्याचे जवळच एक मोठा काळवीट दृष्टीस पडला. आलबर्त्त साहेबानें त्याला गोळी घातली, आणि तो काळवीट एकदम खालीं पडला. हा हा! त्याचीं शिंगें काय मजेचीं होतीं आणि त्याचे एका बाजूचे शिंगास काय मजेचा फांटा फुटला होता!

मग क्रेगदेन एथपर्यंत रान उठविलें. अरेरे! आलबर्त्त साहेब श्रमानें फार थकून गेले आणि घोडे बरोबर नव्हते ह्मणून त्यांला सारा वेळ पायानें चालावें लागलें. थोडीशी वाट आह्मी घोड्यावर बसून चाललों. रस्त्यानें खालचे बाजूस गाडींत बसून गेलों. एका झाडा जवळ आह्मी बसलों असतां आलबर्त्त साहेबाचे जवळ एक मोठा काळवीट आला. मग त्यांनीं त्याला एका गोळी सरसा मारला. आज पाऊस नाहीं अभाळ नाहीं, तरी केव्हां केव्हां थंडी फार पडली होती. साडेसहा वाजतां आह्मी घरीं येऊन पोहोंचलों.

# बर्फ पडलें तें.

**सप्टेंबर ता० १८ वी, सन १८५८.**

आहाहा! सरते शेवटचा दिवस हा! जेव्हां आह्मी सकाळीं उठलों तेव्हां हवा फार वाईट पडली होती, तेणेंकरून आमची निराशा झाली. जिकडे तिकडे बर्फ पडून पांढरें फटफटीत झालें होतें. जमिनीवर निदान एक इंचभर तरी बर्फ साचलें असावें, आणि आज सकाळीं पांच वाजल्यापासून बर्फ पडण्याचा एकसारखा भडमार चालला होता. अणखी बर्फ पडून आमची खोटी व्हावी अशी आमची इच्छा झाली. असें जर घडून येतें तर मला किती संतोष झाला असता! साडेदाहा अथवा अकरा वाजे तोंपर्यंत असें बर्फ पडत होतें; मग हळूच आकाश निरभ्र होऊं लागलें व हवा साफ होऊं लागली. आसपासच्या टेंकड्या पांढऱ्या सफेत दिसूं लागल्या. सूर्यबिंब बाहेर पडलें आणि जिकडे तिकडे चक प्रकाश पडला. हीं बनें उठवावीं असें आलबर्त्त साहेबांचे मनांत होतें; परंतु ह्यांस दाक्तर राबर्त्तसन् ह्याच्या बरोबर क्रेग्गोवन ह्याचे पलिकडे घोड्यावर बसून अगोदर जावें लागलें. उठवावयाचीं बनें ह्यांस कारप्बुद्स असें लोक ह्मणतात; तरी त्यांचें खरें नांव गार्मादीवुद्स असें आहे. खेड्याच्या वरले बाजूला क्रेग लरागेन ह्याचे समोर राबरेख नांवाचें स्थल आहे. तेथें दन्कनाकरितां नवें घर बांधावयाचें आहे. तें स्थल पाहवें असा त्यांचा मतलब होता. त्या स्थळावर उभें राहून पाहिलें असतां उत्कृष्ट देखावा दिसतो. ग्रांतचे घरीं माझी आणि आलबर्त्त साहेबांची गांठ पडावी असा संकेत ठरला.

एक वाजतां अलिस आणि लेंचेन* ह्या दोघींजणीला घेऊन ग्रांताचे घरीं जाण्याकरितां मी निघालें. त्या ठिकाणीं माझी आणि आलबर्त्त

* प्रिन्सेस हेलीना.

साहेबाची गांठ पडली. मग आलबर्त्त साहेब आमचे गाडींत येऊन बसले. आहा हा! ह्या दिवसाची शोभा काय सांगावी ! नदीपाशीं गेल्यावर आह्मी गाडींतून उतरलों, आणि नेलीस बुश ह्या ठिकाणीं जाणार होतों, इतक्यांत जवळच एक काळवीट डरका फोडतो आहे असें ऐकूं आलें; ह्मणून आह्मांस थांबावें लागलें. आमचे जवळ चोगे आणि रुजामे होते, ते आह्मी आंथरून बसलों, ह्मणून आह्मांला खरोखरच भिजावें लागलें नाहीं. पुढें आह्मी दम घेत बसलों. आलबर्त्त साहेब त्या काळविटा-जवळ गेले, तों तो काळवीट उठून जातो असें दिसून आलें. मग आल-बर्त्त साहेबांनीं बंदुकीचे दोन बार काढले ते आह्मांस ऐकूं आले आणि तो काळवीट परतला आणि उभा राहिला, आणि मग दिसेनासा झाला. आलबर्त्त साहेबांनीं अणखी पुढें एक बार काढला. पण तो काळवीट ही नदी उतरून आधींच पार झाला होता ह्मणून आह्मी परतून पुनः रस्त्यावर आलों. आणि कारी बुई ह्या ठिकाणीं आह्मी गेलों. अरे अरे! ही जुनी जागा आह्मांला फार आवडते. आह्मी उगीच दम खात बसलों. तों इकडे आलबर्त्त साहेब एकादें हरण बिरण आसपास आहे कीं काय, हें पाहत पाहत फिरत होते. नेहमीं ज्यामध्यें पाण्याची दलदल असते, अशा एका जागीं आह्मी आलों आणि परवां पाऊस पडला होता आणि बर्फ पडलें होतें, ह्मणून आतां पाण्याची फारच दलदल झाली होती. घोड्यावर बसावें तर घोडें बिडें कांहीं नव्हतें. त्या दलदलीमध्यें उंच उंच गवत उगवलें होतें, त्या गवतांतून चालून माझे पाय भिजतील, ते भिजूं नयेत असें माझ्या मनांत होतें ह्मणून आलबर्त्त साहेबांनीं एक युक्ति काढली. ती असी कीं, एका चोग्याची झोळी करून तींत मला बसवून लोकांनीं पलिकडे न्यावें, व ह्या प्रमाणें लेंचेन हिला प्रथम पलिकडे नेलें; परंतु ती झोळी फारच खालीं धरली होती, आणि तिचे पाय खालीं लोंबकळत होते ह्मणून आलबर्त्त साहेबांनीं असी तजवीज काढली कीं, चोगा मनुष्यांच्या खांद्यावर बांधावा आणि मी त्यावर बसावें. मग ब्रौन आणि दंकन हे मोठे बळकट आणि हुशार, ते मला नेण्याकरितां तयार झाले. मग एकाचे खांद्यावर एक हात आणि दुसऱ्याचे खांद्यावर दुसरा हात टाकून मी स्वस्थ बसलें आणि कांहीं त्रास नहोतां त्या दल-

दर्लीतून मी पार पडलें. सगळे हैलंदर लोक मोठ्या मौजेचे आहेत आणि त्यांची चालचर्या मोठी गोड आहे. त्यांच्यांशीं भाषण केलें तर मोठा उपयोग व्हावयाचा, मग त्या बायका असोत अथवा पुरुष असोत. आणि पुरुष ह्मटले तर फारच सभ्य असतात. आह्मीं इकडे फराळ करीत बसलों असतां जवळच आलबर्त्त साहेब बंदुकीचे बार काढीत होते, ते ऐकूं आले. मग त्या आंगाला सर्व लोक एकदम धावूं लागले. पुढें लवकरच आलबर्त्त साहेबांची आणि आमची गांठ पडली. लपून छपून त्या काळविटा मागून हिंडतां हिंडतां आलबर्त्त साहेबांला फारच श्रम झाले होते. कित्येक दिवस ह्या काळविटाला मारण्याकरितां आलबर्त्त साहेब टपत बसले होते. पण आतां एका गोळी सरसेंच त्या काळविटाला ठार मारलें. मग तो आमच्या दृष्टीस पडावा ह्मणून त्याला आह्मांपाशीं आणिलें. त्याचा रंग पुसकट होता. सरळ व मोठीं शोभिवंत त्याचीं शिंगें होतीं व त्या शिंगांची जाडी अचंबा वाटण्यासारखी होती. मग क्यारप भोंवतालीं रान उठवावें ह्मणून फिरत फिरत चाललों. हा! हा! ह्या ठिकाणचें सृष्टिस्वरूप सर्वोत्कृष्ट होतें. बर्फाची एक लहानशी सर पडून गेली होती खरी, पण आतां जिकडे तिकडे ऊनच ऊन पडलें होतें. टेंकड्यांवर बर्फाचें पांघरूण झालें होतें. झाडांचा रंग सोनेरी आणि खालच्या टेंकड्यांचा उदीरंग! दुपारचे प्रहरचें चकचकीत आकाश, हा! हा! ह्याची शोभा काय सांगावयाची आहे? कोणी कवीनें खालीं लिहिलेली कविता केली आहे. तर आतां जें काय माझे दृष्टीस पडलें त्याचें हुबेहूब वर्णन त्या कवितेचे वर्णनावरून कळेल.

**॥ कविता ॥**

शोभा चकाके; कान्ति ढाळे; अक्तोबर महिना हा.<br>
बहर फुलाचा निघून जातो, मोहोर सुकला हा! हा!<br>
खुले लाली तरी रानीं नेच्याचीं; झाडें हिरवीं पाहा.<br>
आल्दर हिरवा, ओक हि हिरवा, लालपीला रोबन हा.<br>
आस्पेन साजे; तेज फाके, उडती कण सोन्याचे.<br>
बर्च सजून ही तरुणी आली, रत्न वेणीमधीं साचें.

सुवर्णपुष्पीं केश गुंफिले, झुले मजेची छानी·
लोंबती कानीं जणों लालडी, खुले गळ्यामधीं तन्मणी.
सर्वांग जणों हें कोंदून गेलें, त्रासे तिचा जीव खरा.
ह्मणून दामिनें रत्नेंमोतीं, फेकून देती चौफेरा.

आहा! आहा! हीं ईश्वराचीं शोभिवंत कामें मी डोळे लावून पाहत बसलें. माझानें डोळा काढवेना. आतां स्कातलन्द देशांत राहण्याचा हा आमचा सरते शेवटचा दिवस आहे असें मनांत येऊन वाईट वाटूं लागलें. आणि अशी ही बर्फ पडून मौज झालेली पुनः वारंवार दृष्टीस पडणार नाहीं, ह्मणून तो रंग आणि ती मौज बिंबून घेऊन मनामध्यें वागवावी, विसर पडूं नये, असें मी करूं लागलें. सन इसवी १८५२ नांत अशी मौज एकदा आमचे दृष्टीस पडली होती. पण उंच टेंकड्याचे माथ्यावर थोडें बर्फ पडलें आहे, सरी येताहेत, बर्फाचीं वादळें सुटताहेत, असें जरी आह्मीं पुष्कळ वेळा पाहिलें; तरीं अशी मौज तेव्हांपासून कधींही पाहिली नाहीं.

## मोरवन पर्वतावर चढलों त्याविषयीं.

**सप्टेंबर ता० १४ वी, सन १८६९.**

माझ्या अति प्रियकर आलबर्त्त साहेबांस आज ब्रिटिश असोशिएशन (विद्वान लोकांची मंडळी) ह्या सभेमध्यें अध्यक्षस्थान घेण्याकरितां एक वाजतां आबरदीन शहरास जावयाचें होतें ह्मणून माझें मन फार उदासीन झालें.

आलिस, स्वारीबरोबरच्या दोन बाया, लार्ड चार्लेस फित्सरॉय, आणि ब्रौन ह्यांच्या सहवर्त्तमान मी मोरवन डोंगर पाहण्याकरितां किंचित् एक वाजण्यापूर्वीं निघालें. गेर्नच्या पायथ्यास आह्मीं टप्याचे घोडे घेतले, आणि उतारा टाळून दऱ्याच्या उजव्या बाजूनें मोरवनच्या पायथ्यास नव्या रस्त्यानें अडीच वाजतां जाऊन पोहोंचलों.तेथील शिकारी करण्याचें घर तेथून फार दूर नव्हतें. पुढें आह्मी सर्व जण तट्टांवर बसलों आणि चाकरां सहवर्त्तमान निघालों, तेव्हां जेमी कूल्स आमचा वाटाड्या झाला. हा मनुष्य आमचा जुन्या ओळखीचा आहे व हल्लीं शिकारीच्या घराचा राखणदार आहे. अर्धी चढण चढून गेल्यावर एका ओहोळाच्या कांठीं आह्मी थांबलों, आणि सुंदर व मऊ अशा गवतावर सत्रंजी टाकून फराळ केला. नंतर किंचित् इकडे तिकडे फिरून मग नकाशे काढून पुनः तट्टांवर बसलों, आणि मोरवनचा माथा चढूं लागलों. ती चढण पाय निसरण्या सारखी कठीण होती. त्या चढणीस आमचा ब्रौन "फागी" (ह्मणजे हैलंद भाषेंत शेवाळलेली असा अर्थ होतो) असें ह्मणाला. माझें लहान तट्टू फार लठ्ठ असल्या मुळें अतिशयच धापा टाकूं लागलें. मोरवन डोंगर २७०० फूट उंच आहे, आणि त्यावरून जो भव्य देखावा दिसतो तो

केवळ अवर्णनीय आहे. तेथून पदार्थ सर्व मोठे आणि अवळ असे दिसत होते. समुद्रासारखा दिसणारा डोंगरांचा पसारा नजरेस पडला, व त्या डोंगरांचीं शिखरेंही अति सुंदर निळ्या रंगाचीं दिसत होतीं व तेथून ड्यूक आफ् रिचमंद ह्याचें वतन दिसत होतें. आणि बक आफ् केब्राख नांवाचा डोंगर व त्यापलिकडे स्लेत हिल्स नांवाच्या टेंकड्या व पूर्वेकडे आबरदीन शहर, आणि केवळ निळा दिसणारा समुद्र, व त्यावरील गलबतें हीं स्पष्ट दिसत होतीं. तारलंद आणि बालातर ह्यांच्या मधली उंच जमीन व दक्षणेकडे पसरलेला मौंतकी नांवाचा डोंगर; नैर्ऋत्येस लाखनगार सरोवर; आणि पश्चिमेस बेनआन आणि बेनाभूर्द ज्या डोंगराला "गेर्नची भूमि" असें ह्मणतात; शिवाय म्युइख आणि दी नदीची थडी हीं सर्व दिसलीं. आहाहा! किती हा देखावा मनोरंजक होता! जेथें आह्मीं फराळ केला होता तेथपर्यंत खालीं पायीं चालत गेलों, नंतर तट्टांवर बसून पायथ्याशीं आलों. एथें सर जे. जी. रातक्लिफ ह्याचा मुलगा आणि मुलगी हीं दोघें त्या शिकारीच्या घरांत राहत होतीं. त्यांनीं मेहरबानी करून आह्माकरितां बिस्तव, चहा आणि कांहीं रोट्या वगैरे आणून दिल्या. आह्मी चहा पिऊन साडेसहा वाजतां गाडींत बसून निघालों तों बालमारल एथें साडेसात वाजतां पोहोंचलों. परंतु माझा प्राणप्रिय पति घरीं नसल्या मुळें मी दुःखित झालें.

# आबरदीन शहराहून प्रिन्स आलबर्त्त साहेब परत आले त्याविषयीं.

सप्तेंबर ता० १५ वी, सन १८५९.

काल रात्रीं तारा यंत्रांतून बातमी अशी आली कीं, आलबर्त्त साहेबांचा आबरदीन शहरांत मोठा सत्कार झाला, आणि भेटीचा समारंभ उत्तम प्रकारें चालला आहे, ही सर्व ईश्वरी कृपा होय. आलिस, हेलिना, बर्ती, लेदी चर्चिल, कर्नल ब्रूस, आणि आमचे नेहमीचे चाकर ह्यांच्या सहवर्त्तमान मी लाखनगार नामक डोंगरावर गेलें आणि सहा वाजून गेल्यावर परत आलें. सात वाजून दाहा मिनिटें झाल्यावर माझे प्रियकर आलबर्त्त साहेब परत आले. तो सर्व थाट उत्तम प्रकारें झाला; पुष्कळ विद्वान लोकांच्या गांठीही पडल्या, त्यांनीं जें संभाषण केलें तेणेंकरून सर्व लोक खुष झाले आणि त्यांचा आदर सत्कारही फार चांगला झाला. मिस्तर ताम्सन् ह्याचें बान्कारी नांवाचें घर आबरदीन गांवापासून दोन कोसांवर आहे तेथें आह्मी सुखानें राहिलों होतों, असें आलबर्त्त साहेबांनीं मला सांगितलें.

# ब्रितिश असोशियेशनच्या सभासदांस मेजवानीस आमंत्रण.

सप्तेंबर तारीख २२ वी, सन १८५९.

प्रभातकाळ स्वच्छ होता; मग एकाएकीं फार मोठा वारा सुटला, तेणें-करून आह्मांस बरा भीति वाटली. परंतु आकाश स्वच्छ होतें, तेव्हां असें वाटलें कीं, वारा पाऊस घालवून टाकील, पण न्याहारी झाल्यावर तयारी करूं लागलों, तों पावसाच्या सरी येण्यास आरंभ झाला. आणि साडे अकरा वाजल्या पासून पावसाच्या धारा इतक्या दाट पडूं लागल्या कीं, जणूं काय पाण्याचा शुभ्र पडदाच पडतो आहे, असें दिसलें. आणि असा पाऊस साडेबारा वाजततों पडत होता. मी अगदीं निराश होऊन गेलें, परंतु शेवटीं उघाड होऊं लागली तेव्हां आमचे शेजारी आपल्या सर्व कुटुंबां सहित व समोर राहणारे ( हेरन व दंकन ह्या नांवाचे लोक आणि ब्रौनचा बाप आणि भाऊ) असे कांहीं शेतकरी आले, नंतर "तत्वज्ञानी" लोकानीं भरलेले मोठाले जनरथ आणि गाड्या आल्या. दोन वाजतां आह्मी सर्व तयार झालों. आलबर्त्त साहेब आणि मुलगे ह्यांनीं हैलंदी पोषाग केला आणि म्यां व मुलीनीं काळ्या मखमालीचा पेहराव करून त्यावर स्त्युअर्त राजघराण्याच्या रीतीचे शेले व शाली पांघरल्या होत्या.

जरी थोडा वेळ त्रासदायक लहान लहान पावसाच्या सरी येत होत्या, आणि थंड गार मोठा वारा सुटला होता, तरी मंडळीचा समाज फार सुंदर दिसत होता. मधून मधून सूर्याचीं किरणें पडत, हैलंद लोकांचा पोषाग, ब्यागपैपांचे विलक्षण सूर, बेणबाजा, आणि पाठीमागले डोंगर चकचकीत आणि चित्रविचित्र ह्या सर्वांच्या योगेंकरून हा देखावा

अति मनोरंजक दिसत होता. करनल फार्कर्सन, लार्ड फैफ, आणि सर चार्लस फार्बस हे आपापल्या लोकांसहवर्त्तमान त्या ठिकाणीं आमच्या पूर्वी आले होते. त्यांना आमचे समोर उभे केलें होतें, आणि त्यांचे मागें गांवचे लोक होते. मंडळी सहवर्त्तमान आह्मीं धमाम्यावर उभे होतों, आणि विद्वान् लोक आमच्या दोहों बाजूनीं उतरणी वरून उभे होते. सुमारें तीन वाजतां खालीं लिहिलेल्या खेळास सुरुवात झालीः—

१ लें, हातोडा झोंकणें.

२ रें, गदा झोंकणें.

३ रें, दगड झोंकणें.

खेळ आटोपल्यावर ह्यांतील प्रत्येकामध्यें जे तीन असामी उत्तम ठरले, त्यांस आह्मी बक्षिसें दिलीं. जेथें लोक दगड झोंकण्याचा खेळ करीत होते, तेथपर्यंत लोकांशीं बोलत बोलत जाऊन आह्मी तंबूकडे गेलों. नंतर मनुष्यांची दौड पाहण्याकरितां आह्मी तेथून निघून वरच्या धमाम्यावर गेलों. हा गांवढळ खेळ पाहण्याची मौज वाटते. दौड करणाऱ्या लोकांच्या आगांत फक्त एकेक कमीज व एकेक घागरा असल्यामुळें ते थंडीनें काकडून गेलेसे दिसले, तथापि पळण्यांत ते निष्णात दिसले. उबेचीं वस्त्रें पांघरून ते मजकडे बक्षिसें घेण्याकरितां आले. सरते शेवटीं रील नांवाचा नाच व गिलीकालम नांवाचा नाच ह्यांची सुरुवात झाली. ह्या गिलीकालमाविषयीं पंचांचा निश्चय ठरेना ह्मणून पुनः पुनः तो नाच नाचावयास सांगितलें; मग शेवटीं सर्वांपेक्षां जो चांगला नाचणारा होता त्यास पंचांनीं गाळलें! पंच ह्मणाले इतकें "चांगलें" नाचणें आह्मांस पसंत नाहीं! नृत्य आटोपल्यावर आह्मी चालते झालों व लोकांनीं जयजयकार केले, त्यावेळेस सुमारें साडेपांच वाजले असतील. रस्त्यांतून हैलंदर लोक व दुसरे कित्येक लोक जातांना आह्मी खिडकींतून पाहिले, त्यांचे पाठीमागून चार मोठे जनरथ गेले; त्यांत विद्वान लोक बसले होते. ह्यांत प्रोफेसर ओवेन, सर देविद ब्रूस्तर, सर जान बैरिंग, मिस्तर जे. रास्को आणि सर जान रास हे होते. त्यांशीं आह्मी कांहीं वेळ बोललों. बहुतकरून सर्व लोक गेल्यानंतर आंगांत उबारा यावा ह्मणून थोडा वेळ बाहेरून फिरून

आलों. मेजवानीचा रंग चांगला आल्यामुळें आह्मी आनंदांत होतों. नंतर जेवणाचे वेळीं ड्यूक आफ् रिचमंद, सरआर.मरकिसन, जनरल स्याबिन, बान् कोरी हौसचे मिस्तर तामसन, सभेचे चिटणीस प्रोफेसर फिलिप्स हे सर्व आमच्या पंक्तीला होते व ते सर्व आमच्या घरांत निजले. माझ्या एके बाजूस कौंत आफ् फ्लांदर्स जो आमचा बंधु तो बसला आणि दुसऱ्या बाजूस ड्यूक आफ् रिचमंद बसला. माझे प्रियकर पति आलबर्त्त साहेब ह्यानीं आबरदीन एथें जें सर्वोत्कृष्ट संभाषण केलें, तेणेंकरून सर्व लोकांना आनंद झाला अशी ह्या मंडळीनें स्तुति केली. फार्बसची छावणी आमच्या घराच्या समोर होती तेथील विस्तार आमच्या दृष्टीस पडत होता.

# इंचरोरी एथें आमचें जाणें.

सप्टेंबर ता० ३० वी, सन १८५९.

अकरा वाजून वीस मिनिटें झाल्या नंतर आह्मी हेलिना व ल्युईज ह्या आपल्या मुलां बरोबर गाडींत घेऊन व ग्रांत ह्यास कोच बाक्सावर बसवून लाखब्युलिग नांवाच्या सरोवराकडे जाण्यास निघालों. जातांना ब्लेरग्लास आणि दालद्रूनी ह्या नांवाचे शेतगणे आह्मांस लागले, आणि दाहा मैलांवर कार्नदावन नांवाचें शिकारींचें घर आहे त्यावरून आह्मी गेलों. कार्नदावन एथें आमचे घोडे तयार होते. (माझ्या घोड्याचें नांव "विक्तोरिया") त्यांजवर बसून आह्मी त्या सरोवराच्या कांठानें चाललों. पुढें एका दऱ्यांतील नागमोडी रस्त्यानें आह्मी चाललों. तो दरा कोठें कोठें आह्मांस रस्ता नाहीं कांहीं नाहीं असा दिसला. दरा टाकल्या नंतर एका लहान नदीच्या कांठानें चाललों. इकडे आह्मी पूर्वी कधीं आलों नव्हतों ह्मणून आमच्या पैकीं कोणासही त्या नदीचें नांव माहीत नव्हतें. सभोंवतालच्या टेंकड्यावर कोठें कोठें बर्च नामक झाडें होतीं; खालीं दऱ्यांत गवत उगवलें होतें, तेथें आमच्या दृष्टीस हरणें पडलीं. जसजसे आह्मी इंचरोरीच्या जवळ जवळ आलों, तसा तसा देखावा अधिक अधिक रमणीय दिसूं लागला. हा देखावा पाहून आह्मांस ग्लेन्तिल्तचें स्मरण झालें. इंचरोरी हें लार्ड एच. बेंतिक ह्याचें शिकारीचें घर आहे. आवन नदी डोंगरांपासून निघून मोठ्या विस्तीर्ण पात्रानें वाहते, तेणेंकरून तर इंचरोरीला अधिकच शोभा आली आहे.

इंचरोरी एथें पोहोंचल्यावर गेनेशील नामक शिकारीच्या घराचे बाजूनें टेंकड्यांवरून जाण्याला रस्ता आहे काय? ह्मणून विचारल्यावर

तेथील लोक बोलले कीं, होय आहे, परंतु तो अकरा मैलांचा टप्पा आहे. ग्रांत अथवा ब्रौन ह्यानें हा रस्ता पूर्वी पाहिला नव्हता. तरी आह्मी त्या रस्त्यानें जाण्याचें कबूल केलें. तरतूद केल्या वांचून ह्या निर्जन अरण्यांतील रमणीय टेंकड्यांतून जाण्याचें मला बरें वाटलें. आमच्या बरोबर आमचे चांगले हैलंदर मात्र होते. हे मोठे सुख स्वभावाचे, आनंदी व सांगितलेलें काम मोठ्या शिताबीनें करणारे आहेत. त्या टेंकड्यांतून एक नागमोडी रस्ता जातो त्या रस्त्यानें इंचरोरीच्या वरच्या बाजूला वळून पुढें चाललों. त्या रस्त्यापासून लागनाल ह्याच्याकडे पाहतां आह्मांस मोठा सुंदर देखावा दिसला. एका सुंदर तृणमय उटंगळावर बसून आह्मीं उपहार केला.

उपहार झाल्यानंतर आह्मी पायीं थोडा रस्ता चाललों, मग फिरून घोड्यांवर बसून पाणथळांतून "ब्रौनकौ" वरून चाललों. (ह्या ब्रौन-कौच्या पलिकडच्या बाजूनें गाडींत बसून गेलों होतों.) वाटेनें एक मेंढका भेटला त्याला ग्रांत ह्यानें विचारलें, परंतु त्यापासून ग्रांतला फारशी माहिती मिळाली नाहीं. पुढें दऱ्यांतील धान्याचीं शेतें लागलीं. त्यानंतर फेवंचें आणि इंचमोर टाकल्यावर एक चांगला रस्ता लागला. ह्या रस्त्या-वर ग्रांत आणि ब्रौन हे चमत्कारिक चालीनें चालले, त्यांचा वेग दर तासास पांच मैलांपेक्षां अधिक होता. त्यांतून ब्रौन हा तर बोरानें व सहब डाम डौलानें चमत्कार वाटण्याजोगें पाऊल टाकीत टाकीत चालला. पुढें दालनादार्फ शील नांवाचें सरचार्लस फार्बस ह्याचें शिकारीचें घर लागलें. त्याच्या पुढें जुन्या लष्करी रस्त्यानें चाललों. त्याच्या डाव्या बाजूस इनवरनेसच्या रस्त्या वरील काकब्रिज ह्मणून एक लाहनसा फूट गांव आहे, तो आह्मांस लागला व उजवीकडे कारगार्फ नांवाचा जुनाट किल्ला होता. त्या खालीं दान नदी वाहत होती, ती आह्मांस दिसूं लागली. ह्या नदीस मिळणाऱ्या एका नाल्याच्या बाजूनें टेंकड्यांतून जो रस्ता जातो त्याकडे आह्मी वळलों. हा रस्ता फार खराब व ओसाड होता. नंतर दालचीपर आणि दालवौन लागले; तेथून वर चढतांना डावे बाजूस कांहीं अंतरावर तारनाहोइश पाहिलें. ह्या डोंगराळ रस्त्यावरून व कांहीं जुनाट

व मोडकळीस आलेल्या पुलांवरून जाऊन तारना होइश कडे आण्याला ज्या रस्त्यानें आह्मी गेलों होतों, त्याला येऊन मिळालों. आंधार पडत चालला होता, परंतु आकाश निरभ्र होतें. घोड्यावरून उतरून मुलीसहवर्त्तमान मी कांहींशी पायीं चाललें. आलबर्त्त साहेब कांहींसे पुढें पायीं गेले होते, व ग्रांत आलबर्त्त साहेबांच्या तट्टावर बसला. पी• राबर्त्तसन, आणि केनदी वगैरे हे पाळी पाळीनें फराळाची पांटी घेऊन चालले.

पुनः घोड्यांवर बसून चाललों. ब्रौन ह्यानें माझ्या लगामाची वादी धरून माझा घोडा ग्लासखायल नामक टेंकडीच्या चढणीवर खूप पळविला. शेवटीं सात वाजल्या नंतर गेर्नशील नांवाच्या शिकारीच्या घरास येऊन पोहोंचलों; ते वेळेस काळोख फार होता. तेथें आमची गाडी आह्मास मिळाली तिजमध्यें बसून आह्मी फार जलद चालते झालों. नंतर तट्टांस थोडा चंदी चारा देऊन त्यांस आमच्या मागून आणण्यास सांगितलें. रस्ता फार वाईट व कोठें कोठें मोठ्या चढणीचा असल्यामुळें आह्मांस फार हळू हळू जावें लागलें.

घरीं आठ वाजून दाहा मिनिटांनीं येऊन पोहोंचलों. हा दिवस मौजेनें गेल्यामुळें आह्मी आनंदांत होतों. रात्रींही थंडी वगैरे कांहीं पडली नव्हती. ह्या डोंगराळ प्रदेशांतील ज्या चमत्कारिक जागा आहेत, त्या सर्व पाहाव्या, असें माझ्या मनांत आलें. आह्मी एकंदर पसतीस मैल चाललों. त्यांत साडे एकोणीस मैल घोड्यावरून चाललों. लहान मुलें दिवसभर फार आनंदांत होतीं.

## बेनम्युइखधूई ह्या पर्वतावर गेलों त्याविषयीं.

**शुक्रवार, अक्तोबर ता० ७ वी, सन १८५९.**

साडे आठ वाजतां न्याहारी केली. नंतर नऊ वाजण्यास दाहा मिनिटें कमी होतीं तेव्हां आह्मी बर्ती, आलिस, व आमची नेहमीची परिचारक मंडळी ह्यांसहवर्त्तमान गाडींत बसून बेनम्युइख धूई हा पर्वत पाहण्याकरितां निघालों. गाडी नदीच्या पलिकडच्या तिरानें चालविली, तेव्हां सूर्यप्रकाश बराच पडला होता, आणि कांहीं वेळानें अगदीं आकाश निरभ्र होईल असें वाटत होतें. तथापि टेंकड्यांवर कांहींसें अभ्र होतें, त्याचें कसेंकाय होतें ह्याविषयीं आह्मी काळजीनें वाट पाहत होतों. क्यासलतन एथें टप्याचे चार घोडे घेऊन शील आफ् दी देरी ह्या नांवाच्या घरापर्यंत अकरा वाजण्यापूर्वी येऊन पोहोंचलों. ह्या रमणीय ठिकाणीं गतवर्षी आह्मी आलों होतों. परंतु माझे प्रिय आलबर्त्त साहेब हे आले नव्हते. आमचीं तट्टें एथें केनेदी, राबर्त्तसन, जेमि स्मिथ ह्यांजवळ होतीं. त्यांजवर बसून आह्मी चालते झालों. मी "विक्तोरिया" नांवाच्या तट्टावर बसलें व आलिस ही "दाबिन्स" नांवाच्या तट्टावर बसली. एका तट्टावर फराळाची पांटी होती. आमचे झगे वगैरे सामान कांहीं तट्टावर होतें व कांहीं चाकरांजवळ होतें, बार्ज माक् हार्दी हा आमचा वाटाड्या होता. हा मोठा पोक्त मनुष्य असून ह्या प्रांताचा चांगला माहितगार आहे. हा वाटाड्याचाच धंदा करीत असतो व प्रवासी लोकांचीं ओझीं जनावरांच्या पाठीवरून वाहतो. त्यानें ह्या कामाकरितांच पाठाळ गुरें बाळगिलीं आहेत. त्याच्याबरोबर ग्लेनृदेरीच्या चढणींवर दोन कोश गेलों. उंच सखल जागीं माझें तट्टू ग्रीन हा फार वेळ धरून चालला. ग्लेनृदेरी एथें पूर्वी मोठें एक सुंदर अरण्य होतें; परंतु एथें तूर्त जी थोडी

वनशोभा राहिली आहे ती सुद्धां रमणीय आहे. उजव्या बाजूस केर्नदेरी होतें, आणि खालच्या अंगाकडे देरीवातर नांवाची नदी वाहत होती. रस्ता फार खडकाळ व वाईट होता. आणि गुरें गोठाणाकडे त्यावरून जातयेत असल्यामुळें तो फारच खराब झाला होता. दरा टाकल्यावर आह्मी नदी उतरलों. पुढें कांहीं साफ रस्ता टाकल्यावर एक लहान व सोपी परंतु अडचणीची अशी चढण लागली, तिच्या बाजूनें आह्मी डावीकडे वळलों. व कारी एचन इकडे चाललों. हें एक विस्तीर्ण व उंच नीच असें मैदान आहे. मध्यें कोठें कोठें मोठमोठे कडेही आहेत. ह्याचे उजवे बाजूस बेनमेन नामक उंच डोंगर आहे, आणि डावे बाजूस देरीचें केर्नगार्म् आहे. ह्या उंच डोंगरीच्या शिखरावर पोहोंचल्यावर ह्याच पर्वताच्या नांवाचें सरोवर आहे, तिकडे आह्मी गेलों. तें पाहून आह्मांस लाखनगार आणि लाखनानियन ह्या सरोवरांचें स्मरण झालें. देरीशील नामक शिकारीच्या घरापासून ह्या डोंगरावर चढत असतांना आह्मांस चढण ह्मणून विशेष जाणवली नाहीं. एथून बेनआन व कांहीं इतर टेंकडया दिसतात. ह्या वेळेस धुकें इतकें दाट आलें होतें कीं, पुढचें मनुष्य देखील दिसेना, व थंडी फार पडली होती. आलबर्त्त साहेब हे बराच वेळ पायीं चालले. धुकें इतकें दाट होत चाललें कीं, आह्मी बेनम्युइख धूई ह्या पर्वताच्या सपाट व खडकाळ कण्यावरून जात असतांना शिखरावर आहोंत किंवा सपाट जमिनीवर आहोंत हें कांहींच कळेना. तथापि मी आणि आलिस अशा दोघीजणी पर्वताचे अगदीं शिखरावर गेलों; तेव्हां सुमारें दोन वाजून कांहीं मिनिटें झालीं असतील. एथें एका दगडाच्या एक उतरंडीवर आह्मीं उपहार केला. तेथें जवळच आमचे घोडेवाले घोडे धरून एका ठिकाणीं उभे होते. त्या वेळीं अंगास कांटे आणणारा वारा सुटला होता.

इतक्यांत एकदम वाऱ्याचा मोठा सुसाटा येऊन धुकें वितळून नाहींसें झालें. तेणेंकरून सभोंवतालचा देखावा मोठा रमणीय व शोभिवंत दिसूं लागला. तो सुंदर देखावा पाहण्याकरितां आलिस आणि आलबर्त्त हे उपहार झाल्यावर कड्याकडे गेले, आणि मागाहून मला बोलावणें

पाठविल्यावर मीही तिकडे गेलें. तिकडे जाण्याच्या रस्त्यावर मोठमोठाले दगड अव्यवस्थित ठेवल्यामुळें मी ग्रांतचा हात धरून वरतीं गेलें. वारा फारच सुटला होता, तरी देखावा स्पष्ट पाहिल्यावांचून राहवेना. जें जें आमच्या दृष्टीस पडलें, तें तें सर्व सांगण्यास अशक्य आहे. तथापि कांहीं थोडें बहुत सांगतें. बेनिग्लो आणि वेल आफ् दी ह्या डोंगरांमधील दी नदीचें उगमस्थान व कांहीं आजू बाजूचे डोंगर, बेनमाकी, बेनाभूर्द बेनआन, अणखी कांहीं इतर भव्य कडे व खडक पाहिले; तेणेंकरून आमची वृत्ति शांत होऊन मनांत गंभीर विचार येऊं लागले. हा प्रदेश फार वैराण व निर्जन आहे. तेथें आमच्या शिवाय दुसरें कोणी नव्हतें.

आलबर्त्त साहेब मुलां सहवर्त्तमान पुढें गेले, परंतु मला पुढें मेटा-खुटीस येऊन जातां येईना, ह्मणून ग्रांत बरोबर पूर्वस्थळीं परत आलें, नंतर आह्मी लवकर स्फटिक गारगोटया वगैरेचा शोध करूं लागलों, तों कांहीं लहान लहान सांपडल्या. पर्वताच्या पायथ्याशीं धुकें होतें तें नाहींसें झाल्यावर सर्व देखावा सुंदर दिसूं लागला. बेनम्युइख धूई पर्वताची उंची ४,२९७ फूट आहे. स्कातलंदांतील अति उंच पर्वतां पैकीं हा एक आहे. मी आणि आलिस घोड्यांवर बसून चाललों व ज्या ज्या ठिकाणीं चढण फार होती, त्यात्या ठिकाणीं आह्मी पायीं चाललों. आलबर्त्त आणि बर्ती हे सारा वेळ पायीं चालले होते. वाटेनें तृषा लागल्यावर नुसतें थंड पाणी प्यालें असतां शैत्य होईल असें लोकांनीं सांगितल्यावरून पाण्यांत थोडी विसकी दारू घालून मी प्यालें. घोड्यावरून खालीं न उतरतां आह्मी पुढें तसेंच चाललों. आलबर्त्त साहेब ग्रांतशीं मोठ्या आनंदानें गोष्टी सांगत चालले. हें पाहून ब्रौन मला हैलंद लोकांच्या रीतीनें असें ह्मणाला कीं, सदोदीत संतुष्ट वृत्तीच्या मनुष्याबरोबर चालणें हें फार चांगलें आहे. पूर्व दिवशीं माझ्या परमप्रिय पतीच्या शिकारीविषयीं मी ब्रौनशीं बोलत असतां त्यास असें सांगितलें कीं, माझे पतीस शिकारींत कांहींच लाभ न झाला तरी त्यांस अगदीं वाईट ह्मणून वाटत नाहीं. त्यावरून ब्रौन ह्मणाला कीं, सर्व आपल्या ताब्यांतील लोक ह्मणतात, आह्मांस आलबर्त्त साहेबां सारखा कृपाळू धनी मिळणार नाहीं, व माझी अशी खात्री आहे

कीं, आह्मा सर्वांची इच्छा ह्यांस संतुष्ट करावें हीच आहे. नंतर मी त्यास सांगितलें कीं, चाकरलोक आलबर्त्त साहेबांस संतुष्ट करितात ह्यांत संशय नाहीं.

सवासहा वाजतां देरीच्या शिकारीचे घरांत आह्मी येऊन पोहोंचलों, व तेथें थोडा चहा पिऊन सुमारें साडेसहा वाजतां पुढें जाण्यास निघाला. तेव्हां चांदणें पडलें होतें. क्यासलतन एथें साडेसात वाजतां आल्यावर ढग येऊं लागले. तेथून बालमारल एथें बरोबर सवाआठ वाजतां येऊन पोहोंचलों. आह्मी थकलों असें कांहीं वाटलें नाहीं; व आह्मी सर्वजण आनंदांत होतों. सर्व प्रकारची व्यवस्था उत्तम रीतीची होती. आज जी एकांत वासांतील मोठी रमणीय मौज मी पाहिली, ती मौज व हा दिवस मी कधीं विसरणार नाहीं.

# आमची पहिली मोठी स्वारीः— ह्मणजे ग्लेनफिशी आणि ग्रानतौन एथें स्वारी.

मुक्काम हातेल ग्रानतौन,

मंगळवार, सप्तेंबर ता० ४ थी, सन १८६०.

मनोरंजक फेरा करून आज संध्याकाळीं आह्मी एथें आलों; आतां ज्या गोष्टी आज घडल्या त्या एथें लिहितें. बालमारल एथें आह्मीं आपल्या खोलींत साडेसात वाजतां न्याहारी करून लेदी चर्चिल आणि जनरल ग्रे ह्यां सहवर्त्तमान आठ वाजतां गाडींत बसून क्यासलतन एथें जाण्यास निघालों. ग्रांत आणि ब्रौन हे नेहमीप्रमाणें कोचबाक्सावर बसले होते. क्यासलतनास आल्यावर आह्मी घोडे बदलले. लिन आफ् दीच्या पलिकडे पांच मैलांवर गेल्दीचे ( अथवा ग्यूलीचे ) धनगराची झोंपडी आहे तेथें आह्मी गेलों. तेथें आमचा वाटाड्या चार्ली स्त्युअर्त्त तट्टां सहवर्त्तमान उभा होता. आह्मी लागलींच तट्टांवर बसलों आणि गेल्दी नदीच्या बाजू बाजूनें चाललों. पाणथळ जमिनी टाळण्याकरितां ही नदी आह्मांस फार वेळा उतरावी लागली. ग्लेनगेल्दी नांवाच्या दऱ्यावरून आह्मी दोन तास चाललों. रस्ता पाणथळ जमिनीचा होता. त्यांत कितीएक ठिकाणीं इतका चिखल व पाणी होतें कीं, पुष्कळ वेळा आह्मांस घोड्यावरून उतरावें लागलें. सभोंवतालच्या टेंकड्या फार उंच नव्हत्या, व त्यांचेवर झाडें झुडपें अगदींच नव्हतीं. हेथर नांवाचीं देखील झाडें फारशीं नव्हतीं. फिशी नदीच्या जवळ आह्मी आलों, तेव्हां देखावा अधिक सुंदर दिसूं लागला. नंतर आह्मी ह्या नदीच्या दऱ्याकडे जाण्यास उज-व्या हाताला वळलों. हा दरा आह्मांस दुरून दिसत होता. फिशी-

आणि गेल्दी ह्या दोन्ही नद्या बहुतकरून एकच सपाटीवर निघतात. आणि ह्यांचे उगम स्थानाच्यामध्यें फार थोडें अंतर आहे. फिशी नदीचा प्रवाह फार जलद आहे आणि तींत दगड फार आहेत. दरा अरुंद आहे; दऱ्याजवळ कोणी आला असतां त्यास देखावा अधिक रमणीय दिसतो आणि मुख्यत्वेंकरून एतत्कर्त हा खोल उतारा टाकल्यावर तो फारच शोभायमान दिसतो. ग्रांतनें आपल्या तट्टावर बसून मला उतरून नेलें. दुसरीं चाकर माणसें पायीं चालत होतीं तीं जोडे व पायमोजे काढून उतरून आलीं. एथून जो अरुंद रस्ता जातो तो क्रेग्नागोअर, क्रेग्ना केलाख, व स्त्रोन नाबारिन ह्या डोंगरांच्या पायथ्यावरून वळून जातो. ह्या वेगानें वाहणाऱ्या नदीच्या डगरींवर खडक आणि बर्च व फर नांवाचीं, झाडें आहेत. पुढें दोन्ही बाजूंनीं मोठमोठाल्या उंच टेंकड्या आणि विशाळ खडक लागतात. ह्या खडकांतून कित्येक ठिकाणीं उंच जागेवरून जे ओहोळ आहेत, त्यांचें पाणी पडतांना दिसतें, आणि पुढें रस्ता उंच उंच होत गेला आहे. हा सर्व देखावा फारच भव्य आहे.

पुढें झाडांमध्यें एक सपाट जमीन पाहिली तेथें जाऊन थांबलों. एथील फर नांवाचीं झाडें विशेषेंकरून फार सुंदर दिसतात. आणि हिकडील सर्व देखावा अति भव्य होता. ह्या रमणीय ठिकाणीं आह्मीं दोन वाजतां फराळ केला. नंतर निघालों तों दरा व खिंडी हीं जेथें रुंद होत जातात तेथ पावेतों आह्मी चालत गेलों; आणि ज्याला ग्रीनहार्द (हिरवी गवताळ जमीन) ह्मणतात, ती तेथें जवळच होती, तेथें आह्मी तट्टावर बसलों. आणि फिशी नदी उतरून एका सुंदर फर झाडांच्या राईकडे गेलों. तेथील देखावा फार रमणीय होता. फिशी नदी आज आह्मीं पुष्कळ वेळा उतरलों.

नंतर आह्मी एका सुंदर ठिकाणीं आलों. हें ठिकाण लान्दसीर चितारी ह्याचें मोठे महत्वाचें होतें. ह्या ठिकाणीं मयत दचेस आफ् बेदफर्द हिनें बांधलेली एक लहान छावणी आहे. तींतील झोंपड्या कांहीं लांकडाच्या आणि कांहीं मातीच्या अशा आहेत. आतां ती तिच्या घराण्याच्या ताब्यांत नाहीं, आणि ती अगदीं मोडकळीस आलेली पाहून मला वाईट वाटलें. एथें मधून मधून फर झाडें आहेत. आणि दऱ्याच्या दोन्ही

बाजूंस कडे तुटलेले डोंगर आहेत. फिन्नी नदीच्या मुखापासून हें स्थळ सुमारें सात मैल लांब आहे. एथील देखावा पाहून आह्मी फार आल्हादित झालों. त्या झाडींतून निघून आह्मी चांगल्या रस्त्यावर आलों. डाव्या बाजूस लहान लहान टेंकड्या होत्या; त्यांना सुंदर हेथर नामक झाडां मुळें शोभा आली होती. उजवे कडील टेंकड्या उंच असून त्यांजवर झाडी होती. कित्येक ठिकाणीं कडे होते आणि मोठाले धबधबे पडत होते.

झाडींतून बाहेर आल्या नंतर एका शेतकऱ्याच्या घरापाशीं आह्मांस लार्ड आलेक्झांदर रसल सहकुटुंब भेटले. त्यांच्याशीं आह्मी कांहीं वेळ बोललों. पूर्वी ज्या स्थळीं ते राहत होते त्या स्थळाच्या नाशाबद्दल त्यांना फार वाईट वाटलें, असें आह्मांस दिसून आलें. तों पर्यंत आह्मी सुमारें बारा मैल चाललों. नंतर स्पे नदीची तर आह्मांस लागली. शिकारी लोकांच्या गोळ्यांचा नाद ऐकून हरणें जंगलांत पळतांना दिसलीं. स्पे नदीच्या थडीमध्यें डोंगरांच्या सुंदर रांगा आहेत. डावे बाजूस मैदान होतें. पुढें कांहीं अंतरावर लाखलागन सरोवरा जवळ ज्या टेंकड्या आहेत, त्या दिसूं लागल्या. पुढें लार्च नामक वृक्षांची झाडी लागली, नंतर शेतांतून रस्ता गेला. आमच्या उजव्या बाजूस किनरारा होता. मयत ड्यूक आफ् गार्दन ह्याची छत्री एका जवळच्या टेंकडीवर आहे, ती एथून स्पष्ट दिसते. ती टेंकडी त्यावेळेस हेथर झाडांच्या फुलानीं तांबूस दिसली.

लार्च झाडांचें बन लागल्यापूर्वी लार्द आलेक्झांदर रसल ह्यांनीं आह्मांस तट्टाच्या गाडींत बसून गांठलें. त्यांनाही त्याच रस्त्यानें जावयाचें होतें, आणि त्या रस्त्यावर जें कांहीं होतें त्याची त्यांनीं आह्मांस माहिती करून दिली. "धी ड्यूक् आफ् आर्गेल्स स्तोन" (आर्गेलच्या ड्यूकाचा दगड) त्यांनीं आह्मांस दाखविला, एका टेंकडीच्या माथ्यावर ही दगडांची एक रास आहे, ती टेंकडी आमचे उजवे बाजूस होती. मार्किस् आफ् आर्गेल हे एथें आपल्या सैन्या सहवर्त्तमान पूर्वी उतरले होते, त्यावरून ही जागा ह्या नांवानें प्रख्यात झाली असावी असें वाटतें. पुढें दुसरें एक लार्च झाडांचें बन लागलें, तेव्हां मी आणि लेदी चर्चिल अशा दोघीजणी घोड्यांवर

बसून कंटाळा आल्यामुळें खालीं उतरलों· हें बन सोडल्या नंतर लाख· इंच नांवाचें सरोवर लागलें, हें फार सुंदर आहे. ह्याचा नकाशा काढून घेण्याचें माझ्या मनांत होतें; परंतु वेळ फार थोडा असल्यामुळें व घाई झाल्यामुळें, तें राहून गेलें. त्या वेळीं उजेड चांगला पडला होता, त्या सरोवराच्या किनाऱ्यावर जी एक गवताची जमीन आहे, तिजवरून गुरें जात होतीं; ती मौज पाहण्यासारिखी होती. ह्या जाग्याच्या आसपास मोठमोठाले खडक वगैरे नसून हें मोठें सुंदर सरोवर दिसतें. ह्याच्या सभोंवत्या कांहीं टेंकड्या व कांहीं झाडांची राई आहे. आह्मी उभे होतों तेथून सुमारें एक मैलाचे अंतरावर तर होती. नंतर आह्मी घोड्यावरून उतरून घोडीं लावून दिलीं. आमच्या बरोबर ग्रांत आणि ब्रौन हे चालले. वाकर नांवाचा पोलीस इनस्पेक्तर आह्मांस भेटला ;परंतु आमच्या बरोबर आला नाहीं. आह्मी कोण हें लोकांस नकळूं देतां सर्व गोष्टींचा बंदोबस्त करण्यास त्याजला पुढें पाठविलें होतें. हें काम त्यानें चांगलें केलें. ती तर ओबड धोबड असून होडीप्रमाणें होती. तिजवर आह्मांस उभे राहण्या पुरती मात्र जागा होती. ब्रौन व एक तऱ्या एका टोंकाशीं बसून दोघे दोन वल्ह्यांनीं व ग्रांत दुसऱ्या टोंकाशीं एक ताज धरून तर चालवीत होते. थोड्या पळांत ती कडेस लागली. तेथें रस्त्या



वर दोन बेढब गाड्या तयार होत्या· पैकीं एकींत ·आलबर्त्त साहेब व मी बसलें, आणि दुसरींत लेदी चर्चिल आणि जनरल ग्रे हे बसले; ह्या गाड्यांचे घोडे वाईट होते. हांकणारे बाक्सावर बसले होते. ग्रांत आमच्या गाडीच्या बाक्सावर होता व ब्रौन दुसरे गाडीच्या बाक्सावर

होता. आमची मजल एकंदर एथपावेतों चाळीस मैलांची झाली. पैकीं वीस मैल घोड्यावर बसून चाललों. आह्मी आपापलीं नांवें बदललीं. तीं अशीं, मला लेदी चर्चिल व माझे पतीस लार्द चर्चिल व लेदी चर्चिला मिस स्पेन्सर आणि जनरल ग्रेला दाक्तर ग्रे असें आह्मी ह्मणूं लागलों! मी गाडींत बसतांना ब्रौन विस्मृतीनें माझें नेहमीचें नांव घेऊन मला बोलला. व त्याच प्रमाणें ग्रांत आलबर्त्त साहेबांस "प्रिन्स साहेब" असें बोलला; हें ऐकून आह्मास हसूं आलें, परंतु तें कोणाचे लक्षांत आलें नाहीं.

एकंदर आह्मांस तीन तास लागले. आह्मी गाडींत बसलों तेव्हां सुमोरें सहा वाजले असतील. आह्मी झाडीचा रस्ता लवकर टाकून बेदन्याख-च्या रस्त्यावर आलों. एथें जवळच किनरारा होता, परंतु त्यामधून आह्मीं गेलों नाहीं. हें मोठें सुंदर स्थल आहे. झाडांनीं आच्छादित असे सुंदर पर्वत, ह्मणजे केर्नगार्म नांवाचे उंच उंच पर्वत, आणि बेनम्युइखधूई ह्यांच्या शिखरावर धुकें असल्यामुळें ते बरोबर दिसत नव्हते. पर्वताच्या तळाशीं स्पे नदी वाहते तिच्या दोन्ही काठांस सुंदर शेतें व झाडें आहेत. मला सर्व रस्त्यानें चमत्कार ह्मणून काय तो एथील जनसंसर्गराहित्य ह्याचा वाटला; कचित् वस्ती पाहिली! कचित् मनुष्य भेटले! नंतर घोड्याला पाणी पाजण्याकरितां रस्त्यावरील एका झोंपडी जवळ आह्मी थांबलों. तेथें थोडे लोक होते, ते आमच्या दोन साध्या गाड्यांकडे उगीच पाहूं लागले.

काळोख पडल्यामुळें पर्वत दिसेनातसे झाले. संध्याकाळचे वेळेस सरदगर्मी होती व पावसाचे शिंतोडे पडले. पुढें जातां जातां आह्मांस एका गांवांतील दिवे दिसूं लागले. तेथील घरें शिस्तवार नाहींत. गांवां-तील एका पोस्तखान्याचे अंगणांत गेलों; एथें आह्मी गाडींतून उतरलों. लेदी चर्चिल आणि जनरल ग्रे हे आमची वाट न पाहतां आमच्या पुढें पोस्तखान्यांत गेले होते. नंतर आह्मी वर गेल्यावर निजण्याची खोली त्यांनीं दाखविली. ती फार लहान असून स्वच्छ होती. मध्यें एक मोठा पलंग होता. त्यानें सर्व जागा आडविली होती. त्या खोलीच्या समोर जेवण्याची व भेट घेण्याची एकच खोली होती. तीही फार स्वच्छ होती. आलबर्त्त साहेब ह्यांनीं ज्या खोलीमध्यें स्नान केलें व पोषाग केला, ती

लहान असून लगतच होती. माझ्या तीन दासींपैकीं दोघी दुसऱ्या रस्त्यानें गाडींतून आल्या. त्यांचा गाडीवान स्त्युअर्त होता. जेनशाकल ही दासी मजबरोबर होती. नंतर आह्मी हात तोंड धुऊन व वस्त्रें नीट करून जेवण्यास बसलों. ग्रांत आणि ब्रौन हे आमची शुश्रूषा करणार होते, परंतु लाजाळू असल्यामुळें ते पुढें आले नाहींत. तें काम तेथील एका स्त्रीनें केलें. तिचे केंस कुरळे होते. भोजन आटोपल्यावर मेजावरील कपडा तिनें उचलून नेला. जुन्या इंग्लिश रिवाजाप्रमाणें तिनें द्राक्षासवाची बाटली ग्लासा सहित आणून ठेविली. ही दारू आह्मी बरोबर आणलेली होती. भोजनास आणलेले पदार्थ बरेच होते. जेवणास सूप, हाजपाज, मतनब्राथ, उत्तम प्रकारचे बटाटे इत्यादि पदार्थ होते. मतनब्राथ ह्यांत भाजा घातल्या होत्या, तें मला आवडलें नाहीं व एक दोन पदार्थांची तर मी चव देखील घेतली नाहीं. शेवटीं क्रानबरी फळांचें पक्वान्न वाढलें. भोजनानंतर मी ही सर्व हकीकत लिहीत असतां सभोंवतालच्या मंडळीचा गोंगाट झाल्यामुळें मी लिहिणें बंद केलें. आलबर्त्त साहेब "पेशन्स" ह्या नांवाचा खेळ खेळत होते. आह्मी साडेअकरा वाजतां पोषाग उतरून निजावयास गेलों.

### बुधवार, सप्तेंबर ता० ५ वी, सन १८६०.

आज प्रातःकाळीं धुकें पडलें होतें व पर्जन्यही येत होता. रात्रीं झोंप चांगली लागली नव्हती. प्रातःकाळीं कांहींसे लवकर उठलों, आणि न्याहारी तयार होई पर्यंत वाचीत व कांहीं काम करीत खोलींत बसलों. न्याहारी साठीं आह्मांस थोडा वेळ वाट पाहवी लागली. न्याहारीस उत्तम प्रकारचा चहा, लोणी, रोटी, आणि ओत्स धान्याची लापशी इतके पदार्थ होते. लक्षपूर्वक काम करणारी व अतिशय उपयोगीं पडणारी असी माझी दासी जेन शाकल आह्मांस ह्मणाली कीं, रात्री मी ग्रांत, ब्रौन, स्त्युअर्त, चाकर आणि दुसऱ्या दोन दासी ह्यां सहवर्त्तमान एका ठिकाणीं जेवलें, नंतर कमार्शियल नांवाच्या खोलीमध्यें काळ आनंदांत घालविला. एथील लोक मोठे आनंदी आहेत. चाकर मंडळी जेवीत असतां घरची स्त्री येऊन ग्रांत ह्यांस ह्मणाली कीं, तुह्मांस दाक्तर ग्रे बोलावितात, हें ऐकून

सर्वांस हसें आलें. नंतर जेनला सर्व ह्मणाले कीं, तुमच्या धनीणी पासून तुह्मांस त्रास होत नाहीं. प्रातः काळीं जेनला प्रांतानें विचारलें कीं, लार्ड साहेबास माझी कांहीं जरूर आहे काय? आह्मी ज्या बिर्दीत उतरलों होतों, ती सर्व आह्मांस खिडकींतून दिसत, होती. ती पुष्कळ लांब व रुंद आहे. तींतील कांहीं घरें अंतरावर आहेत तेथें गर्दी ह्मणून अगदीं नव्हती. रस्त्यांतून केव्हां केव्हां निरोप घेऊन जाणारीं मुलें व गाडी घेऊन जाणारे लोक दिसत. जनरल ग्रे ह्यानें तेथें एक घडयाळ वीस रुपयांस विकत घेतलें कींहो!

शेवटीं सुमारें दाहा वाजण्यास दाहा मिनिटें कमी होतीं तेव्हां कालच्या गाडींत कालच्याच रीतीप्रमाणें बसून आह्मी जावयास निघालों, आणि गांवा पासून सुमारें दोन मैलांवर क्यासलग्रांत नांवाची लार्ड सीफील्डची एक हवेली आहे तेथपावेतों गेलों. रमणा चांगला आहे, तरी हैलंदांतल्या रमण्यासारखा दिसला नाहीं. हवेली अगदीं साधी असून वखारी प्रमाणें दिसली. सर्व वेळ बुरबुर पाऊस पडत होता. एथें आह्मी न उतरतांच गाड्या परत हांकल्या. कारण आह्मांस ग्रान्तीन ह्या गांवांतून पुनः जावयाचें होतें. एथें पोहोंचल्यावर आमचें गूज लोकांस समजलें असें पाहिलें. कारण कीं, पुष्कळ लोक रस्त्यावर जमले होते; आणि पोस्तखान्याची धनीण रुमाल खेळवीत होती, आणि कुरळ्या केंसांची स्त्री खिडकींतून बावटा खेळवीत होती. गाडी हांकणाऱ्यानें कांहीं पाहिलें नाहीं, व ह्याचे लक्षांत कांहीं आलें नाहीं. गांवांतून बाहेर आल्यावर उजवे बाजूकडे झाडींतून जात असतां आह्मांस पुष्कळ लोक जातांना दिसले. गाडीवाला ह्मणाला कीं, हे प्रेत पुरण्याकरितां जात आहेत. नंतर स्पे नदीच्या पुलावरून उतरल्यावर पर्जन्य मोठयानें पडूं लागला. धुकें टेंकड्यांवर अगदीं जवळ आलें होतें. ह्या टेंकड्या फार उंच नसून हेथर फुलांनीं तांबड्या दिसत होत्या. पाऊस आंत न यावा ह्मणून गाडीवर कातडें टाकण्याकरितां मध्यें थांबलों. ह्या प्रदेशांत गाडीवर कातडें घालण्याची चाल आहे येणेंकरून पाऊस अगदीं आंत येत नाहीं.

ह्या प्रदेशांत पहिल्यानें जो चमत्कार दिसला ती दाल्धूची खिंड होय. ह्याच्यावर रस्ता वळणांनीं जातो. बाजूच्या टेंकडया झाडाझुडांनीं आच्छा-

दित आहेत. पुढें वाटेनें आह्मांस एक लहानसा पोस्तखाना लागला. तेथें आह्मी थोडा वेळ तान्हेलेल्या घोडयांस पाणी पाजण्याकरितां थांबलों. जवळ एथें एकच घर होतें. पुढें आह्मांस एक उंच टेंकडी आणि ग्लेन-ब्रुइन नांवाची बारी लागली. त्याच्या बाजूनें पुष्कळ झाडांनीं आच्छादित स्लेतीच्या दगडांच्या टेंकडया होत्या. एथें आह्मी गाडींतून उतरून टेंकडी खालीं पायीं चाललों. मग तसेंच ब्रिज् आफ् ब्रुइन नांवाच्या पुलावरून व दुसऱ्या टेंकडींवर कांहीं लांबणीवर पायीं गेलों. पुढें रस्ता अगदीं वांकडा तिकडा व चढ उतरणीचा होता. नंतर आवन नदी दिसूं लागली, ती टेंकडयामधून वाहत आहे. पुढें एक लहानसें बन लागलें. त्याच्या समोर आवन नदीचा पूल दिसला. ह्या ठिकाणीं नदीचें पाणी स्वच्छ आहे. पुनः गाडींत बसून तोमिन्तौल पावेतों टेंकडी वर एक मैलभर गेलों. ह्या वेळेस मी व लेदी चर्चिल एकाच गाडींत होतों. आमचे बिचारे थकलेले घोडे कांहीं वेळ गाडी ओढण्यास समर्थ नव्हते ह्मणून गाडी हांकणारा त्यांस कोरडे मारीत व शीळ वाजवीत होता, परंतु घोडे अगदीं चालेनात. आणि मला असें घडोघडीं वाटे कीं, त्यांना आसपासच्या खेडयांत ठेवावें लागेल. हे चौदा मैल चालण्यास आह्मांस चार तास लागले; कांतर ह्या गांवांचे बाहेर येऊन तट्टांवर बसण्याकरितां आह्मी गाडींतून उतरलों तेव्हां दोन वाजले. तोमिन्तौल हें गांव फार पडकें असून मोडकळीस आलेलें आहे व हें वाईटही दिसतें. ह्यांत एक लांब बीद आहे, तिजमध्यें तीन पोस्तखाने आहेत. एथील लोक व घरें फार गलीच दिसतात. हा गांव अगदीं भिकार दिसतो. ग्रांतानें मला असें सांगितलें कीं, ह्या सर्व हैलंदांत अतिशयित गलीच व भिकार असें हेंच गांव आहे.

गांवाबाहेर कांहीं अंतरावर आह्मी घोड्यावर बसलों, परंतु बारादर दोन वाजले होते ह्यामुळें थोडाच वेळ चाललों. पुढें एक रमणीय स्थान लागलें. तेथें आह्मी फराळ करण्याकरितां उतरलों. एथून पुढें आवन नदी व एक सुंदर दरा दिसत होता. ग्रांत व ब्रौन हे सामानाची व्यवस्था लावीत असतां, मी त्यांस ह्मणालें कीं, आमचे सांगण्याप्रमाणें काल रात्रीं जेवण्याचे वेळीं व आज सकाळीं न्याहारीचे

वेळीं तुह्मी कां आला नाहींत, ह्याचें कारण काय तें सांगावें. ह्यावरून ब्रौन ह्मणाला कीं, मला तें काम बरोबर करितां येणार नाहीं ह्मणून मी आलों नाहीं. नंतर मी त्यास असें सांगितलें कीं, माझे मनांत कोणत्याही परक्या मनुष्यांस काल खोलींत येऊं द्यावयाचें नव्हतें. ह्या पुढें तुह्मीच येत जावें.

फराळाची सामग्री आह्मीं आपल्या बरोबर आणिली होती, त्या प्रमाणें फराळ आटोपल्यावर आह्मी निघालों. थोडा रस्ता आह्मी पायीं चाललों, इतक्यांत आमचे चाकरलोक घोड्यां सहवर्त्तमान आह्मांस येऊन मिळाले. नंतर घोड्यावर बसून आवन नदीच्या बाजू बाजूनें चाललों. रस्ता दऱ्याचे पायथ्याशीं नागमोडी सारखा असून बराच रुंद आहे; परंतु जसजसा इंच-रोरीकडे वळतो तसतसा अरुंद होत गेला आहे. तेथें दऱ्याला ग्लेनआवन ह्मणतात. नदीच्या बाजूकडे ज्या उतरत्या टेंकड्या आहेत, त्या झाडांनीं आच्छादित असल्यामुळें हिरव्या गार दिसत होत्या. उन्हाचा गतका झाला होता आणि रस्ता फार दलदलीत व खराब होता. पुढें ग्रानित दगड ज्या रस्त्यास आहेत तो रस्ता आह्मांस लागला. दिवस थोडा राहिला होता, व आह्मांस तर पुढें आठ मैल मजल खेटायाची होती, ह्मणून आह्मी जलदीनें चालावयास लागलों. आमच्या चाकर मंडळी पैकीं ब्रौन आणि दुसरे दोघे इतक्या जलदीनें आमच्या पुढें चालूं लागले कीं, आह्मांस त्यांच्या बरोबर आमचे घोडे दुडकीनें चालवावे लागले. ग्रांत हा वारंवार हरणाच्या शिका-रीचे तट्टावर बसत असे, आणि दुसरे गडी दोन दिवस एक सारखी मजल पडल्यामुळें अगदी थकून गेलेसे दिसले; व आलबर्त्त साहेबांच्या अथवा जनरल ग्रेच्या घोड्यावर बसण्याचा त्यांला आनंद वाटला. ह्या चाकर लोकांचें औत्सुक्य, तत्परता, उल्हासीपणा, आणि श्रमसहिष्णुता हीं मोठीं आश्चर्य करण्याजोगीं आहेत. हे गुण त्यांच्यांत असल्याने ते आमचे मोठे आवडते चाकर आहेत. ग्रांत आणि ब्रौन हे तर फारच समजदार, हुशार आणि आस्थेवाईक, लक्षपूर्वक काम करणारे आहेत, व त्यांतही विशेषेंकरून ब्रौन हा मोठा कुशल असून कोणतेंही काम करण्यास तयार व प्रसंगास मागें न हटणारा, ह्मणून माझे चाकर लोकांत हा उत्तम होय.

पुढें आह्मांस इंचरोरी लागली. ह्याजवरून जातां जातां दोन गरुड पक्षी उंच उडून एका टेंकडीच्या शिखरावर उतरत होते ते आह्मी

पाहिले. इंचरोरीच्या पलिकडे आह्मांस लाख बुलिग नांवाचें सरोवर लागलें. ह्याजवर अस्तास जाणाऱ्या सूर्याचीं किरणें पडल्यामुळें त्याचें पाणी अतिशय चकचकीत दिसत होतें. तोमिन्तौलाहून निघाल्या नंतर पाऊस ह्मणून आह्मांस लागला नाहीं; परंतु केव्हां केव्हां बुरबुर येत होती. ब्युलिग सरोवरा जवळ आमचे चार घोडे व गाडी तयार होती आणि काल सकाळीं ज्या रीतीनें निघालों त्या रीतीनें बालमारल एथें साडे- सात वाजतां आह्मी सुखरूप येऊन पोहोंचलों.

कायहो ही आनंदकारक स्वारी! लेदी चर्चिल ही नेहमीप्रमाणें आनंदी असून पाहिजे तें काम करण्यास सिद्ध होती. जनरल ग्रे आणि ती आणि आमचे सर्व चाकरलोक ह्यांजला ह्या स्वारी पासून फार सुख व आनंद वाटला असें दिसलें. ही स्वारी माझ्या प्रिय आलबर्त्त साहेबांच्या योगानें घडली. अशा प्रकारच्या स्वाऱ्या त्यांनीं पूर्वी पुष्कळ केल्या होत्या ह्मणून ते आह्मांस नित्य ह्मणत असत कीं, हीही स्वारी चांगल्या रीतीनें घडेल. त्यांना तर ह्या स्वारी पासून फारच सुख झालें. ह्या नंतर आमचे ऐक- ण्यांत असें आलें कीं, कालचे मुक्कामीं आलबर्त्त साहेब ह्यांना एका मनुष्यानें रस्त्यावर ओळखिलें. आमच्या गाडीवरील छत्रीवरून तेथील लोकांना वाटलें कीं, ही गाडी बालमारल एथून आली असावी. तथापि ही आमचीच असावी असें त्यांस वाटलें नाहीं. कालच्या मुक्कामीं ज्या पोस्तखान्यांत आह्मी उतरलों होतों, तेथील आऊनें लोकांना सांगि- तलें कीं, ह्या बाईच्या मौल्यवान सोन्याच्या आंगठ्या वगैरे दागिन्यांवरून ही कोणी तरी मोठी श्रीमंत बाई असावी. मी लेदी चर्चिल हिला असें सांगितलें कीं, तुझ्या आंगठ्या माझ्या पेक्षां जास्ती आहेत. मी कोण आहें हें जेव्हां त्यांनां कळलें तेव्हां त्यांस फार अचंबा वाटला. मला असें वाटतें कीं, ह्या स्वारीचें वर्णन मला चांगलें करितां येत नाहीं. जेव्हां जेव्हां आह्मांस ह्या स्वारीचें स्मरण होईल, तेव्हां तेव्हां आह्मांस आनंद झाल्या- वांचून राहणार नाहीं.

आमच्या तट्टांविषयीं मला थोडें सांगितलें पाहिजे. सर्व घोडे चांगले होते; परंतु "फयवी" व आलबर्त्त साहेब ह्यांचा घोडा हे दोन्ही तर फारच उत्तम होते.

## दुसरी मोठी स्वारीः— ह्मणजे इन्वरमार्क आणि फेतरकेर्न एथें स्वारी.

शुक्रवार, सप्तेंबर ता० २० वी, सन १८६१.

आज प्रातःकाळीं सात वाजतां उठून हवा कशी काय आहे ह्मणून पाहूं लागलों, तेव्हां थोडा पाऊस पडला होता, आणि टेंकड्यावर धुकें आलें आहे असें दिसलें व आपलें आज जाणें होईल किंवा नाहीं हें समजेनासें झालें. तथापि आलबर्त्त साहेबानें असें सांगितलें कीं, पहिल्या ठरावाप्रमाणें जाण्याची तयारी करावी. नंतर आठ वाजतां सूर्यप्रकाश चांगला पडून धुकें फांकायास लागलें. साडेआठ वाजतां न्याहरी वगैरे आटोपून आह्मी साडेनऊ वाजतां दोन गाड्यांत बसून इन्वरमार्ककडे जाण्यास निघालों. आमच्या गाडींत आमच्या बरोबर आलिस व प्रिन्स लुइस आफ् हेस हे होते आणि ग्रांत हा कोचबाक्सावर होता. दुसऱ्या गाडींत लेदी चर्चिल आणि जनरल ग्रे, हे होते, आणि ब्रौन हा बाक्सावर होता. ब्रिज आफ् म्युइख नामक पुलाजवळ आल्या नंतर आमचे सहा घोडे आणि पांच चाकरलोक हे आह्मांस मिळाले. चाकरांचीं नांवें येणेंप्रमाणें:— जे. स्मिथ, जे. मार्गन, केनदी, सी. स्त्युअर्त आणि एस. क्यांबेल. टेंकडीवरून एक गवताचा रस्ता आहे, त्याजवरून उतरून सुमारें चार मैल गेल्यावर थोडीशी मऊ जमीन लागली, परंतु ती मोठ्या युक्तीनें टाळली. एथें मी घोड्या-वरच बसलें होतें; परंतु आलबर्त्त साहेब आणि लुइस ह्यांना सुमारें द्रोनशें यार्ड पायीं चालावें लागलें. लाखनगार सरोवराजवळच्या टेंकड्यावर फार धुकें होतें; परंतु मौंत कीन नामक डोंगराची शोभा सर्व आह्मांस दिसत होती. कारी बुआख नामक दऱ्याजवळ आह्मी आलों तेव्हां ग्लेन तानर नामक दरा दिसूं लागला. तेथील देखावा भव्य आणि चमत्कारिक

होता. मींत कीन हा डोंगर शंकाकार आहे व त्याला एक मोठा कडा आहे. ह्याची उंची सुमारें ३२०० फूट आहे. तानर नदी उतरल्यानंतर चढण फार कठीण आहे. म्युइखच्या पुला पासून हा डोंगर कारी मुआख पावेतों साडेसहा मैल आहे.

तेथून खालीं उतरून सपाट आणि कडक जमिनीवर आलों. तेव्हां घोड्यांवरून खालीं उतरून दुसऱ्या टेंकडीवर चढूं लागलों. फार दूर गेलों नाहीं तों लार्ड दलहौसी ह्यांस घोड्यावरून येतांना आह्मी पाहिलें. आह्मी येणार ह्मणून जनरल ग्रे ह्यानें त्यांस अंतस्थ सांगितलें होतें. ते जवळ आल्यानंतर त्यांनीं आह्मांस सादर सलाम करून घोड्यावरून खालीं उतरून आमच्या बराबर पायीं चालूं लागले. मी व आलिस कांहीं वेळ पायीं चालून नंतर आह्मी दोघीजणी घोड्यावर बसलों. आलबर्त्त साहेब-ही कांहीं वेळ घोड्यावर बसून चालले. नंतर डाव्या बाजूस वळलों, तों एक सुंदर प्रदेश दिसूं लागला. तेथून खालीं एक सुंदर दरा होता, तोही दिसूं लागला. त्याचें नांव ग्लेनमार्क आहे. धी लादर नांवाची एक नाग-मोडी सारखी उतरण होती, तिजवरून उतरलों. ही फार मोठी भव्य आहे. हिच्या मधून जो ओढा वाहतो त्याला धी लादर बर्न असें ह्मणतात. खरोखर हा देखावा सुंदर व मनोवेधक आहे. इच्या पायथ्याशीं एक रान-कऱ्याची लहानशी झोंपडी होती. पुढें रस्ता फार आकुंचित लागला; तो फार खराब व चढउताराचा होता; तरीं तो वांकणाचा असल्यामुळें त्या रस्त्यानें घोड्यावरून जाण्यास आह्मांस कठीण पडलें नाहीं. लादर बर्न उतरणीच्या पायथ्याशीं आह्मी उतरलों. तेथें जवळच ओत्स धान्याची कापणी करणाऱ्या लोकांचा जमाव बसला होता; त्यांमध्यें बहुधा सर्व बायकाच होत्या. त्यांतील वयस्क बायका तंबाखू ओढीत होत्या. ती मंडळी दक्षिणेकडून उत्तरेस परत जात होती. पुढें आह्मी त्या झोंपडींत गेलों. त्याच्या एका खोलीमध्यें आह्मीं फराळ केला, तींत एक लहान बिछाना पडला होता. ह्या स्थलाला इन्‌वरमार्क ह्मणतात. हें कारी मुआख पासून साडेचार मैल आहे. फराळ झाल्यावर ह्या सुंदर देखाव्याचा मीं नकाशा काढून घेतला. झोंपडी समोरील ज्या टेंकडीवरून आह्मी उतरून आलों, त्या टेंकडीला क्रेगबोस्ताक ह्मणतात व त्याच्या डाव्या

बाजूस एक टेंकडी आहे तिला हिल आफ् दून असें ह्मणतात. तिच्या खालीं एक लहान दरा आहे.

तीन वाजल्यानंतर आह्मी घोड्यावर बसून ग्लेन्मार्क उतरलों. वाटेनें व्हैतवेल नामक विहिरीचें पाणी पिण्याकरितां आह्मीं कांहीं वेळ थांबलों. मार्क नांवाची नदी आह्मांस पुष्कळ वेळ उतरावी लागली. मान्स आफ् लाखली नामक घर आह्मास पुढें लागलें. तेथून दरा विस्तीर्ण होत चालला आणि इन्वरमार्कचा किल्ला स्पष्ट दिसूं लागला. त्या किल्याचे सभोंवतीं झाडी असून शेतेंही होतीं. त्याजमध्यें लोक ओत्स धान्याची कापणी करीत होते. येणेंकरून किल्यास विलक्षण शोभा आली होती. उजव्या बाजूस वळून त्या मोडकळीस आलेल्या किल्याजवळ आलों, त्यावर शेवाळ पुष्कळ आलें होतें. नंतर लार्ड दल्हौसीचे शिकारीच्या घराजवळ आह्मी आलों, तेथें आह्मी घोड्यावरून उतरलों. हें सुंदर घर नवीनच ग्रानित दगडांनीं बांधिलेलें आहे; एथून एक दरा दिसतो, व त्याच्या मागल्या बाजूस टेंकड्या आहेत. मिस माल (जिला आतां लेदी सी. माल ह्मणतात) ती तेथें होती. मग भेटी घेण्याच्या खोलींतून कांहीं पुढें गेल्या नंतर लाख ली नांवाचें सरोवर आह्मांस दिसलें. हें जरी मोठें विस्तीर्ण नाहीं तरी भयाण दिसतें. ह्याच्या सभोंवतीं डोंगर आहेत आणि ह्याच्या कांठावर कांहीं झोंपड्या व एका शेतकऱ्याचें घर आहे. त्या शिकारीचे घराचे ओसरींत आणि बेवण्याचे खोलीमध्यें शिकारींत मिळविलेल्या चिन्हा ठेविल्या होत्या, त्या मोठ्या व्यवस्थेनें शिस्तवार लावल्या होत्या. त्याच्या भिंतीस लांकडी तक्ते लाविले होते. बाहेर थोडथोडा पाऊस पडत होता. नंतर आह्मी गाड्यांत बसलों, ज्या गाडींत आह्मी होतों त्या गाडींत आठ मनुष्यें बसण्याची जागा होती. परंतु ती आंतल्या बाजूस फार आकुंचित होती. दऱ्याच्या बाजूनें नार्थेस्क नदी ओलांडून आह्मी गाड्या चालविल्या. ही नदी ऐ आणि मार्क ह्या दोन नद्या मिळून झालेली आहे. उजवे बाजूस एक सुंदर ग्लेन एफाख नांवाचा दरा लागला. एथें फार झाडी असून एथील सर्व देखावा फार रमणीय आहे. आमच्या समोर सर्व चकचकीत दिसत होतें. आणि मागच्या बाजूस डोंगरावर धुकें व पाऊस पुष्कळ पडत आहेसें दिसलें.

नंतर आह्मी पूलस्किनी आणि तार्फ ह्या नांवाचे दोन पूल उतरलों. हे दोन्ही पूल हैलंदांतले पुलांप्रमाणें मोठे उभे उतरणीचे आहेत. तार्फ पुलाच्या उजवे बाजूस एक नवें फ्रीकर्क (प्रार्थनामंदिर) आहे. त्याच्या पुढें कप-तान वेम्स ह्याची एकांत राहण्याची जागा आहे. ही मोठी चमत्कारिक दिसते. डावे बाजूस मिलदेन आहे; आणि एका उंच जमिनीवर क्यासल आफ् आखमिल ह्या नांवाचा वाडा आहे. हा वाडा शेतकऱ्याचे जुन्या घराप्रमाणें दिसतो आणि ह्याच्या धमाम्यावर पूर्वी बाग होता अशा कांहीं खुणा दिसतात. ह्याच्या सभोंवतालच्या व रस्त्याच्या डावे बाजूकडील टेंकड्या लहान लहान बांधांप्रमाणें आहेत. ह्याच्या पलिकडे जवळच आह्मांस एक बन लागलें, तेथें आह्मी गाड्यांतून उतरून मेजर माक्‌डन-रायचे ओढ्याच्या बाजूनें आह्मी गेलों. ह्या आकुंचित ओढ्याच्या वरच्या बाजूस एक झाडी आहे, त्या झाडींतून रस्ता नागमोडीचा आहे. हा ओढा धबधब्यापासून निघालेल्या नाल्याप्रमाणें नाहीं. ह्यांतील खडक फार चमत्कारिक आकृतीचे आहेत, आणि हा फार आकुंचित असून ह्यांत पाण्याचे डोह आहेत, आणि ह्यावर दाट झाडी पुढें येते. हा रस्ता फार लांबणीचा नाहीं. वेल्समध्यें अथवा हायार्नदेनमध्यें अशा प्रकारची झाडी असावी, असें आह्मांस वाटतें. गाड्या येऊन पोहोंचे पावेतों आह्मी झाडींतून कांहीं रस्ता पायीं चाललों. आतां आह्मांला फेतरकेर्न एथें पोहोंचण्यास तीन मैलांचें अंतर राहिलें होतें, नंतर आह्मांस लागवड केलेला सपाट प्रदेश लागला; परंतु अंधार पडल्यामुळें कांहीं दिसत नव्हतें.

फेतरकेर्न एथें आह्मी सवासात वाजतां येऊन पोहोंचलों. ह्या लहान शहरास खेडें ह्मटलें असतां चालेल; कारण हें लहान असून ह्यांत माण-साची गजबज दिसली नाहीं. रामसेआर्म्स ह्या पोस्तखान्यांत आह्मी कोणास न दिसतां उतरलों आणि एकदम माडीवर गेलों. ह्या पोस्तखा-न्यांत बसण्याची खोली व तिच्या जवळच एक जेवण्याची खोली होती. ह्या दोनही स्वच्छ असून त्यांतील सामान चांगलें होतें. नंतर आह्मी आमची निजण्याची खोली पाहिली ती फारच लहान असून स्वच्छ होती. आणि तींतील सामान ग्रांततौन एथील सामानापेक्षां फार चांगलें होतें.

आलिसची निजण्याची खोली आमच्या खोली एवढी होती. दुसरी एक लहानशी खोली होती, तिजमध्यें आलबर्त्त साहेबांनीं पोषाग केला. तिच्या पलिकडे लेदी चर्चिलची निजण्याची खोली होती. लुइस आणि जनरल ग्रे ह्यांनाही तेंपरन्स होतेल नांवाच्या पोस्तखान्यांत निजण्यास जागा मिळाली. तो पोस्तखाना आमच्या समोरच होता. आह्मी आठ वाजतां जेवलों. भोजनाचे पदार्थ चांगले होते. ग्रांत आणि ब्रौन आमची तर्तूद ठेवण्याकरितां उभे होते; परंतु ते कांहींसे घाबरलेले दिसले. लेदी चर्चिल आणि जनरल ग्रे ह्यांनीं शिजलेल्या मांसाच्या फोडी पाडण्याचें काम केलें, आणि ब्रौन व ग्रांत वाढीत होते. व त्या पोस्तखान्यांतील एक लहान मुलगी आमचें काम करण्याकरितां आली होती. परंतु तिनें आह्मांस पाहूं नये ह्मणून ग्रांत ह्यानें तिची पाठ आमच्या कडे केली. पोस्तखान्याचा मालक आणि त्याची बायको ह्यांना आह्मी कोण हें माहीत होतें; अणखी गाडीवानालाही आमची माहिती होती; ह्यांशिवाय दुसऱ्या कोणांसही नव्हती. आमचा वेष बदलल्याची गोष्ट त्यांनीं फुटूं दिली नाहीं.

संध्याकाळीं चंद्रप्रकाश चांगला पडला होता व जिकडे तिकडे सामसूम होतें ह्मणून आह्मी गांवांत फिरावयास निघालों; आह्मांस रस्त्यानें कोणीही फिरतांना दिसलें नाहीं. त्या गांवांतील लहान माणीक चौकाच्या मध्यभागीं जो एक स्तंभ आहे, त्याजवळ आह्मी आलों. त्या वेळेस लुइसनें चांदण्याच्या उजेडानें त्याजवर डकवलेला धर्मादाय जाहीरनामा वाचला; तो धर्मार्थ पैसा गोळा करण्याविषयीं होता. तेथून पुढें चाललों असतां कोणत्याही प्रकारचा शब्द ऐकूं आला नाहीं, परंतु दुरून एका कुत्र्याचें भुंकणें मात्र ऐकूं येत होतें. नंतर लागलींच पडघम आणि बांसरीचा नाद आमच्या कानीं आला. तेव्हां कदाचित् आमची ओळख पडली आहे काय, अशी आह्मांस धास्ती पडली. परंतु लुइस आणि जनरल ग्रे ह्यांनी मागें जाऊन पाहिलें, तों त्यांस कोणीही दिसलें नाहीं. तथापि आह्मी हळू हळू परत चाललों, तेव्हां तो नाद आह्मांस ऐकूं येतच होता. आणि पोस्तखान्याच्या दरवाजा जवळ आह्मी आलों त्या वेळीं साहा असामी बांसऱ्या व पडघम घेऊन त्या गल्लींतून जातांना व येतांना आमचे दृष्टीस पडले. त्याकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं. ग्रांत

आणि ब्रौन हे ह्यांचा शोध लावण्याकरितां बाहेर गेले होते; परंतु कांहीं शोध लागला नाहीं. नंतर आलबर्त्त साहेबानीं त्या वर सांगितलेल्या मुलीस विचारिलें. तिनें सांगितलें कीं, तो बेणबाजा आहे, आणि ह्याप्रमाणें आठवड्यांतून दोन वेळ वाजत असतो. हें ऐकून मला मोठा अचंबा वाटला. घरीं आल्यावर बेणबाजा कांहीं वेळपर्यंत वाजतच होता. रात्रीचे साडे-दाहा वाजले तोंपर्यंत आह्मी कांहीं काम करीत बसलो होतों आणि आल-बर्त्त साहेब वाचीत बसले होते. नंतर आह्मी निजावयास गेलों.

### शनवार, सप्तेंबर ता० २१ वी, सन १८६१.

गेल्या रात्रीं सुमारें दोन तीन वाजल्यावर झोंप लागली. प्रातःकाळीं धुकें फार पडल्यामुळें आणि पाऊस येत होता ह्मणून प्रातःकाळचा वेळ उदास वाटला. हालचाल ह्मणून कांहीं देखील नव्हती. थोडे लोक मात्र काम करितांना आह्मी पाहिले. रात्रीं एक प्रवासी त्या पोस्तखान्यांत आला होता; आणि त्याचे मनांत जेवणाचे खोलींत यावयाचें होतें. ही खोली बहुधा व्यापारी प्रवाशांकरितां नेमलेली आहे. मग त्यास तूं तेथें उतरूं नको हें सांगण्यास फार कठीण पडलें. ग्रांत आणि ब्रौन ह्यांबरोबर तो चहा प्याला आणि आज एथें काय आहे, ह्मणून त्यानें विचारपूस केली. ग्रांत ह्यानें त्याजला असें सांगितलें कीं, आबरदीन एथून आलेलें लग्न आहे. तेंपरन्स होतेलमध्यें जे लोक निजावयास गेले त्यांचा तपास करण्यास ते उत्सुक होते. जनरल ग्रे खेरीज करून आह्मी सर्वांनीं आपली न्याहरी प्रातःकाळीं ९ वाजण्याचे पूर्वींच आटोपली. ब्रौन ह्यांनें माझ्या गवनाचा झोळ व बूट झाडून झटकून पुसून साफ केला आणि माझे निरोप सांगण्याचें काम केलें. आलबर्त्तोची सेवा ग्रांत ह्यानें केली.

पावणेदाहा वाजतां कालच्याच थाटानें बाहेर पडलों; त्यांत फेर इतकाच कीं, आज लेदी चर्चिल आणि जनरल ग्रे ह्यांची गाडी आह्मांस बसण्यास होती. धुकें फार पडलें होतें, त्यामुळें रस्ता साफ दिसत नव्हता. आह्मी कोण हें गांवांतील लोकांना नुकतेंच समजलें होतें; त्यावरून त्यांनीं आह्मांस जातांना सलाम केले. फेतर्कैर्न नामक सर जे. फार्बस ह्यांचें घर आहे त्याजवळून आह्मी गेलों; नंतर सर ती ग्लानस्तनचे फास्क नांवाचे घर डावे

बाजूस लागलें. ह्या साहेबानें पुष्कळ झोंपड्या बांधून देऊन लोकांवर उपकार केले आहेत. नंतर आह्मांस एक टेंकडी लागली, तिची लांबी सुमारें चार मैल असावी. तिचें नांव केर्नीमंथ आहे; तेथून पुढें देखावा चांगला आहे, परंतु फार दाट धुकें असल्या मुळें कांहीं चांगलें दिसत नव्हतें. आह्मी कांहींसे पायीं चाललों, नंतर आलिस व मी गाडींत बसलों. स्पितल ब्रिज नांवाचा पूल आह्मांस पुढें लागला, तो उंच असून चमत्कारिक आहे. त्याचे डावे बाजूस दय नामक नदीचें पाणी वाहतें; व त्याचे उजवे बाजूस स्पितलबर्न नामक ओढा आहे. दय नदीच्या पुलाच्या जवळच सर ती. ग्लादस्तनचे शिकारीचें घर आहे. तेथें आह्मी गाड्या बदलून दुहेरी दाग-कार्तमध्यें बसलों. आलबर्त्त साहेब आणि मी असीं दोघें मध्यभागीं बसलों आणि लुइस हा मागें बसला. आह्मी पुढें एक टेंकडी होती तिजवर चढून गेल्यावर वायव्येस मौंतबातक नांवाचा डोंगर आह्मांस दिसूं लागला. तो सर ती. ग्लादस्तनच्या शिकारीच्या घराजवळ आहे. तेथून पुढें सपाट प्रदेश लागतो व आबरदीनकडला विस्तीर्ण देखावा दिसतो. पुढें एक दांडगा उतार लागतो, तेथें व्हितस्तोन्स नामक जाग्याजवळ फ्यूख नदी उतरली पाहिजे. ह्या सपाट प्रदेशांत एक सुंदर झाडींचा दरा आहे. पुढें दोन मैलांवर डावे बाजूस वायव्येस फिनजीन आहे; आणि त्याच्या पलिकडे रस्त्याच्या बाजूनें किंग्‌दरदन्स स्तोन आहे. हा मोठा एक विशाळ प्राचीन दगड आहे; ह्याची हकिकत अजून आह्मांस कळली नाहीं. नंतर आह्मी मेरीज वेल नांवाची विहीर टाकून पुढें गेलों, तों डाव्या बाजूस बालोगी हौस नांवाची हवेली लागली; ही मिस्तर देस निकल ह्याची आहे. इकडील पिकें वगैरे चांगलीं व हा प्रदेशही सुंदर आहे नंतर आह्मांस एक लहानसें खेडें लागलें तेथें आह्मी गाडींतून उतरलों, आणि घोडे दमून तान्हेल्यामुळें त्यांस पाणी पाजलें; मग आह्मी रस्त्यावर थोडे पायीं चाललों. नंतर मी लेदी चर्चिल आणि आलिस मिळून एका शिंप्याच्या घरांत गेलों. तें घर मोठें टापटिपेचें दिसलें. तेथील धन्याची बायको फार सुशील दिसली; तिनें आह्मांस विसावा घेण्यास आग्रह केला; परंतु आह्मी कोण हें तिजला कांहींच माहीत नव्हतें.

नंतर आह्मीं गाड्या हांकल्या, थोडें अभ्र आलें होतें; परंतु तें लागलेंच वितळलें. नंतर लार्द हंत्लीच्या रानांतील झाडी व कांहीं टेंकड्या दिसूं लागल्या. ह्या टेंकड्या आबायनकडे जो रस्ता जातो, त्यावरून दिसतात. आबायनला जाणारा रस्ता नघेतां आह्मी डावे बाजूस वळलों. उजवे बाजूस आबायनचा पूल पाहिला. तो पूल आह्मीं पूर्वी पाहिला नव्हता. नंतर पोष्टमास्तर आमच्यासाठीं गाडी घेऊन येत होता तो मिळाला. ज्या ठिकाणीं आह्मीं त्यास पाहिलें, त्या ठिकाणाहून मागल्या गावांतील घरें वगैरे कांहीं दिसत नव्हतीं. फेतरकेर्न पासून एथ पावेतों २२ मैल होतात. तानर नदी आह्मी नंतर उतरलों. पुढें डावे बाजूस ग्लेनतानर नांवाचा दरा लागला. हा मोठा सुंदर असून दाट झाडीनें व्याप्त आहे, ह्याच्या सभोंवत्या उंच टेंकड्या आहेत, हा लार्दहंत्लीचे जंगलाचा भाग आहे. पुढें आह्मी सहा मैल चालून दोन वाजले होते ह्मणून फराळ करण्याकरितां उतरलों. धुकें आलें होतें तरी पाऊस पडला नाहीं. जेथें उतरलों होतो तें स्थल सुंदर होतें; फराळ आटोपल्यावर कांहींसे पायीं चालून नंतर गाड्यांत बसलों आणि झाडींतून दऱ्याच्या बाहेर येऊन इतनाख् पावेतों गेलों. जवळच एक राखणदाराचें घर होतें, तेथें आह्मी सुमारें चार वाजतां येऊन पोहोंचलों. तेथें आमचे घोडे मिळाले. ह्या घरांत एक वेडी मुलगी लेदी चर्चिल इतकी उंच होती; परंतु पुष्कळ वांकलेली होती; तिचे केंश कापून आखूड केलेले होते; तिचा पोषाग लहान मुली सारखा होता. ती आपल्या गुडघ्यावर हात ठेवून जमिनीवर बसून डुलत व हांसत होती, नंतर ती उठून आमचेकडे आली. जनरल ग्रे माझे पुढें उभा राहिला, नंतर त्याजवळ ती आली आणि त्याच्या अंगरख्याचा सोगा धरून त्याच्या खिशांत तिनें हात घातला, तें पाहून आह्मांस हासूं आलें. नंतर मागाहून एक ह्मातारा मनुष्य आला, आणि लेदी चर्चिल हिनें त्याजला ह्या मुलीविषयीं विचारिल्यावरून त्यानें सांगितलें कीं, ही माझी मुलगी आहे; मग तो तिजला लागलीच घेऊन गेला.

नंतर आह्मी कांहींसे पायीं चाललों आणि मग तट्टांवर बसलों. ज्या टेंकडीच्या बाजूनें काल आलों होतों, तिच्या दुसऱ्या बाजूनें चाललों. कालच्या प्रमाणेंच चिखलाळ भाग ओलांडून पोलाखवरून आलों. कांहीं

अंतरावर मौंत कीन आणि इतर ज्या टेंकड्या होत्या त्यांजवर धुकें असल्या मुळें कांहींशी थंडी पडली होती. पीताच्या रस्त्यावरून म्युइरखच्या पुला जवळ येतांना मुइक गेर्न आणि बालातर ह्या नांवाच्या दऱ्याचा देखावा सुंदर दिसला. रस्त्यानें मी ग्रांत ह्याशीं बोलत चाललें.

ह्या ठिकाणीं माझ्या प्रिय आईची गाडी तयार होती. इजमध्यें बसून आह्मी परत जाण्यास निघालों. ही गाडी प्रशस्त असून फार चांगली आहे. ती माझ्या आईनें आलबर्त्त साहेबांस दिलेली आहे. गाडींत बसलें तेव्हां मला वाईट वाटलें आणि माझे डोळ्यांस पाणी आलें. काय हो हें सुखांत दुःख! परंतु हवा खायाला मी पुष्कळ फिरतें आणि सुंदर व नवीन देखावे पाहतें ह्या गोष्टींच्या योगानें समाधान वाटतें.

बालमारल एथें रात्रीं सात वाजतां येऊन पोहोंचलों. ह्या प्रवासा पासून सर्वांस फार सुख झालें. एकंदर आह्मी ऐशीं मैल फिरलों. कालचा प्रवास चाळीस मैलांचा झाला, आणि आजचा बेचाळीस मैलांचा होता.

# लाख आवन नामक सरोवराची स्वारी.

शनवार, सप्तेंबर ता० २८ वी, सन १८६१.

सकाळीं उठून बाहेर पाहिलें तों हवेचा संशय वाटला. धुकें पडलें होतें, परंतु मधून मधून सूर्यकिरणांची चमक दिसत होती; आतां लवकरच निरभ्र होईल असें दिसलें. आमच्या बसण्याच्या खोलीमध्यें आलिस आणि लुइस ह्यां बरोबर आह्मीं पावणे आठ वाजतां न्याहारी केली; आणि साडेआठ वाजतां बाहेर पडलों. लुइस आणि आलिस हीं आमच्या बरोबर गाडींत होतीं. ग्रांत आणि ब्रौन नेहमीप्रमाणें बाक्सावर बसले होते. पुढें बरेंच निरभ्र झालें.

आवन नदीच्या उत्तरेच्या बाजूनें आह्मीं गाड्या हांकल्या, तेव्हां सूर्यप्रकाश स्वच्छ पडूं लागला आणि दिवस मोठा रमणीय झाला. क्यासलतन एथें आह्मी टप्याचे घोडे घेऊन देरी नदी पावेतों गेलों. ग्लेन लुई नामक दऱ्याचा रस्ता फार खराब आहे, नंतर आह्मी आपापल्या तट्टांवर बसून ग्लेनदेरीच्या रस्त्याला लागलों. पुढें एचन सरोवराकडे रस्ता वळतो, तो नघेतां नीट मार्गानें चाललों. हा रस्ता फार उखर वाखर व दगडाळ आहे, तरी मोठ्या चढावाचा नाहीं. आह्मी पूर्वी अशा रस्त्यावरून कधींच गेलों नव्हतों. घोड्यांच्या पायांना तर बरीच इजा झाली. पुढें धुलुखन ह्या नांवाचीं दोन सरोवरें आह्मांस लागलीं. हीं इंचरोरीकडे जो दरा जातो, त्याचे समोर आहेत. हीं उतरल्यावर थोडीशी पाणथळ जमीन लागली, त्या ठिकाणीं खालीं उतरून टेंकडीच्या बाजूनें मी एकटी पायीं चाललें. पुढें कांहीं वेळानें तट्टावर फिरून बसलें. ह्या पाणथळ जमिनीचे दुसरे बाजूस एक सरोवर आहे. पाणथळ जमिनींतून जाणारा रस्ता चिखलाळ होता. त्यांतील शेवाळें आणि गवत झडून गेलें होतें आणि उतरणी

वरून जाण्याचें होतें ह्मणून रस्त्यानें आह्मांस फार त्रास झाला. आवन सरोवर आतां दिसेल मग दिसेल असें करीत करीत आह्मी दोन मैल चाललों. परंतु मध्यें एक टेंकडी आड असल्यामुळें तें दिसलें नाहीं. पुढें कांहीं वेळानें दिसलें. एथील देखावा चमत्कारिक आणि भव्य होता. ह्याच्या सभोंवते मोठमोठाले उंच आणि उभे खडक आहेत, आणि त्यावेळेस जवळच्या बेन मुइखधुई डोंगरावरील बर्फानें शोभा आणिली होती.

लाखएचन सरोवराच्या जवळच ज्या जागीं आह्मीं गुदस्तां हातपाय टेंकीत टेंकीत चढून आवन सरोवर पाहिलें होतें, ती जागा आतां आमच्या दृष्टीस पडली. ह्यावेळीं थंड गार वारा सुटला होता. शेवटीं सव्वादोन वाजतां सरोवराच्या वरल्या बाजूस एका मोठ्या दगडाच्या आड आह्मी उपहार करण्यास बसलों. ज्या ठिकाणीं सरोवरांत पाणी पडतें त्या ठिकाणीं आह्मांस जाता आलें नाहीं. फराळ लवकर आटोपल्यावर आह्मी परत जावयास निघालों. कांहीं वेळपर्यंत मी पायीं चाललें, परंतु रस्ता खराब असल्यामुळें पायीं चालणें कठीण पडलें. मग लुइस मला धरून चालला. आलबर्त्त साहेब आणि आलिस हीं तर पळतच चाललीं, नंतर आह्मी घोड्यावर बसलों. आमचा आस्थेवाईक चाकर जो ब्रीन तो माझा घोडा धरून चालला, धुलुखन ह्या सरोवरावरून जातांना मात्र काय तें उतरावें लागलें, नंतर पुढें कांहीं उतरावें लागलें नाहीं.

चार्लस स्त्युअर्त आमचा वाटाड्या होता. गत वर्षी आह्मी ग्लेनफिशी-कडे गेलों होतों तेव्हां हाच आमचा वाटाड्या होता. हा फार चमत्का-रिक चालणारा आहे. डोंगर उतरतांना रस्त्यांत दोन वेळा थोडा थोडा पाऊस लागला आणि खालीं मोठा पाऊस पडला होता असें आमच्या नजरेस आलें. देरी नदीचा उतार बराच खोल होता ह्मणून तट्टांच्या पोटास पाणी लागलें. रस्ता इतका खराब होता तरी हीं तट्टें मांजराप्रमा-णें सपाटून चाललीं. सुमारें सहा वाजतां आह्मी देरी नदी जवळ आलों. एथून आवन सरोवर दाहा मैल आहे. एथें आमच्या गाड्या तयार होत्या. काळोख पडत चालला होता तरी गाडी हांकणारास रस्ता दिसे इतका उजेड होता.

मारलाज ह्याच्या जवळचे पुलावर ब्रौन ह्यानें कंदील लावले. आह्मी आपलीं वेष्टनें वस्त्रें प्रांत आणि ब्रौन ह्यांजला घालण्यास दिलीं. जेव्हां जेव्हां ते आमच्या बरोबर पुष्कळ वेळ पायीं चालून गाडीच्या बाक्सावर बसतात तेव्हां तेव्हां त्यांस हीं वस्त्रें आह्मी देत असतों. क्यासलतन एथें आह्मी आल्यावर आपले घोडे घेतले आणि बालमारल एथें आठ वाजून दाहा मिनिटांनीं पोहोंचलों. ही स्वारी फार चांगली घडली. आह्मी थकलों ह्मणून अगदीं नव्हतों. रात्रीं आह्मी घरगुती रीतीनें भोजन केलें.

# तिसरी मोठी स्वारीः— ह्मणजे ग्लेन फिशी, दालव्हिनी, आणि ब्लेर आथोल ह्यांची.

मंगळवार, अक्तोबर ता० ८ वी, सन १८६१.

आज सकाळीं उठून पाहिलें तों कांहींसें अभ्र दिसलें, तरीं आह्मी जाण्याचा निश्चय केला. जनरल ग्रे हे आमच्या पूर्वीच निघाले होते. आह्मी तिघी जणी (लेदी चर्चिल, मी, आणि आलिस) एका गाडींत बसलों; आलबर्त्त साहेब आणि लुइस, क्यासलतन एथील गाडींत बसले. अभ्र फार आलें होतें, पण डोंगरावरील धुक्याप्रमाणें काळोख पडला नव्हता. नंतर मोठा पाऊसही पडला; परंतु क्यासलतन एथें आह्मी पोहोंचे पर्यंत उघडून गेला. आकाश निरभ्र झाल्यावर वारा फार सपाट्यानें वाहत असल्यामुळें ग्रांत ह्मणाला कीं, आतां आकाश असेंच सर्व दिवसभर स्वच्छ राहील. क्यासलतन एथें घोडे बदलले, आणि दी नदीच्या पलिकडे गेल्दी नदी पावेतों आलों. ह्याच ठिकाणीं गतवर्षी घोड्यावर आह्मी बसलों होतों. बालमारल एथून ही जागा १८ मैल आहे. एथें आमचीं तट्टें तयार होतीं. माझ्या तट्टाचें नांव "इंचरोरी" आणि आलिसचें तट्टूं नवीन होतें. तें उंच असून करड्या रंगाचें होतें, परंतु कुरूप होतें. दुसरी मंडळी आपआपले नेहमीचे तट्टांवर बसली. वाटाड्या तोच (चार्ली स्युअर्त) होता. एका तट्टावर फराळाची पांटी ठेविली होती आणि एकावर ग्रांत वगैरे आळी पाळीनें बसत होते.

निघण्याचे वेळीं अकरा वाजून दाहा मिनिटें झालीं होतीं, आणि गेल्या वर्षा प्रमाणें गेल्दी नदी वारंवार उतरावी लागली. हा रस्ता फार ओलसर होता; परंतु गुदस्तां पेक्षां खराब नव्हता. सुमारें एक तास पावेतों

चाललों नाहीं तोंच धुकें खूप पडलें, आणि वाऱ्याचा मोठा पाऊस आला; तेव्हां छत्री आणि अंगास पाऊस न लागूं देणारीं दुसरीं पांघुरणें घेतलीं ह्मणून मी भिजलें नाहीं. पाणथळाचा रस्ता लागला तेथून आलबर्त्त साहेब पायींच चालत होते, ह्मणून ते फार भिजले; परंतु त्याजपासून त्यांजला कांहीं इजा झाली नाहीं. आह्मी बायका माणसें तट्टांवरून उतरलों नव्हतों. शेवटीं दोन वाजतां ग्लेन फिशी ह्या सुंदर दऱ्यामध्यें आह्मी शिरत असतांना चोहोंकडे अगदीं निरभ्र झालें. एकातें ह्या नदींतून ब्रौन माझा तट्टू घेऊन चालला, आणि आमचे दोघे चाकर लोक एका घोड्यावर बसले होते, ह्मणून त्यांचे जवळचें पाऊस न लागूं देणाऱ्या पांघरुणाचें गांठोडें पाण्यांत पडलें!

पुढें स्त्रोन्ना बारिनचे धबधबे आणि एक अरुंद दरा हीं लागतात. ह्यांची त्या वेळीं फारच शोभा दिसत होती. नंतर एक झाडी लागली, तेथें आह्मी थांबलों, आणि जवळच नदीची दरड होती तेथें फराळ केला; तेथें आह्मांस जनरल ग्रे येऊन भेटले; आणि त्यानीं केलेल्या व्यवस्थेची हकिकत सांगितली. फराळ आटोपून पुनः घोड्यावर बसून थोडे कदम गेलों नाहीं तोंच एक उंच चढण लागली. तिजवरून घोड्यास जाण्याला श्रम झाले. आहाहा! काय एथील मौज, पुष्कळ उंच जाग्यांवरून पाणी धबधब्याप्रमाणें पडत होतें; तेणेंकरून तर फारच शोभा दिसत होती. पुढें कांहीं वेळ पायीं चालून घोड्यावर बसलों; परंतु नदीच्या दुसऱ्या बाजूनें आह्मांस जावयाचें होतें, ह्मणून कितीएक यार्द पायीं चालावें लागलें. कारण तो रस्ता फार अरुंद असल्यामुळें तट्टावर बसून जाणें निर्भय दिसलें नाहीं. आलिसचे तट्टाचे पाय घसरूं लागले. ह्या प्रदेशांतील इनवरेशी झोंपड्यांच्या सभोंवतालीं मोठमोठालीं फर नामक पुष्कळ झाडें होतीं; त्या योगानें तें स्थळ फार शोभायमान दिसत होतें. परंतु झोंपड्या अगदीं उद्वस्त झालेल्या पाहून आह्मांस फार वाईट वाटलें. ही पूर्वी फार रमणीय छावणी असावी, असें मला वाटलें. एथील झाडी एकांत असून सुंदर आहे, आणि सभोंवतीं मोठमोठ्या टेंकड्या आहेत. अशा ठिकाणीं राहणें किती सुखकारक असावें बरें! नंतर घोड्यावरून उतरून एका झोंपडीमध्यें गेलों, आणि तेथें एका भिंतीवर हरणाचें चित्र होतें तें पाहिलें. घोड्यावर बसून

ग्रांत ह्यानें माझा घोडा धरून मला फिशी नदींतून नेलें. ह्या नदीचे उतार सर्व खोल आहेत. एथेंच लार्ड आणि लेदी अलेक्झांदर रसल आह्मांला गत वर्षी भेटले होते. नंतर आह्मांस नेण्याकरितां दोन गाड्या तयार करून ठेविल्या होत्या त्यांत बसून आह्मी चालते झालों. त्या वेळीं सुमारें पांच वाजले असतील, चार वाजतां एथून निघण्याचा आमचा बेत होता.

ज्या रस्त्यानें आह्मी चौघे गुदस्तां घोड्यांवर बसून चाललों होतों त्याच रस्त्यानें आतां गाड्यांमध्यें बसून दुसरे बनापर्यंत चाललों. गाडीला हा रस्ता खराब असून लाखइंच नांवाच्या सरोवरावरून जातो. परंतु सरोवराच्या अलिकडे डाव्या बाजूस वळून आह्मी मोठ्या रस्त्यानें चाललों. काळोख पडत चालल्यामुळें देखावा दिसेनासा झाला. एकंदर पंधरा मैल घोड्यांवरून चाललों. जातांना आह्मांस पुष्कळ पूल लागले. रथवानच्या मोडकळीस आलेल्या किल्याचे जवळच एक कारचा पूल आहे तो अंधक अंधक दिसला. शेवटीं स्पे नदीचा लांकडी पूल उतरून किंगूसी एथील पोस्तखान्यामध्यें येऊन पोहोंचलों. ह्या गांवांत फारच थोडीं घरें आहेत. आह्मी गांवांत ह्या ठिकाणीं आलों नाहीं तोंच लोक दाराशीं उभे राहून कोणाची वाट पाहत आहेत असे आह्मांस दिसले. ह्यावरून आह्मांस असें वाटलें कीं, ह्यांस आह्मी येणार असें माहीत असावें. गांवांत आमच्या विषयीं लोक गुजबूज करूं लागले, आणि आह्मी कोण हें जरी त्यांस निश्चयात्मक समजलें नाहीं तरी त्यांनीं आमच्याविशयीं अटकळ केली. ग्रांत आणि ब्रौन ह्यांनीं त्यांस झुगारपट्टीचें उत्तर देऊन गाडीजवळ येऊं दिलें नाहीं; आणि आमच्या गाडी बद्दल भलतीच गाडी दाखविली. ती तर मोठीच गम्मत दिसली. ह्यांपैकीं एक उंच टोपी घातलेला ह्मातारा मनुष्य तर आमचा फारच शोध करूं लागला.

पुनः आह्मीं गाड्या हांकल्या, नंतर न्यूतनमूर खेडें लागलें. *माक्‌दानल्द जो आमचा चाकर तो ह्या गांवचा आहे. ह्या खेड्या जवळ स्पे व त्रुइम

---

* हा गतवर्षी क्षयरोगानें मरण पावला. ह्याची बायको बालमारल एथील मिचल नांवाच्या लोहाराची मुलगी आहे. ही चांगली बायको आहे. हिजला मी पोषागखान्यांत चाकरीस ठेविलें आहे.

ह्या दोन्ही नद्यांचा संगम होतो, तो उतरून दालव्हिनीकडे चालते झालों. हा रस्ता दाहा मैलांचा असून चढणीचा आहे. त्या वेळीं पुष्कळ वारा वाहूं लागल्यामुळें व मधून मधन पाऊस येत असल्यामुळें थंडी फार पडली होती. शेवटीं पावणेनऊ वाजतां आह्मी दालव्हिनी एथील पोस्तखान्यांत येऊन पोहोंचलों. घोडे सोडलेल्या ठिकाणापासून हें गांव एकुणतीस मैल आहे; आणि अगदीं एकांत आहे. एथेंही मागल्या गांवाप्रमाणें लोक जमले होते; आणि मला वाटतें कीं, त्यांनीं आह्मांस ओळखिलें; परंतु तो आमचा समज खोटा ठरला. तरीं तेथील पोस्तखान्या जवळ एका दासीनें मला ओळखिलें, कारण तिनें मला आबरदीन व एदिन्‌बरो एथें पाहिलें होतें. गाड्यांतून उतरून त्या पोस्तखान्याच्या माडीवर आह्मी गेलों. हा पोस्त-खाना फेतरकेर्न एथील पोस्तखान्यापेक्षां मोठा खरा, तरी तितका नीट नेटका आणि स्वच्छ नव्हता. तेथें चालीप्रमाणें भेट घेण्याची, निजण्याची, आणि जेवणाची, अशा तीन खोल्या होत्या. शिवाय आलबर्त्त साहेबांला पोषाग करण्याकरितां निराळी खोली होती. *मेरी आंद्रूज आणि लेदी चर्चिलची दासी ह्यांजला मिळून एक खोली होती; कारण सगळी मंडळी घरांतच होती. एथें जेवणाची व्यवस्था नीट नव्हती. फक्त चहा आणि दोन खराब कोंबडीं तयार केलीं होतीं, बटाटे वगैरे कांहीं नव्हतें; आणि मनोरंजनासाठीं कांहीं गंमतही चांगली नव्हती. काम करण्यास तेथील कोणी दासी आली नाहीं. तेथें दोघी होत्या परंतु त्यांची आमच्याकडे येण्याची इच्छा नव्हती. आमचे चाकर ग्रांत आणि ब्रौन हे भिजले होते आणि कपडे वाळवीत होते, ह्मणून आमचेकडे येण्यास त्यांस बनलें नाहीं. संध्याकाळीं पाऊस पडला, आणि रात्रीच्या भोजनाला चांगले पदार्थ मिळाले नाहींत. मेरी, माक्सतेद (लेदी चर्चिलची दासी), ग्रांत, ब्रौन, आणि स्त्युअर्त, ह्यांनी आपलें जेवण कमर्शियल खोलीमध्यें केलें. ती खोली माडीच्या जिन्याच्या पायथ्या-जवळ आहे. त्यांना आमचें उरलेलें खाणें मात्र खावयास होतें.

---

* ही माझ्या पोषागखान्याकडील दासीं पैकीं एक होती. हिनें हें काम मजजवळ असतांना फार चांगलें बजाविलें; ती आतां प्रिन्सेस हेलिना जवळ त्याच कामावर आहे. माझा प्रियकर चुलता बेलजियन लोकांचा राजा त्याचे जवळ तिचा बाप अठ्ठावीस वर्षें होता.

## बुधवार, अक्तोबर ता० ९ वी, सन १८६१.

प्रातःकाळीं उठून पाहिलें तों आकाश स्वच्छ होतें. आलबर्त्त साहेबांस उठल्यावर असें कळलें कीं, स्मिथ ग्रनी माक्फर्सन हा आपला ब्यागपैप वाजविणारा आणि दोन बाया ह्यांसहित सकाळींच येऊन बसलेला आहे. आह्मी जेव्हां पोषाग करण्यास लागलों, तेव्हां आह्मांस पडघम आणि बांसरी ह्यांचा नाद ऐकूं आला. नंतर आह्मांस असें कळलें कीं, नवीन झालेले वालंतीर्स शिपाई हे आले आहेत; ह्यावरून आह्मी एथें आलों आहों हें लोकांस समजलें, असें दिसलें. असो, एथें लोकांचा जमाव फार नसल्यामुळें जरी आह्मी आल्याचें त्यांस कळलें तरी कांहीं चिंता नाहीं. त्या पोस्तखान्याची मालकीण लठ्ठ म्हातारी होती, तिनें काळा पोषाग केला होता, त्याला पांढरी फीत लाविली होती व त्यावर नारिंगांचीं फुलें लाविलीं होतीं! पावणेनऊ वाजतां आह्मी न्याहारी केली; आणि साडेनऊ वाजतां बाहेर पडलों. ग्रनी हा आपली बायको आणि मुली ह्यांसहित दरवाज्याजवळ तयारच होता, मुलीच्या हातांत फुलांचे तुरे होते आणि वालंतीर्स शिपाई पोस्तखान्या समोर उभे होते. गेल्या शनवारच्या दुपारपासून ते एथें जमले होते.

कालच्या प्रमाणें आह्मीं गाड्या चालत्या केल्या. एथील देखावा उत्कृष्ट आणि भव्य होता. उंच उंच टेंकड्या असून एथें वस्ती मुळींच नव्हती. द्रमौख्तरच्या खिंडींतून आह्मी गेलों. आमच्या समोर अणखी दोहों बाजूंस सुंदर टेंकड्या होत्या. दोन टेंकड्यांचे मधून आह्मी गेलों. डावेकडचे टेंकडीचें नांव धी बोर आफ् बेदन्याख, आणि उजवेकडचे टेंकडीचें नांव धी आथोल सौ. इनवरनेसशायर आणि पर्थशायर परगणा ह्यांच्यामध्यें द्रमौख्तर नांवाची खिंड आहे.

नंतर पुढें आह्मांस लाखगारी नांवाचें सरोवर लागलें, हें फार सुंदर आहे; धुकें पडल्यामुळें कांहीं अंतरावरील टेंकड्या दिसत नव्हत्या. ह्या ठिकाणीं एक लहानसें शिकारीचें घर होतें, तेथून दऱ्याच्या दोन्ही बाजू दिसत होत्या आणि सरोवरही दिसत होतें; परंतु तें शिकारीचें घर कोणाचें हें आह्मांस कळलें नाहीं. वाटेंत आह्मांस पुष्कळ मेंढपाळ

व गुराखी भेटले. त्यांच्या बराबर त्यांचे कळप नव्हते. हे फालकर्क एथून परत जात आहेत, असें ग्रांत ह्यानें आह्मांस सांगितलें. लाखगारी सरोवर टाकल्या नंतर व दालनाकार्देख एथील पोस्तखान्यांत पोहोंचल्या पूर्वीच आह्मांस मोठा पाऊस लागला. दालनाकार्देख दालव्हिनी पासून १३ मैल आहे. गारी सरोवराचे बाजूनेंच आमचा रस्ता आहे. हा प्रदेश कोठें कोठें अगदीं सपाट लागला. एथील जमीन बरीच लागवड केलेली दिसली. दालनाकार्देख पोस्तखान्याकडील लोक आह्मी येऊं कीं न येऊं अशा चिंतेनें वाट पाहत होतें असें दिसलें. ह्या ठिकाणीं घोडेवाले चार घोडे धरून तयार होते; परंतु जनरल ग्रे ह्यानें त्यांस असें सांगितलें कीं, ज्या मंडळीं करितां चार घोडे तयार ठेवा ह्मणून हुकूम झाला होता ती हीं नव्हे. ज्या मंडळी करितां दोन घोडे सांगितले होते, ती ही आहे. नंतर एक गयाळ हांकणारा देऊन दोन खराब घोडे गाडीस त्यांनीं जुंपून दिले. मग आह्मी निघालों. आमची गाडी हांकणारा कोचबाक्सावर बसला.

गारी ह्या सरोवराचा देखावा फार सुंदर आहे. ह्याचें पाणी कोहख आणि फिशी ह्या नद्यां प्रमाणें मोठमोठाल्या दगडांवरून पडून कित्येक ठिकाणीं धबधबे बनले आहेत. बर्च आणि मौंतन आश ह्या झाडांची इतकी दाटी आहे कीं, तीं झाडें पाण्याच्या अगदीं कांठावर येऊन ठेपलीं आहेत. नंतर बराच आह्मांस पाऊस लागला. दालनाकार्देख एथून कांहीं मैलांवर ड्यूक आफ् आथोल आह्मांस भेटले. त्यांनीं आपला नेहमीचा पोषाग केला होता. ते एका सुंदर लहानशा तट्टावर बसले होते; पुढें ते आमच्या गाडी बरोबर चालले. ते ह्मणाले कीं, आपल्या येण्याविषयीं इकडे बरीच वदंता उठली आहे; परंतु मी कांहीं ह्याजविषयीं कोणास सांगितलें नाहीं. अणखी एकदां पावसाच्या सरी आल्या; परंतु बेनीग्लो डोंगर आणि किली क्र्यानकीचा घाट ह्यांचे जवळ जवळ ज्या वेळेस आलों त्या वेळेस पाऊस उघडला. ह्या ठिकाणीं बर्च झाडें चोहोंकडे असल्यानें मोठी मजा दिसत होती. हींच झाडें दी नदीच्या बाजूस आहेत, परंतु तेथें त्यांस पानें नसल्यामुळें इतकी शोभा दिसत नव्हती.

ब्रुआर नदी आणि तिचे धबधबे ह्यांवरून आह्मी गेलों; परंतु तेथें थांबलों नाहीं. नंतर ड्यूक आफ् आथोल ह्यानें आह्मांस दुसऱ्या रस्त्यानें नेलें. तो फार चांगला होता; परंतु इकडून आगगाडीचा रस्ता करणार आहेत असें ऐकून मला फार वाईट वाटलें. ह्या ड्यूकानें इकडे मोठी सुधारणा केली आहे, व रस्त्याच्या सभोंवत्या टेंकड्या आहेत; ह्मणून हा रस्ता फार सुंदर दिसला. एथील झाडांची पालवी विपुल असून त्यांज-वर सूर्यप्रकाश पडल्यामुळें कांहीं विशेष शोभा दिसत होती. नंतर आह्मांस एक दुतर्फा झाडींचा रस्ता लागला. तो संपल्या नंतर ड्यूक आफ् आ-थोलच्या किल्ल्याच्या दारा जवळ आलों. तो पाहिल्या नंतर सत्रा वर्षां-च्या पूर्वींच्या गोष्टींची मला आठवण झाली. ह्या वेळेस किल्ल्यांत दचेस व मिस माक्ग्रेगर ह्यां शिवाय कोणी नव्हतें; त्या दाराशीं उभ्या होत्या, व मी दचेसला जाऊन कडकडून भेटलें. तेथील त्या सर्व शिकारीच्या खुणा, व तो जिना हें सर्व मी पक्केपणीं ओळखलें. जिना पाहण्याबरोबर आह्मी वर चढून गेलों. दचेस हिनें मला एका खोलींत नेलें, ती मीं पाहतांच ओळखली. तिजमध्यें लेदी क्यानिंग राहत असे. ह्या खोलींत आह्मीं आपले पोषाग काढून ठेवून ज्या ज्या सुंदर खोल्यामध्यें आह्मी राहत होतों त्या सर्व पाहिल्या. ज्या खोलींत विकीला दोन खुर्च्यांवर निजवलें होतें ती खोली आह्मीं पाहिली. विकी त्यावेळेस चार वर्षांची होती. जेवणा-चे खोलींत जाऊन थोडी काफी घेतली ती सुखमद वाटली. खालच्या मजल्यांत कांहीं हरणाचीं शिंगें ठेविलीं होतीं, ती पाहण्यास आह्मी गेलों. ड्यूक ह्याचा आवडता कुत्रा तेथें होता. तो काळसर असून तेरियर जाती-चा आहे व त्याचे केंस गुळगुळीत आहेत; मग आह्मी गाडींत बसलों. ती गाडी फार चमत्कारिक होती; तिचा आकार नावे प्रमाणें असून तिला चार चाकें होतीं व तिला दोन घोडे जुंपले होते. ड्यूक, दचेस, आणि त्यां-चा कुत्रा, ह्यां सहित आह्मी चौघेजण गाडींत बसलों. लेदी चर्चिल, जनरल ग्रे व मिस माक्ग्रेगर हीं दुसऱ्या गाडींत बसलीं आणि आमचे दोघे चाकर हे बाक्सावर बसले. त्यांस हें सर्व नवीन वाटून आनंद झाला. ह्या वेळीं हवा चांगली होती आणि सुमारें साडेबारांचा अम्मल झाला होता. पुढें दुतर्फा झाडीच्या रस्त्यावरून व आमच्या आवडीच्या रस्त्यानें

चाललों. ग्लेनातिल्त ह्या चमत्कारिक दऱ्याजवळ आल्या नंतर रस्ता नागमोडी आहे. तिल्त ह्या खडकी नदीच्या दोहीं बाजूंला मोठमोठाल्या सुंदर टेंकड्या आहेत आणि तिच्या कांठावर जीं झाडें आहेत, तीं बहुतकरून बर्च आणि एल्दर हीं आहेत. तीं अगदीं पाण्यावर पुढें येतात.

ह्यापुढें आह्मांस मार्बललाज् लागलें. तेथें एक राखणदार राहतो. नंतर फारेस्तलाज् एथें आलों. एथें गाडीच्या रस्त्याचा शेवट झाला आहे, आणि दरा रुंद होत गेला आहे. ह्या ठिकाणीं आमचीं तट्टें उभीं होतीं. तीं लार्ड फैफ ह्याचें बेनाख नांवाचें शिकारीचें घर आहे त्यांत रात्रीचे रात्र ठेविलीं होतीं. त्या बापड्यांस रात्रीं कांहीं चंदी चारा मिळाला नाहीं. फारेस्तलाज हें ब्लेर पासून आठ मैलांवर आहे. एथें आह्मी त्या प्रिय दचेसचा निरोप घेतला. ह्या फारेस्तलाज् जवळ ह्मातारा पीतर फ्रेजर आह्मांस भेटला. हा एथें सर्व राखणदारांचा माजी नाईक होता, आणि आतां दोन्ही हातांत दोन काठ्या धरून चालत होता. ड्यूक ह्यांचे राखणदार आणि त्यांचे ब्यागपैपवाले आणि त्यांचा एक पाहुणा हे तेथें होते.

फारेस्तलाज आह्मीं सुमारें दोन वाजतां सोडिलें. आह्मी तट्टांवर बसलों होतों व ड्यूक आणि त्याचे बारा लोक हे पायीं चालले. सांदी म्याकअरा हा हल्लीं मुख्य नाईक आहे, तो ह्मातारा व पिकलेला आहे; तो व दोन ब्यागपैपवाले आमच्या पुढें चालत होते. हे दोघे ब्यागपैपवाले रस्त्यानें आळी पाळीनें ब्यागपैप वाजवीत होते ह्मणून आह्मांस मोठी करमणूक झाली. टेंकड्यांचे बाजूनें नाद घुमत होता, आमचे लोक व ड्यूकाचे लोक हे सर्व घागरे नेसले होते व ते चालतां चालतां वांकण घेत होते, तट्टें देखणीं होतीं; येणेंकरून फारच मजा दिसत होती.

ड्यूकाच्या राखणदारां पैकीं दानल्द म्याकबीथ हा मागें सरकारच्या पायदळांत होता, तो क्रिमिया एथील लढाईत होता. हा मोठा प्रख्यात निशाणमारणारा असून ड्यूकाचे इतर चाकराप्रमाणेंच देखणा आहे. कांहीं वेळ पावेतों रस्ता चांगला होता, परंतु पुढें खराब लागल्यामुळें माझें तट्टू धरून न्यावें लागलें. जेव्हां रस्ता वाईट लागे, अथवा तट्टांस लवकर चालविण्याची गरज पडे, तेव्हां मी नेहमी त्यांस हातीं धरून नेण्यास सांगत असें.

थूक मजबरोबर बराच वेळ चालत होते. मागल्या गोष्टींविषयीं बोलतां बोलतां ते थट्टेनें असें ह्मणाले कीं, आपला भरंवसा मजवर नाहीं हें मला ठाऊक आहे ह्मणून आपणास नेण्याकरितां मी आपल्या घोड्याचा लगाम धरीत नाहीं. नंतर मी त्यांस हसून ह्मणालें कीं, छी! असें कांहीं नाहीं. ज्या मनुष्याचा मला सहवास आहे त्यानेंच मला नेण्याकरितां माझ्या घोड्याचा लगाम धरावा हें मला बरें वाटतें.

शेवटीं तीन वाजतां आह्मीं उतरून दाल क्रानखी नांवाच्या ठिकाणीं तिल्त नदीच्या डगरीवर फराळ केला. तेथून लाख नांवाचें सरोवर दिसत होतें. एथला देखावा फार सुंदर दिसला; आणि चाकर लोक फराळाच्या गाठोड्या सोडीत असतां आह्मीं नकाशा काढून घेतला. फराळाचे पदार्थ आह्मीं आमच्या बराबर घेतले होते. नेहमीप्रमाणें उरलेलें फराळाचें चाकर-लोकांस दिलें. परंतु ह्यावेळेस फराळास त्या लोकांची पुष्कळ मंडळी होती. फराळ आटोपल्यावर मी कांहींशी पायीं चाललें, परंतु रस्ता भिज-लेला आणि खराब असल्यामुळें आलबर्त्त साहेबानें सांगितल्यावरून मी पुनः तट्टावर बसलें. थोडक्या मिनिटांनीं पालतार्फ नांवाचा प्रसिद्ध उतार लागला. हा उतार खोल आहे, आणि फार पाऊस पडला ह्मणजे उतरून जाणें कठीण पडतें. एका बाजूनें थूकानें माझें तट्टू धरिलें, आणि दुसरे बाजूनें सांदी धरील ह्मणून सांगितलें; परंतु सर्वां पेक्षां ब्रौन ह्याजवर माझा भरंवसा आहे ह्मणून ब्रौन ह्यानें धरावें, असें मी सांगितल्यावरून माझें तट्टू त्यानें धरिलें. सांदी म्याकअरा आणि दोघे ब्यागपिपवाले आपलें वाद्य वाजवीत पुढें चालले होते. हा उतार दिसण्यांत इतर उतारां प्रमाणेंच दिसतो; परंतु आमचे चाकरलोक त्यांत गेले नाहींत तोंच त्यांच्या गुडघ्यावर पाणी आलें. आणि मध्यभागीं तर कंबरे इतकें पाणी होतें. एथून सांदी परत आला, आणि मी थूकाला ह्मणालें कीं, आपल्या बद्दल सांदीलाच माझें तट्टू धरूंद्या. त्या प्रमाणें त्यानें तट्टू धरून पाण्यांतून नेलें. आमचे चाकर आणि इतर लोक मागून आले. आलबर्त्त साहेब हे अगदी माझ्या पाठिमागेंच होते. आमच्या मंडळींपैकीं कांहींजण एका घोड्यावर दोन दोन बसलेले होते. जनरल ग्रे ह्याच्या पाठीमागें पीतर राबर्तसन हा होता.

पुढें रस्ता फार उतरणीचा लागल्यामुळें तट्टावर बसून जाणें वाईट वाटलें, परंतु आह्मी भिजून गेलों होतों व रस्ता चालण्यास फार कठीण होता, ह्मणून आह्मा बायां मंडळीस तट्टावर बसावें लागलें. आलबर्त्त साहेब फार करून पायीं चालले. एकदां मात्र मी अंमळशी उतरलें होतें, तेथें घोड्याला पाऊल ठेवण्यास देखील जागा नव्हती. असा रस्ता अडवणीचा असल्यामुळें कोठें कोठें ब्रौन ह्याला माझा घोडा धरून चालतां आलें नाहीं. ड्यूक साहेबानें तर फार मेहनत केली.

तिल्त नदी उगमाजवल अगदीं अरुंद अरुंद होत जाऊन उगमस्थानीं अगदीं दिसेनाशी होते. तार्फ नदी धबधब्यापासून सुमारें दोन मैलांवर तिल्त नदीला मिळते. नंतर आह्मांस एक खुला दरा लागला. आमच्या समोर ब्रेमारच्या टेंकड्या होत्या आणि आजूबाजूस लहान लहानशा टेंकड्या होत्या. पुढें जवळच बेनाख नांवाचा लहानसा नाला लागला तो टाकून "कौंती मार्च" जवळ आलों. एथें पर्थ आणि आबरदीन ह्यांची सीमा आहे, एथें आह्मीं उतरलों. नंतर ड्यूकानें आलबर्त्त साहेब ह्यांस व मला थोडी विस्की दारू दिली, ती त्याजवळ एका चांदीच्या भांड्यांत होती आणि ती देते वेळीं चालीप्रमाणें आमचें कल्याण इच्छून ह्मणाले कीं, आपण ब्लेर एथें आलां, हें पाहून मला आणि इतर लोकांना आनंद झाला आहे. आणि आपण इकडे वाटेल तितके वेळ यावें, आणि आतां घरीं जाऊन सुखरूप पोहोंचावें अशी मी आशा करितों. नंतर त्यांनीं आपल्या भाषेंत हैलंदी जयजयकाराचे घोष केले. आमच्या कडच्या मंडळीनें ग्रांतच्या ह्मणण्यावरून त्या ड्यूकाच्या नांवानें जयघोष केले. ब्रौन ह्याच्या गंभीर घोषामुळें माझें तट्टू भ्यालें.

आह्मी बेनाख एथें सहा वाजावयास दाहा मिनिटें कमी असतां येऊन पोहोंचलों, त्या वेळेस बराच अंधार पडला होता. ह्या शिकारीच्या घरा जवळ जवळ आलों तेव्हां ब्यागपैपवाले पुनः पुनः ब्यागपैप वाजवूं लागले. तेणेंकरून घोडे मोठे मजेनें चालले.

लेदी फैफ ही एथें आमची भेट घेण्याकरितां आली होती. तिनें आह्मांस एथेंच चहा दिला, तो फारच गोड लागला. पुढें आह्मी



पालतार्फ नांवाच्या उताऱ्यांतून जाणें.

FORDING THE POLL TARF.

गाडींत बसलों, आणि ड्यूक आफ् आथोल ह्यांस परत जाण्यास निरोप दिला. ते मध्यें मुक्काम न करितां एकदम घरीं जाणार होते; रात्र अंधारी आणि रस्ता खराब असल्यामुळें तें जाणें कांहींसें धोक्याचें होतें. आह्मी सवाआठ वाजतां सुरक्षित घरीं येऊन पोहोंचलों. रात्रीं जरी बारीक बारीक पाऊस पडत होता, तरी उष्मा फार झाला. शेवटीं आकाश निरभ्र होऊन नक्षत्रें दिसूं लागलीं.

आज एकंदर ६९ मैलांचा रस्ता झाला आणि काल साठ मैलांचा होता. मी जन्मांत ज्या स्वाऱ्या केल्या आहेत त्यांत ही अगदीं मोठी मनोरंजक होती, हिचें जेव्हां जेव्हां स्मरण होईल, तेव्हां तेव्हां मला आनंद झाल्या शिवाय राहणार नाहीं आणि अशाच स्वाऱ्या कराव्या असें वाटेल. लुइस आमच्या बराबर होता ह्याचा मला आनंद वाटतो. तो सोबती वेल्हाळ आहे. माझी आई दचेस आफ् केंत हिच्या मरणानें मला जें परम दुःख झालें होतें त्या दिवसापासून आजपर्यंत मी असें सुख कधींही भोगिलें नव्हतें व कोणत्याही गोष्टीपासून मला इतका आनंद झाला नव्हता. आह्मी कांहीं थकलों नव्हतों. आह्मी बायांनीं आपले पोषाग न बदलतां घरगुती रीतीनें जेवण केलें. जेवण आटोपल्यावर आह्मी हैलंद देशाचे नकाशे पाहत बसलों.

# शेवटची स्वारी.

**बुधवार, अक्तोबर ता० १६ वी, सन १८६१.**

आज प्रातःकाळीं उठून पाहिलें तों आकाश निरभ्र होतें आणि वाराही वाहत नव्हता ह्मणून आह्मांस आनंद झाला. हिम पुष्कळ पडलें असल्या कारणानें डोंगर आणि गवत हें फार चकचकीत दिसत होतें. सकाळीं लवकरच उठून आलिस, लेंचन, आणि लुइस ह्यांसहित आमच्या खोलीं-तच आह्मीं न्याहारी केली. सुमारें नऊ वाजतां त्या तिघां बरोबर निघालों. आजचा दिवस खरोखरच चांगला दिसत होता. हा प्रदेशही सुशोभित होता; इतकेंच कीं, इकडील झाडें बहुतेक पर्णरहित होतीं.

क्यासलतन एथें आणि सर्व ठिकाणीं छायेखालीं अद्याप पर्यंत हिम दिसत होतेंच आणि वाराही फार गार वाहूं लागला. क्यासलतन एथें टप्याचे घोडे घेतले. ग्लेन क्लूनी आणि ग्लेन क्यालातर हे दोन दरे आह्मांस लागले. हे फार शोभिवंत दिसत होते. आलबर्त्त साहेबांला तें पाहून मौज वाटली. सुमारें दोन तासांत लाख क्यालातर नामक सरोवराजवळ आलों. सरोवराच्या जवळचा रस्ता फार खराब होता. एथें आमचीं तट्टें आह्मां करितां तयार होतीं. थोडेसे चालून आह्मी तट्टांवर बसलों. मी आपल्या शानदार "फयवी" नांवाच्या तट्टावर बसलें आणि आलिस "इंचरोरी" नांवाच्या तट्टावर बसली.

ही स्वारी चांगल्या रीतीनें घडली आणि दिवसभर सूर्यप्रकाश चांग-ला होता; ढग, वारा, पाऊस ह्यां पैकीं एकही नव्हतें. नंतर आह्मी लित-लकेर्न तर्क नामक टेंकडीवर चढलों. ही टेंकडी लाख क्यालातर सरोवराच्या उत्तरेस आहे. इजवर चढून आण्यास एक लहानसा सुलभ पायरस्ता

आहे. तो आरंभीं अगदीं सपाट असून पुढें इतका हळूहळू चढणीचा होत गेला आहे कीं, चढण दिसण्यांत देखील येत नाहीं. हिचे माथ्यावरून भोंवतालचा देखावा दिसूं लागला. ह्यावर शेवाळ आणि गवत रुझलेलें आहे; आणि माथा इतका सपाट आहे कीं, एथें गाडी हांकण्यास हरकत नाहीं. हा माथा फार उंच असल्यामुळें लाखनगार सरोवराच्या पलिकडे जें पठार आहे तें तेथून दिसतें. तथापि तिकडचा देखावा मोठा उत्तम नव्हता; परंतु दुसऱ्या बाजूचा देखावा खरोखरच फार रमणीय होता. ह्या ठिकाणी हवा इतकी चांगली वाहत होती आणि सूर्यप्रकाश इतका स्वच्छ पडला होता व निवांतपणा इतका वाटला कीं, गतवर्षी बेनम्युइख धूई वर आह्मी होतों, त्या दिवसाची आठवण झाली.

बेनम्युइख धूई व त्याच्या सभोंवतील केर्नगार्म, ब्रेरिअख्, बेनआवन, बेन्नाभूर्द इत्यादि अनेक पहाड आह्मांस दिसत होते. बेनम्युइख एथून बेडौल दिसला; बेनीग्लो, आणि त्याच्या जवळील पर्वतांची रांग स्पष्ट दिसत होती. मग लाख ते सरोवरा जवळीळ शिखालियन, ब्ल्याक मौंतच्या जवळचे पहाड, आणि फोर्त विलयमच्या जवळचा बेननेविस पहाड हीं आह्मांस सर्व दिसलीं.

केर्न तर्कच्या माथ्यावरून आह्मांस लाख क्यांतर नामक सरोवर दिसलें. हें क्यालातर सरोवरा पेक्षां लहान असून त्याचे वर आहे. पुढें केर्नग्लेशी इकडे गेलों; त्याच्या टोंकाशीं एक उतरंड आहे. ह्याजपुढें एक मोठा सुंदर देखावा दिसूं लागला त्याजकडे आह्मी पाहूं लागलों. फैफ-शयर, पर्थ व स्तर्लिंग ह्यांच्या मधला प्रदेश आणि लामंद हिल्स नामक टेंक-ड्या ह्या आह्मीं पाहिल्या. खरोखरच हा देखावा फार रमणीय होता, आणि हैलंदचा एवढा मोठा प्रदेश पाहणें ही मोठी मौजच होती. मला वाटतें कीं, माझ्यानें त्याचें वर्णन चांगले रीतीनें करवणार नाहीं, परंतु माझ्या अल्प बुद्धीनें कांहींसें करितें.

उत्तरेस— बेनम्युइख धूई, ब्रेरिअख्, केर्नगार्म, बेनआवन, बेन्नाभूर्द, हे डोंगर.

पूर्वेस— लाखनगार इत्यादि.

नैर्ऋत्येस—बेनीग्लो, आणि शिखालियन, ह्याच्या पलिकडे सभोंवतालच्या टेंकड्या; आणि दंकेल्द व ब्ल्याकमौंत ह्याच्या मधील डोंगर.

पश्चिमेस—बेननेविस.

दक्षिणेस—लामंद टेंकड्या आणि पर्थ परगणा मध्य अंतरावर.

नंतर कांहींसे पायीं चालून मी तट्टावर बसलें. अर्ध्या तासांत डोंगर सपाटी टाकून केर्नलाखन नामक दऱ्याच्या बाजूस येऊन पोहोंचलों. हें खरोखरच फार सुंदर स्थल आहे, हें पाहून मला आणि लुइस ह्याला झोवा ह्याचें स्मरण झालें; त्यांत आणि ह्यांत इतकेंच अंतर कीं, तेथें आह्मांस आमच्या पाठिमागें पहाडांचा मोठा विस्तार दिसला नाहीं. केर्नलाखन ही दरी फार अरुंद असून इच्यांतून वाहणारी ऐला नदी पांढऱ्या फिती प्रमाणें दिसली. तिच्या कांठीं झाडेंही पुष्कळ आहेत. सभोंवतालच्या टेंकड्या हिरव्या चार असून उंच आहेत आणि ह्या दरीच्या माथ्यावर सुंदर टेंकड्या आहेत. ह्या ठिकाणीं पाणथळ जमिनी असल्या कारणानें आह्मांस जरा लांबणीचा रस्ता घ्यावा लागला. तेथून ही दरी आह्मांस उजवे बाजूस चांगली लांबचलांब दिसत होती. डावे बाजूस ग्लेन ऐला हा दरा लागला. हा रुंद असून ह्याचे सभोंवती केर्नलाखन ह्या सारखे उंच पर्वत नाहींत. ग्लेन ऐला दऱ्याचे पलिकडे लामंद हिल्स नामक टेंकड्या आहेत. त्यांच्या पायथ्याशीं लाखलेवन सरोवर आहे.

नंतर आह्मीं एका उंच जागीं घोड्यावरून उतरलों; ती जागा इतकी उंच होती कीं, कोणी मागें पडेल कीं काय ह्मणून भय वाटत असे. एथें दोन वाजतां फराळ केला. सूर्यप्रकाश बेताबाताचा असून डोळे दिपवणारा नव्हता. फराळ फार चांगला लागला, कारण वारा थंड सुटल्यामुळें आह्मास भूक लागली. केर्नतर्कच्या शिखरावरील बर्फाचे तुकडे ब्रौन ह्यानें हातांत घेतले, ते शिलिंगाप्रमाणें जाड होते आणि ते वितळले नाहींत.

हेलिना ह्याच कायते मोठ्या स्वारींत आमच्या बरोबर असल्यामुळें तिला विशेष आनंद वाटला.

दंकन आणि लाख क्यालातर एथील राखणदार जो आर. स्त्युअर्त हे आमचे वाटाडे होते.



केर्नलाखन एथील फराळ.

LUNCHEON AT CAIRN LOCHAN.

मी एथें थोडे नकाशे घाई घाईनें काढून घेतले. आलबर्त्त साहेबानें एका चिठ्ठीवर आह्मीं एथें फराळ केला असें लिहून ती एका शिशींत घालून पुरून ठेविली. गत वर्षींही ग्रांत ह्यानें बेनम्युइख धूई डोंगरावर असेंच केलें होतें. पाणथल जमीन टाळण्याकरितां आह्मी ज्या रस्त्यानें आलों होतों, त्याच रस्त्यानें कांहीं परत चाललों. आह्मी बायका माणसें थोडाच वेळ पायीं चालून घोड्यांवर बसलों. पुढें तो रस्ता सोडून केर्नवालचा रस्ता धरला. केर्न ग्लेशी आमच्या उजव्या बाजूस राहिलें. ग्लेन ऐला आणि केर्न लाखन ह्यांच्या पलिकडच्या टेंकड्या ह्यांवर सूर्यकिरणांनीं विशेष शोभा दिसत होती, आणि त्या निळ्या दिसत होत्या आणि दऱ्यांत छाया पडली होती. शिखालियन आणि इतर डोंगराच्या रांगा स्पष्ट दिसत होत्या. पुढें गारब्कोरी ह्या टेंकडी वरून आह्मी चाललों. एथून स्पितलकडे जाणारा रस्ता आह्मांस दिसला. आह्मी फार उंच ठिकाणीं असल्यामुळें जवळचे सर्व डोंगर दिसत होते. ह्यांची एक चमत्कारिक साखळी लागून गेली होती. खरोखर ही मजा पाहून मला ह्या हैलंदामध्यें अणखी स्वाऱ्या कराव्या असें वाटूं लागलें!

आह्मांस वाटेंत जीं स्थळें लागलीं त्यांचीं नांवें माझ्या लक्षांत राहणें कठीण, असें एथील लोक ह्मणतात; तीं नांवें मला दंकननें लिहून दिलीं, तीं येणेंप्रमाणें:--

बालमारल पासून लाख क्यालातर चार मैलांवर लागलें.

आह्मी लाख क्यालातर अकरा वाजतां सोडलें.

नंतर लहान केर्न तर्क लागलें.

नंतर मोठें केर्न तर्क लागलें.

नंतर लाख क्यांतर.

केर्न ग्लेशी.

केर्न लाखन.

कानेस सहा मैलांवर लागलें.

बालमारलास परत येतांना जीं स्थळें लागलीं, तीं येणेंप्रमाणें:—

केर्न लाखन.

केर्न ग्लेशी.

गार्ब खोरी.
मंथ इगीरोद.
ग्लास मियाल.
फिआन खोरी.
आरनगी.

नंतर शिअनास्पितल ब्रिजहून बालमारलास येऊन पोहोंचलों तें एथून सोळा मैलांवर आहे. शिअनास्पितल ब्रिज एथें साडेचार वाजले होते.

ह्यावरून ह्या प्रदेशाच्या स्थलांचीं आह्मांस चांगली माहिती झाली. मुख्यत्वेंकरून आलबर्त्त साहेबांस फारच आनंद झाला; कारण पूर्वींचे स्वाऱ्या पेक्षां ही अगदीं निराळे तऱ्हेची होती. माझी स्मृति इतकी कोती आहे कीं, मला स्थलांची आठवण राहत नाहीं. मंथइगी ह्या टेंकड्या वरून आह्मी उतरून खालीं येत असतां रस्ता निसरडा आणि चिखलवट असल्यामुळें मी दोन वेळां पडल्यें. मध्यें मध्यें जी उंच ठिकाणें लागलीं तेथें मी घोड्यावरून उतरलें. साडेचार वाजतां स्पितल पुलाजवळ आलों. हा क्यासलतन एथून १५ मैलांवर आहे. पुढें नवा रस्ता आह्मी धरला. स्पितल ह्या नदीच्या बाजूनें आमचा रस्ता होता, तो आह्मीं घेतला. आह्मी थोडेसे लवकर आलों असतों, तर आलबर्त्त साहेबांस एक हरीण सांपडलें असतें; पण उशीर झाला. त्यावेळीं रात्र झाली होती. सुंदर चांदणें पडलें होतें, सात वाजायास वीस मिनिटें कमी होती तेव्हां घरीं येऊन पोहोंचलों. अरेरे! आमची कदाचित् ही शेवटची स्वारी किं हो!

(आणि खरोखर ही आमची शेवटचीच स्वारी झाली!– १८६७.)

# इंग्लंद व ऐर्लंद देशांतील सफरी

आणि

## गलबतांत बसून समुद्रपर्यटन.

# ऐर्लेंदास जाण्याची पहिली खेप.

## मुक्काम कोव् आफ् कार्क.

### विक्तोरिया आणि आलबर्त्त नांवाचें गलबत,

**गुरुवार, आगस्त ता० २ री, सन १८४९.**

आज आह्मी कोव् आफ् कार्क एथें लवकरच आलों, परंतु सफर मोठ्या आनंदाची झाली नाहीं. हा दिवस सुंदर व स्वच्छ होता आणि समुद्र दिसायाला अगदीं शांत होता, तथापि अंतर्यामीं पाणी इतकें उसळत होतें कीं, वाचण्यास किंवा दुसरें कांहीं करण्यास बनत नव्हतें. लांद्सएन्द हें भूशिर आह्मी सकाळीं नऊ वाजतां मागें टाकिलें. संध्याकाळीं आठ वाजल्यावर आह्मी गलबताच्या मजल्यावर गेलों, त्या वेळीं आह्मांस असें कळलें कीं, आह्मी कोव् आफ् कार्क बंदराच्या जवळ आहोंत. तेथून टेंकड्यावरील आनंदसूचक अग्नि, आणि निरनिराळ्या आगबोटींवरून सोडलेले बाण आणि चंद्रज्योती हीं दिसलीं. हें बंदर फार मोठें आहे, परंतु किनाऱ्याची जमीन विशेष उंच नाहीं. आह्मी माणसाला माणूस दिसतें न दिसतें इतक्या सुमारास गेलों त्यामुळें मोठी मौज वाटली. आमच्या बरोबर गलबतांत लेदी जोसलीन, मिस दासन, लार्द फारतेसक्यू (लार्द स्त्युअर्द), सर जार्ज ग्रे (होम दिपार्तमेंतचे सेक्रेतरी आफ् स्तेत), मिस हिल्दयार्द, सर जेम्स क्लार्क, आणि मिस्तर बर्च हीं आहेत. आमचे हुजेरी, कर्नल फिप्स, आणि कर्नल गार्दन, हे ब्ल्याकईगल आगबोटीवर आहेत.

**शुक्रवार, आगस्त ता० ३ री, सन १८४९.**

आज दिशा धुंद होत्या व हवा अतिशय ठबाऱ्याची होती. अशीच नेहमी ऐर्लेंदांतील हवा असते. आठ वाजतां आमच्या सन्मानार्थ गलबता-

वरील तोफांची सरबत्ती झाली. आमच्या जवळील ग्यांजीस (गंगा) आणि हॉग ह्या दोहों गलबतांतून फारच मोठा तोफांचा आवाज झाला. हें बंदर मोठें आहे आणि ह्यांत पुष्कळ बेटें आहेत, त्यांपैकीं एक फारच मोठें आहे. सैक ऐलंद नांवाचें बेट आमच्या समोरच आहे, त्यामध्यें एक फौजदारी तुरुंग आहे. त्याचे जवळच दुसरें एक बेट आहे, त्यांत माल ठेवण्याचा एक कोठा आहे. त्याच्या पलिकडे कोव् हा गांव आहे. हा गांव उंचवट्यावर असून सुंदर दिसतो. आमच्या स्वारीच्या ज्या दोन लढाऊ आगबोटी आहेत त्या नुकत्याच ह्या बंदरांत आल्या आहेत. एथला आदमिरल (दिकसन नांवाचा) आणि ह्या बंदरांतल्या गलबतांचे कपतान हे सलाम करण्याकरितां आमच्या गलबतावर आले. त्याच्या नंतर लार्द बांदन (ह्या कौंतीचा लार्द लिफ्तेनंत), लार्द थामंद, कार्क एथील सैन्याचा सरदार, जो जनरल तर्नर, हे मुजरे करण्यास आले. आलबर्त्त साहेब किनाऱ्यावर गेले आणि मी कांहीं लिहीत आणि चित्रें काढीत बसलें. आलबर्त्त हे फराळाचे पूर्वींच माघारे आले, किनाऱ्यावर त्यानें गरीब लोकांच्या कांहीं झोंपड्या जाऊन पाहिल्या होत्या.

दोन वाजतां विक्तोरिया आणि आलबर्त्त ह्या गलबतांतून उतरून आह्मी आपल्या सर्व मंडळी बरोबर फेरी आगबोटीवर गेलों; हिच्या सभोंवतीं पुष्कळ होड्या होत्या. पहिल्यानें आह्मी सर्व बंदरभर फिरते वेळेस सर्व प्रकारच्या गलबतांनीं व आगबोटींनीं व लहान बंदरबोटींनीं सलामी केली. नंतर आह्मी कोव् बंदरीं गेलों आणि उतरण्याचे जागीं नांगर टाकला. ही जागा फार सुशोभित केली होती आणि लोकही पुष्कळ जमले होते. गलबतांची व बंदरबोटींची तर एकच धूम होऊन गेली होती. नंतर आह्मांस पुष्कळ लोकांनीं मानपत्रें दिलीं. त्यांपैकीं एथल्या लोकांचे प्रतिनिधि मिस्तर रोश आणि मिस्तर पोवर, व रोमन क्याथलिक लोकांचे पाद्री आणि प्रोतेस्तंत लोकांचे पाद्री आणि यातक्लब नामक मंडळीचे सभासद वगैरे होते.

ऐलॅंदामध्यें ज्या जागीं मी पहिल्यानें उतरलें, तें हेंच गांव असल्यामुळें त्याला माझे सन्मानार्थ क्वीन्स तौन (राणीचें गांव) असें ह्मणण्यास परवानगी देऊन लोकांच्या आनंदाचा भंग न व्हावा ह्मणून मी

किनाऱ्यावर उतरलें, ते वेळेस तोफा सुटण्याची एकच गर्दी झाली, आणि लोकांनीं मोठ्या आवेशानें जयजयकार केला. ज्या मंडपांत मी गेलें होतें त्याच्या जवळच तोफखाना असल्यामुळें तोफांच्या आवाजानें तो मंडप दणदणून गेला. नंतर लागलींच आह्मी गलबतावर फिरून बसून ली नदींतून कार्क शहराकडे चालते झालों. ह्या नदीच्या बाजूंचा देखावा फार सुंदर आहे, झाडी तर गर्द लागून गेली आहे, हें पाहून मला तामर नदीचें स्मरण झालें. रस्त्यानें जातांना मनोरंजक जागा आह्मांस लागल्या त्यांपैकीं मंक्सतौन नामें श्री स्नानाची जागा आहे ती प्रथमतः आह्मास लागली; नंतर ब्ल्याकराक क्यासल (किल्ला) हा लागला. ह्या ठिकाणीं कोळ्यांनी एक सामन मासा व एक मानपत्र आह्मांस दिलें, तें घेण्याकरितां एथें आह्मांस कांहीं वेळ थांबावें लागलें.

शहराच्या जवळ गेलों त्यावेळीं पुष्कळ लोक गांवांत जातांना दिसले. कित्येक पायीं, कित्येक घोड्यांवरून, कित्येक रथांतून जात होते. कार्क शहर एथें पोहोंचल्यावर फेरी आगबोटीस पुनः खुंटविलें; नंतर आह्मांस सर्व मानपत्रें आगबोटींतच मिळालीं. त्यांपैकीं पहिल्यानें मेयर आणि कार्पोरेशन ह्यांजपासून मिळालें. (ह्या मेयरास मी त्याच वेळेस नैतची पदवी दिली.) नंतर प्रातेस्तंत धर्माधिकारी व प्रातेस्तंत पाद्री ह्यांजपासून; मग रोमन क्याथलिक धर्माधिकारी व रोमन क्याथलिक पाद्री ह्यांजपासून; पुढें त्या प्रांतचे लार्ड लिफ्तेनंत व नाझर व दुसरे लोक ह्यांज पासून आह्मांस मानपत्रें मिळालीं. तेथील कोडतांतील दोन जज्ज जरी कोर्टाचें काम चालू होतें, तरी ते कोर्टाच्या पोषाखासहित आह्मां कडेस आगबोटीवर आले. मानपत्र देण्याघेण्याचें सर्व काम आटोपल्यावर आह्मी आगबोटीवरून उतरलों, आणि लार्ड बांदन ह्यांची गाडी आह्माकरितां तयार होती तिज-मध्यें जाऊन बसलों. बाया आमच्या बराबर गाडींत बसल्या व लार्ड बांदन आणि जनरल हे गाडीच्या दोहों बाजूंस घोड्यावर होते. मेयर साहेब (गांवचा अधिकारी) पुढें चालले होते, तसेच पुष्कळ लोक गाड्यांतून व घोड्यांवरून आमच्या मागून आले, ह्यांत लार्ड लिस्तोवल होते. बारावी भालेवाल्यांची पलटन आमच्या बरोबर होती. गांवांतून रस्त्यानें पेनशनवाले शिपाई आणि पायदळ दोन्ही बाजूनीं उभें केलें होतें.

गावांत फिरण्याचा जो थाट झाला त्याचें वर्णन माझ्यानें करवत नाहीं. फिरण्यास सवादोन तास लागले, इतक्यावरूनच कसा काय थाट झाला असावा हें ध्यानांत येईल. आह्मी मुख्य बिदी सर्व पाहिल्या, आणि कांहींतून तर दोनदां गेलों. त्यांत लोकांची फारच दाटी होती. रस्ते फुलांनीं सुशोभित केले होते, आणि ठिकठिकाणीं आनंदसूचक कमानी केल्या होत्या. उष्णता व धुरळा हीं फार होतीं. एथें नवीन कालेज बांधीत आहेत त्याच्या जवळून गेलों; हें कालेज पार्लमेंत सभेचा जो चार कालेजें असावीत असा ठराव आहे त्यांपैकीं हें एक आहे. लोकांनीं आमचें आगत स्वागत मोठ्या उत्साहानें केलें. सर्व गोष्टींची पूर्ण तयारी फार उत्तम ठेविली होती आणि सर्व गोष्टींचा रंग झाला. कार्क हें शहर इंग्लिश शहराप्रमाणें नदिसतां एखाद्या परकीय शहराप्रमाणें दिसतें. एथील लोकांचा थाट जमला ह्मणजे लोक बडेबडे आहेत तरीं गुळाचे गणेश; कित्येक इकडे तिकडे धांवतात, कित्येक हांसतात, कित्येक बोलतात, कित्येक आरोळ्या मारतात. एथील स्त्रियांचें सौंदर्य मोठें वर्णनीय आहे; त्यांचे केंस व डोळे अगदीं काळे भोर आहेत; दांतही सुंदर आहेत. बहुतकरून तीन बायकांत एक सुंदर आहेच, त्यांत कांहीं बायका तर फारच सुंदर आहेत. त्या बानेट (टोप्या) घालीत नाहींत, परंतु लांब निळ्या रंगाचे झगे नेसतात. एथील पुरुषाचा पोषाग फारच भिकार असतो. पुष्कळ लोकांनीं निळ्या रंगाचे अंगरखे, आंखूड सुरवारी, आणि निळे पायमोजे घातले होते.

ज्या ठिकाणीं आह्मी उतरलों होतों त्याच ठिकाणीं पुनः आगबोटीवर चढलों, आणि जसे गेलों होतों तसेच माघारे आलों.

### मुक्काम किंगस्तौन बंदर, दब्लिन आखात.

### रविवार, माहे आगस्त ता० ५ वी, सन १८४९.

एथें आह्मी सुरक्षित पोहोंचलों. आतां मी आपली हकीकत लिहिण्याचें चालवितें. अडीच तास पावेतों समुद्र जरासा खवळला होता, तरी त्यापासून फारसा त्रास झाला नाहीं. काल चार वाजण्यास वीस

मिनिटें कमी होतीं तेव्हां वातर फोर्द बंदरामध्यें येऊन आह्मी पोहोंचलों. ह्या बंदरांत शिरतांना उजवे बाजूस पुष्कळ खडक लागतात. परंतु डावे बाजूस बंदर सपाट आहे. जरा पुढें गेलें ह्मणजे जमीन दोंही बाजूंस उंच होत गेलेली दिसते. आह्मांस दंकानन फोर्त ह्मणून एक लहानसा किल्ला आहे, तो लागला. बाय्नची लढाई झाल्या नंतर दुसरा जेम्स राजा एथेंच गलबतांत बसून गेला होता. त्या किल्याच्या तोफांची पन्नास वर्षे सलामी झाली नाहीं. त्याच्या पुढें जवळच दोहोंबाजूंस दोन खेडीं आहेत त्यांच्या मध्यें आह्मीं नांगर टाकिला. त्या प्रत्येक खेड्यांत एक एक देवालय आहे, हीं उंच खडकावर असल्यामुळें सुंदर दिसतात. आमच्या डावे बाजूस मासे धरण्याची जागा होती, तीस पासेज ह्मणतात, तेथें उत्तम सामन मासे सांपडतात; त्यांपैकीं एक आह्मांस जेवणास उत्तम मासा मिळाला. आलबर्त्त साहेबांनीं वातरफोर्द एथें फेरी आगबोटींतून मुलांसहित जाण्याचा बेत केला. मला भोवळ येत होती आणि थकलें होतें ह्मणून मी एथेंच नकाशे काढीत राहिलें. वातरफोर्द पुढें दाहा मैलांवर ह्याच नदीचे कांठीं आहे. आलबर्त्त साहेब सात वाजतां परत आले, परंतु कोठेंही उतरले नव्हते.

## मुक्काम वैसरीगल लाज (राजप्रतिनिधीचा वाडा).
## फिनिक्स पार्क, सोमवार, आगस्त ता० ६ वी, सन १८४९.

हा वाडा मोठा रमणीय आहे. ह्याच्या खिडकींतून विक्लोहिल्स नांवाचे पर्वत दिसतात. ह्यांचा देखावा फार सुंदर दिसतो. आतां कालची राहिलेली हकीकत सांगतें. साडेआठ वाजतां किंगस्तौन बंदर सोडिलें. तीन तास पावेतों समुद्र एकसारखा खवळला होता आणि मला व बापड्या मुलांस समुद्र पुष्कळ लागला. वेक्सफोर्द बंदरा मधील तसकर खडक मागें टाकल्या नंतर समुद्र बरी शांत होऊं लागला, पुढें पुढें तो अगदींच शांत झाला. सायंकाळ मोठी आनंदकारक होती. आर्क्लोहेद हें भूशिर मागें टाकल्या नंतर विक्लोहिल्स नांवाचे डोंगर आह्मांस दिसूं लागले, ते फार सुंदर आहेत. शुगरलोफ आणि कारिक नांवांचे पर्वत आह्मांस दिसले, ह्यांच्या समोर लहान लहान टेंकड्या आहेत आणि

पुष्कळ झाडी आहे. साडेसहा वाजतां डब्लिन बे हें दिसायाला लागलें. स्तांबोली आणि स्फिंक्स हीं दोन वाफेचीं गलबतें आह्मांस सामोरीं आलीं होतीं तीं भेटलीं. पुढें त्रैदेंत आणि द्रागन हीं दोन लढाऊ वाफेचीं गलबतें बंदरांत होतीं तीं भेटलीं. किंगस्तौन बंदरामध्यें ह्या सर्व तारवां सहित आह्मी समारंभानें गेलों, तेथें हजारों लोक आह्मी आलों ह्मणून मोठ्या आनंदाने जयजयकार करूं लागले. हें बंदर फार भव्य आहे, आणि ह्यांत सर्व प्रकारचीं गलबतें होतीं. धक्क्यावर लोकांची अतिशय गर्दी जमली होती, तो एक मोठा सुंदर व मनोवेधक देखावा दिसत होता. आह्मी बंदरांत आलों तेवेळेस सात वाजले होते. तेव्हां सूर्य मावळत असतां त्याचें कोवळें कोंवळें ऊन जमिनीवर व मोठमोठाल्या इमारतीवर पडून मोठा एक मनोरंजक देखावा बनला होता. लागलीच आमच्या सभोंवतीं पुष्कळ होड्या जमल्या. लोकांचा उत्साह तर सांगतां येत नाहीं इतका होता.

आह्मी न्याहारी करीत असतांना गलबत धक्क्याशीं आणिलें, तेथें घोंडेस्वार उभे केले होते. लार्द आणि लेदी क्लारेंदन, जार्ज (ड्यूक आफ् केंब्रिज), लार्द लांद्सदौन, व लार्द क्लनरीकार्द, मुख्य धर्माधिकारी, व अर्चबिशप आफ् दब्लिन आणि इतर पुष्कळ लोक आमचे गलबतांवर आले. शेरीफ ( नाझर ) आणि प्रांतांतील कित्येक सभ्य गृहस्थ ह्यांनीं आह्मांस मानपत्र दिलें. दाहा वाजतांच गलबतांतून उतरलों. आलबर्त्त साहेब मला घेऊन मुलांसहित पुढें चालले, आणि मागून बाकीची मंडळी आली. आह्मांस पाहण्याकरितां हजारों लोक जमले होते, आणि ते मोठा आनंदघोष करीत होते. गलबतांतून सलामीच्या तोफा सुटत होत्या, बेणबाजेही वाजत होते, हें सर्व पाहून आह्मी चकित झालों. ज्या रस्त्यानें आह्मांस आगगाडीकडे जावयाचें होतें त्या रस्त्यावर छत दिलें होतें. रस्त्यांत पुरुष आणि स्त्रिया ह्यांची एकच गर्दी झाली होती, आणि तीं रस्त्यावर फुलें पसरीत होतीं. आग गाडींत आह्मी मुलांसहवर्त्तमान बसलों. आमच्या बराबर लार्द व लेदी क्लारेंनदन व तीन बाया होत्या. सुमारें पावतासात दब्लिनच्या स्तेशनावर जाऊन पोहोंचलों. एथें आह्माकरितां आमच्या गाड्या व हांकणारे आसकातचा पोषाग घालून तयार होते, गाडींत आह्मी बसून शहरा-

कडे चालते झालों. दोन मोठीं मुलें आमच्या जवळ होतीं आणि दुसरीं दोन लहान दुसऱ्या गाडींत त्या तिघी बायां जवळ होतीं. ऐर्लेंदांतील सेनाधिपति सर एदवर्द ब्लेकनी हे आमच्या गाडीच्या एका बाजूस घोड्या वर होते व दुसऱ्या बाजूस जार्ज साहेब, ड्यूक आफ् केंब्रिज, हे होते. आमच्या बरोबर सतरावी भालेवाल्यांची पलटन होती व कराबीनवालेही होते.

रस्त्यानें लोकांचे थवेचे थवे जमले होते, ते सर्व मोठ्या उत्साहांत होते. इतकी गर्दी झाली होती तरी व्यवस्था फार चांगली ठेविली होती, ह्मणून तो फारच विलक्षण देखावा दिसत होता. ठिकठिकाणीं पलटणी उभ्या केल्या होत्या, अंतरा अंतरावर बेणबाजे वाजत होते, आह्मांस पाहून लोक टोप्या व रुमाल हालवीत आणि एकदम आनंदानें जयजयकार करीत. ह्या देशांत बंड होऊनही फार दिवस लोटले नव्हते ह्मणून ह्या सर्व गोष्टींनीं हा देखावा कधीं विसरूं नयेसें केलें.

दब्लिन हें शहर फार सुंदर आहे; ह्यांतील साकिल स्त्रीत नांवाची बीद आणि मेरिअन स्केर नांवाचा चौक हीं दोन प्रशस्त असून फार सुंदर आहेत. एथील ब्यांक (पेढी) व त्रिनिती कालेज (पाठशाळा) ह्या मोठ- मोठाल्या भव्य इमारती आहेत. गांवास वेशी नाहींत; परंतु आह्मी येणार ह्मणून ह्या प्रसंगाकरितां मुद्दाम कमानीचे दरवाजे केले होते, एथें आह्मी थांबलों. मेयर ह्यानें आह्मांस शहरच्या किल्या नजर केल्या आणि प्रसं- गोचित भाषण केलें. शेवटच्या दरवाज्या जवळ माझे ओटींत एक लहान खबूतर घातलें तें जिवंत व पाळलेलें होतें, त्याच्या मानेला जैतूनच्या झाडाची फांदी बांधिली होती. त्या वेळेस ऊन फार पडलें होतें आणि धूळही फार उडत होती. फिनिक्स पार्क नांवाच्या रमण्यांत बारा वाजतां येऊन आह्मी पोहोंचलों. हा रमणा फार विस्तीर्ण आहे. दरवाज्या जवळ गेलों तेवेळेस लार्ड आणि लेदी क्लारेंदन आणि त्यांच्या घरची सर्व मंडळी आह्मांस सामोरी आली. हा मोठा सोईवार व मजेचा वाडा आहे. ह्याच्या समोर लेदी नार्मनबी हिनें केलेला एक सुंदर बाग आहे. हा वाडा पाहून आह्मांस क्लेरमंतची आठवण झाली. ह्या वाड्यांतून सर्व रमणा आणि विक्लो प्रांतांतील डोंगर हे स्पष्ट दिसतात. एथें आह्मी सुखांत आहों व खोल्याही उत्तम आहेत.

**मंगळवार, आगस्त ता० ७ वी, सन १८४९.**

आमच्या बरोबरच्या दोन बाया घेऊन लार्द क्लारेंदनच्या गाडींतून दब्लिन शहरांत आह्मी गेलों. गृहस्थ मंडळी आमच्या मागाहून आली. आमच्या बरोबर शिपायी प्यादे नव्हते. लोकांस उत्साह फार झाला, त्यांनीं पुष्कळ जयजयकार केला. पहिल्यानें आह्मी ब्यांकेमध्यें गेलों, तेथील देरेक्तर लोकांनीं सामोरें येऊन आमचें आगत स्वागत केलें. पुढें छापखान्याकडे गेलों. तेथून जुन्या हौस आफ् लार्दस व हौस आफ् कामन्स ह्या सभांच्या इमारती आह्मीं पाहिल्या; कां तर ज्या वाड्यांत पूर्वी पार्लमेंत सभा भरत होती तेथें आतां ब्यांक (पेढी) आहे. एथून आह्मीं मादल स्कूल पाहिलें. तेथें आर्चबिशप आफ् दब्लिन, रोमन क्याथलिक आर्चबिशप मरे, आणि शाळेकडील इतर गृहस्थ आह्मांस सामोरे आले होते. आर्चबिशप ८० वर्षांचे वृद्ध असून दिसण्यांत भव्य आहेत. नंतर लहान लेंकरांच्या, मुलांच्या व मुलींच्या शाळा आह्मीं पाहिल्या. मुलांच्या शाळेंतील एका वर्गाची आह्मीं तोंडच्या हिशेबांत आणि दुसऱ्या कितीएक कठीण विषयांत परीक्षा घेतली. मुलांनीं फार समर्पक उत्तरें दिलीं. ह्या शाळेंत सर्व मतांचे लोकांस येण्यास मोकळीक आहे. ज्याला त्याला ज्याचे त्याचे धर्माप्रमाणें धर्मोपदेश करितात; परंतु हें आईबापांच्या इच्छेवर आहे, तथापि शुभवर्त्तमानांतील तत्वें, प्रीति, व दया हीं मात्र सर्वांनीं शिकलींच पाहिजेत. ही चाल खरोखर ख्रिस्तीधर्मास अनुसरून आहे, आणि अशीच चोहोंकडे असावी. ह्या शाळांत सुमारें हजार मुलें दर वर्षास शिकून तयार होतात. पैकीं तीनशें पंतोजी आणि शिकविणाऱ्या स्त्रिया तयार होतात. पुढें त्रिनिती कालेज, ऐरिश लोकांची युनिव्हरसिती आहे, ती पाहण्यास गेलों. हिचे नियम सार्वजनिक उपयोगास अनुसरून नाहींत; तरी हिजमध्यें रोमन क्याथलिक लोकांना घेतात. एथील सेक्रतरी दाक्तर ताद आहेत. हे गृहस्थ मोठे विद्वान असून ऐरिश भाषेंत निष्णात आहेत. ह्यांनीं प्राचीन काळच्या जुन्या वस्तु आणि लेख आह्मांस दाखविले. त्यांत सेंत ( साधू ) कोलंबा ह्याचा ग्रंथ दाखविला. त्यांत आह्मी आपलीं नांवें लिहिलीं. ओब्रयन राजाची सारंगी दाखविली. हिच्या नमुन्यावरून ऐरिश सरकारी चिन्ह घेतलें आहे असें लोक सांगतात.

एथील ग्रंथालय केंब्रिज एथील त्रिनिती कालेजांतील ग्रंथालयाप्रमाणें मोठें आहे. हें सर्व पाहणें झाल्यानंतर आह्मी घरीं जाण्यास निघालों. रस्त्यानें दाटी फार होती. राजभक्तीचीं चिन्हें लोकांमध्यें पुष्कळ दिसून आलीं. मधून मधून थोडा पाऊसही लागला. घरीं सुमारें एक वाजल्यावर आलों. फराळ आटोपल्यावर आलबर्त्त साहेब पुनः दब्लिन एथें गेले. मी कांहीं पत्रें लिहून वाचित बसलें. नंतर मुलांचे धडे घेतले.

पांच वाजतां किलमेन्हाम इस्पिताळ एथून जवळच आहे तें पाहण्यास गेलों. लार्ड क्लारेंदन आणि बाया मंडळी माझ्या बरोबर गाडींत बसली. आलबर्त्त साहेब व इतर गृहस्थ मंडळी घोड्यावरून चालली. सर एदवर्द ब्लेकनी व त्यांचे परिचारक गृहस्थ, आणि जार्ज ड्यूक आफ् केंब्रिज हे आह्मांस एथें सामोरे आले. एथें आह्मी ह्मातारे पेनशनर लोक व देवालय पाहिलें. एथें त्यांना चेलसी एथील पेनशनर लोकांप्रमाणेंच एक जेवण्या करितां दिवाणखाना आहे. नंतर सर एदवर्दाच्या खासगी खोल्या पाहिल्या. नंतर दब्लिन शहराचे मुख्य भाग पाहिले. कालेज ग्रीन ( पाठशाळेचें मैदान) व स्तीफन्स ग्रीन हीं स्थानें पाहिलीं. कालेज ग्रीन एथें तिसऱ्या विलि- यम राजाचा प्रसिद्ध पुतळा आहे. स्तीफन्स ग्रीन जवळील धी फोर कोर्त्स ही एक मोठी सुंदर इमारत आहे. इकडे आह्मी येणार अशी जरी बातमी नव्हती, तरी कित्येक ठिकाणीं फार दाटी होती. रात्रीं सात वाजण्याचे पूर्वी घरीं आलों. जेवणाचा समारंभ फार मोठा होता. जेवण झाल्या नंतर सुमारें दोन तीनशें वर मनुष्यें आलीं, त्यांत बहुतकरून ऐरिशचे बडे लोक व गृहस्थ असे होते, नंतर बाल (नाचाचा समारंभ) झाला.

### बुधवार, आगस्त ता० ८ वी, सन १८४९.

एक वाजावयास वीस मिनिटें कमी होतीं तेव्हां दब्लिन शहराकडे जाण्यास निघालों. मी व दुसऱ्या बाया माणसांनीं संध्याकाळचा पोषाग केला. पुरुषांनीं लष्करी पोषाग केला. आह्मी नीट दब्लिन क्यासल इकडे गाड्या हांकल्या. सेंत जेम्स वाड्यांतील दरबाराप्रमाणें एथें दरबार झालें. ह्या वाड्यांतील जिना आणि राजतक्ताची जागा अगदीं राजमंदिरा प्रमाणेंच आहे. एथें मी राजतक्तावर बसल्या नंतर लार्ड मेयर व

कार्पोरेशन, पाठशाळेचे लोक, आर्चबिशप व बिशप व रोमन क्याथलिक व प्रातस्तेंत, प्रेस्बिटीरिअन आणि क्वेकर लोक ह्या सर्वांनीं मला मानपत्रें दिलीं, त्यांचा मी स्वीकार केला. मग आलबर्त्त साहेबांनाही त्यांनीं मानपत्रें दिलीं. मानपत्रें देण्याचा समारंभ आटोपल्या नंतर मोठें दरबार झालें, तें आटोपे पर्यंत सहा वाजले. दोन हजार लोक दरबारास आले होते.

## गुरुवार, आगस्त ता० ९ वी, सन १८४९.

फिनिक्स पार्क नांवाच्या रमण्यांत एक मोठी शिपाई लोकांची रवी झाली. पोलीस शिपाई धरून एकंदर सहा हजार एकशें साठ शिपाई होते. संध्याकाळीं आह्मी दोघेंच एकांतीं जेवलों आणि साडेआठ वाजतां दब्लिन एथें खासगी भेटीच्या सभेकरितां गेलों. एथें भेट घेण्याचा संप्रदाय संध्याकाळचा आहे. मला वाटतें कीं, सुमारें दोन तीन हजार लोक आह्मांस भेटण्यास आले असावेत. एक हजार सहाशें तर बाया आल्या. हा भेटीचा समारंभ आटोपल्या नंतर आह्मी सेंतपात्रिकचा हाल आणि इतर खोल्यांमधून चालत गेलों; लोकांची गर्दी फार झाली होती. घरीं रात्रीं साडेबारा वाजतां परत आलों, तरी रस्त्यानें लोकांची दाटी होतीच. लोकांनीं शहरांत दिव्यांचा लखलखाट केला होता.

## शुक्रवार, आगस्त ता० १० वी, सन १८४९.

आज ड्यूक आफ् लिन्स्तरचा वाडा कार्तन तो पाहण्यास मंडळी सहित पावणेबारा वाजतां निघालों. लार्द आणि लेदी क्लेरेंदन हीं आमच्या बरोबरच गाडींत होतीं. आह्मी मिस्तर व्हैतच्या वुदलंद्स नांवाच्या जाग्यांतून गेलों त्यांत लिंबाचीं सुंदर झाडें आहेत. मेनूथच्या प्रिपारतरी कालेजावरून गेलों; आणि कार्तना जवळ मेनूथ एथील कित्येक विद्यार्थी भेटले. कार्तनचा रमणा फार सुंदर आहे, तेथें आह्मी एक वाजल्या नंतर पोहोंचलों. एथें ड्यूक आणि दचेस आफ् लिन्स्तर, लार्द व लेदी किल्देर, मिस्तर व लेदी सि. रेपतन आणि त्यांचे दोन मुलगे इतकेजण आह्मांस सामोरे आले. आह्मी बागांत गेलों, तेथें सर्व मंडळी जमली होती, आणि दोन बेंडबाजे

वाजत होते; हा बाग फार सुंदर आहे. ह्याची मांडणूक फ्रेंच बागाप्रमाणें आहे, आणि ह्यांत ऐरिश यू नांवाच्या झाडांच्या रांगा आहेत. आह्मी बागांतून दोन वेळा फिरलों. ड्यूकानें माझा हात धरिला आणि आलबर्त्तानीं दचेसचा (ड्यूकाच्या पत्नीचा) हात धरिला. हे ड्यूक मोठे ममताळू आणि चांगले गृहस्थ आहेत.

फराळ आटोपल्या नंतर आह्मी बाहेर पडलों व कांहीं लोकांस जोडी जोडीनें नाचतांना पाहिलें, तें मोठें मौजेचें होतें. ऐरिश लोकांच्या आणि स्काच लोकांच्या रील नांवाच्या नाचांत फार फरक आहे; ऐरिश लोकांचा तितक्या शिताबीचा नाहीं व ह्यांतील पावलें टाकण्याची ढब ही कांहीं निराळी आहे; परंतु फार चमत्कारिक आहे. पुरुषांचा पोषाग फार गरीब रीतीचा होता. त्यांनीं जाड डगले घातले होते व बायकांनीं शाली पांघरल्या होत्या. ह्या मंडळीमध्यें एक मनुष्य ऐरिश लोकांचा हुबेहुब मासला होता, त्यानें कानावर टोपी ठेविली होती. कित्येक लोकांनीं निळ्या रंगाचे डगले, चोळणे आणि निळ्या रंगाचे पायमोजे घातले होते. एथें चिंध्या पांघरलेले तीन झातारे ब्यागपैपवाले आपलें वाद्य वाजवीत होते, ऐरिश ब्यागपैप स्काच ब्यागपैपाहून निराळें आहे. हें फार नाजुक आहे, हें तोंडानें वाजवीत नाहींत, परंतु लहानशा भात्यानें वारा घालून वाजवितात. नंतर मौजेनें फिरण्याच्या ज्या जागा आहेत त्यांच्या भोंवती फिरून ड्यूक आणि दचेस ह्यां सहित गाडींत बसलों. आमच्या बरोबरच्या बाया व पुरुष मंडळी हीं एका मोठ्या गाडींत बसलीं. गांवकरी लोक आमचे मागून धांवत आले. त्यांपैकीं कित्येक घोड्यावरून, कित्येक गाडींतुन, कित्येक पायीं आले; परंतु ते फारच सभ्य रीतीनें वागले. एथील ड्यूक लोकांवर फार प्रीति करीत असल्या कारणानें ते बहुत लोकांस प्रिय झाले आहेत. त्यांना हुकूम करण्याचा उशीर, कीं तो लागलाच बजावला जातो. उष्मा फार होत होता, तरी लोक सर्व वाटभर धांवत होते. त्यांनीं अंगांत लोंकरीचीं जाड डगलीं घातलीं होतीं. ते असेच डगले नेहमी घालतात असें दिसतें. रमण्यांतून आह्मी एका स्थळीं गेलों तेथून विक्लो प्रांतांतील डोंगर फार स्पष्ट दिसत होते. पुढें आह्मांस एक नवीन रस्ता लागला. तो एका खिंडींतून खडक फोडून काढलेला होता. त्या खिंडीमध्यें सुंदर झाडें होतीं; आणि तीं

झाडें पाण्याच्या आश्रयाला खडकांत होतीं. एथें आह्मी गाडींतून उतरलों; आणि एक लांकडी पूल लागतो तो टाकल्यानंतर एक लहानशी झोंपडी लागते, ती दचेसने शिंपांनीं फार सुशोभित केली होती, तींत पायीं गेलों. पुनः आह्मी सहल करण्याच्या ज्या गाडींत बसलों ती दुहेरी असून तिला चार चाकें होतीं. आमची पुष्कळ मंडळी तींत मावली. आलबर्त्त साहेब आणि ड्यूक ह्यांचे मध्यें मी बसलें. दचेस, लेदी जोसलीन, लार्ड क्लारेंदन आणि लेदी वातरफोर्द हीं दुसऱ्या बाजूस बसलीं होतीं; बार्ब पाठीमागें बसले होते; आणि गाडीवानाच्या दोहीं बाजूंस आमचे दोघे हकोरी होते.

ड्यूकाच्या घरीं आल्यानंतर लागलीच आह्मी त्यांची रजा घेतली व आल्या रस्त्यानें न जातां दुसरे रस्त्यानें फीनिक्स पार्ककडे परतलों. हा रस्ता लिफी नदीवरून व मिस्तर कोलसनच्या रमण्यावरून जातो. ह्या रमण्यांत बीच नांवाचीं झाडें अति उत्तम आहेत, त्यांच्या फांद्या अगदीं जमिनीस लागल्या आहेत; इतकीं उत्तम बीच झाडें मी कधींच पाहिलीं नव्हतीं. पुढें कांहीं अंतरावर सिकामोर हीं गोजिरवाणीं झाडें आह्मांस नदीचे कांठीं लागलीं. लुकन खेड्यांत आह्मी गेलों तें लारल व बेज ह्या झाडांच्या कमानीनीं आणि इतर कांहीं गोष्टींनीं सुशोभित केलें होतें, पुढें कांहीं स्त्राबेरी झाडांचे वाफे लागले. हीं झाडें पाहण्या सारखीं आहेत आणि दब्लिन एथून पुष्कळ लोक त्यांचीं फळें खावयास येतात. हे वाफे फार उंच असतात व त्यांखालीं लोकांस बसण्याकरितां चांगल्या जागा केलेल्या असतात. पांच वाजल्या नंतर आह्मी घरीं आलों.

### विक्तोरिआ आणि आलबर्त्त नामक गलबत,

### लाखरयन नामक सरोवर,

### रविवार, आगस्त ता० १२ वी, सन १८४९.

समुद्र खवळला असल्यामुळें फार त्रास भोगून आह्मी एथें लवकर येऊन पोहोंचलों. आतां मी शुक्रवारची हकिकत सांगतें:—फीनिक्सपार्क आह्मी सहा वाजतां सोडलें, तेथें आमचा काळ फार आनंदांत गेला.

लार्द क्लारेंदन व आमचीं दोन मोठीं मुलें हीं आमच्या गाडींत होतीं. आह्मी दब्लिनच्या रेलवे स्तेशनावर गेलों तेव्हां आमच्या बरोबर स्वार होते. शहरांत लोकांची फार गर्दी होती व ते मोठ्या उत्साहांत होते. बार्ज साहेब आह्मांस एथें भेटले; ते आणि लार्द व लेदी क्लारेंदन, लार्द लांदस्दौन व आमच्या बरोबरच्या बाया हीं सर्व आमच्या बरोबर गाडींत आलीं. किंगस्तौन एथें फार जलद येऊन पोहोंचलों. तेथील लोकांची गर्दी व उत्साह मागल्या प्रमाणेंच होता. नंतर लागलीच गलबतांत बसलों, तेव्हां हजारों लोकांनीं जयजयकार केला आणि सर्व गलबतांनीं तोफा सोडिल्या. अशा राजभक्त लोकांना मी आपला रुमाल हालवून त्यांचा राजभक्तीचा स्वीकार केला असें दर्शविलें. आह्मांस हौथ आणि ऐर्लंदस् आय हीं स्थळें लवकरच लागलीं. रात्रीं समुद्र शांत नव्हता, आणि अभ्र व पाऊस आला होता व वादळ होईल अशी आह्मांस भीति वाटत होती; तरी आमचें गलबत स्थिर होतें.

### शनवार, आगस्त ता० ११ वी, सन १८४९.

बेलफास्त बंदरांत प्रातःकाळचे चार वाजतां येऊन पोहोंचलों. वारा फारच सुटला होता; सकाळीं हवा फार वाईट पडली होती व वादळ सुटलें होतें. रात्रीं समुद्र शांत होता तरी निर्वात नसल्यानें आह्मांस चांगली झोंप लागली नाहीं. पुढें लवकरच वारा जास्त जास्त सुटून मोठ्या झपाट्यानें वाहूं लागला; व बेलफास्त एथून आमच्या बेताप्रमाणें आह्मांस स्कातलंदास जातां येईल किंवा नाहीं असा आह्मांस संशय वाटला.

मेअर साहेब, व सेनाधिपति ( बेनब्रिग ) हे आह्मांस गलबतावर न्याहारी झाल्यावर येऊन भेटले.

नंतर गलबत सोडून फेरी आगबोटींत बसण्याकरितां आह्मी सर्व मंडळी सहवर्त्तमान एका होडींत बसलों. जरी आगबोटीवर जाऊन बसण्यास दोन मिनिटें मात्र लागलीं तरी मोठ मोठाल्या लाटा येऊन होडी वर-खालीं झाल्यामुळें आह्मांस अतिशय त्रास झाला. वारा इतका झपाट्यानें सुटला होता कीं, पाण्याचे तुषार न लागावे ह्मणून आह्मास आगबोटीच्या खोलींत बसावें लागलें. होलिवुद आणि कारिक्फर्गस ह्यांच्या मधून

आह्मी गेलों, तिसरा विलियम राजा पहिल्यानें कारिक्‌फर्गस एथेंच उतरला होता अशी प्रसिद्धि आहे. बेलफास्त एथें आह्मी अर्ध्या तासांत येऊन पोहोंचलों, तेव्हां आकाश निरभ्र होऊन सूर्य प्रकाशूं लागला.

आह्मी आपली आगबोट अगदीं धक्क्या जवळ लाविली, तेथें उतरण्याची चांगली सोय केली होती व हजारों लोक जमले होते. लार्ड लंदनदेरी आगबोटीवर आले व मानपत्रें घेऊन पुष्कळ दुसरेही लोक आले होते. त्यांत मेअर (ह्यास मी ह्यावेळेस नैतची पदवी दिली), दौन एथील प्रातेस्तंत बिशप व त्याचे हाताखालचे पाद्री लोक, क्याथलिक बिशप देनविर (हे मोठे उत्तम स्वभावाचे व नम्र मनुष्य आहेत), ह्या प्रांताचे नाझर व प्रतिनिधि आणि लार्ड दानिगल (बेलफास्त हें शहर बहुतेक ह्यांचेंच आहे,) नवीन पाठ शाळेंतील दाक्तर हेनरी, आणि प्रेसबीतीरिअन लोक (त्यांची संख्या एथें पुष्कळ आहे) हे होते. लेदी लंदनदेरी आणि त्यांची मुलगी हीं दोघें-हीं आमच्या आगबोटीवर आलीं. धक्यावर उतरण्यासाठीं फळ्या वैगेरे जुळून जें कांहीं तयार केलें होतें तें फार मोठें झालें ह्मणून धक्यावर उतरण्यास उशीर झाला. मग दुसऱ्या फळ्या लावून उतरलों. उतरण्याच्या जागेवर बिछाईत घालून ती फार सुशोभित केली होती. लार्ड लंदनदेरीच्या गाडींत आह्मी त्या दोन बायां सहवर्त्तमान बसलों. व ते स्वतः आमच्या दोन चाकरांबरोबर गाडीच्या मागल्या भागावर बसले. त्या चाकरांचीं नांवें रेनविक आणि बिरबेज, ते दोघे मोठे धिप्पाड पुरुष आहेत; आणि हे तिघेही मोठ्या गैर सोईनें बसले असें मला वाटलें.

गांवांत चांगली आरास केली होती. कित्येक ठिकाणीं फुलें पसरलीं होतीं, कित्येक ठिकाणीं नकशीदार पडदे लाविले होते, सुंदर सुंदर उत्साहाच्या कमानी केल्या होत्या व सर्व सज्जांवर लोक दाट उभे होते; आमचें आगत स्वागत खरोखर मनःपूर्वक झालें. एथील लोक पुष्कळ प्रकारचे आहेत व एथील बायका सुंदर नाहींत.

"केद मिल्या फाल्ता" हें जें आवडतें वाक्य आहे तें पुष्कळ कमानींवर व ठिकठिकाणीं लिहिलें होतें हें मी वर सांगण्यास विसरलें. हें ऐरिश भाषेतलें वाक्य, ह्याचा अर्थ "लाखों वेळां आगत स्वागत" हा आहे. ऐरिश

भाषा गेलिक भाषे सारखीच आहे आणि प्राचीन काळचे ग्रंथ हींतच लिहिलेले आहेत, ह्मणून हीच मूळची ह्मणण्यास हरकत नाहीं. गेलिक भाषा पुष्कळ दिवसां पासून बोलतात तरी तिजमध्यें ग्रंथ गेल्या पन्नास वर्षां पासून मात्र लिहूं लागले आहेत. "लाखों वेळां आगत स्वागत" हे शब्द त्यांनीं वारंवार उच्चारिले आणि नानातऱ्हेनें लिहिले.

आमच्या गाडीच्या एका बाजूनें लार्द दानिगल आणि दुसऱ्या बाजूनें जनरल साहेब घोड्यावरून चालले. लिननहाल नांवाच्या इमारतींत ताग आणि जवस ह्यांचें कापड कसें करितात तें दाखविण्याचा कारखाना आहे तो पाहण्यास आह्मी थांबलों. लार्द दौनशायर आणि कित्येक दुसरे गृहस्थ सामोरे आले व ह्या इमारतीच्या सर्व भागांतून त्यांनीं आह्मांस फिरविलें. एथें आह्मी ताग आणि जवस ह्या पदार्थांचें कापड करण्याचे कृतीचे निरनिराळे पर्याय पाहिले. पहिल्यानें तागाचीं झाडें पाहिलीं, नंतर ताग पाण्यांत भिजवून ठेविलेला पाहिला, नंतर त्यापासून काढलेलें सूत आणि शेवटीं त्यांचे लिनन क्र्येंब्रिक इत्यादि सर्व प्रकारचें कापड पाहिलें. हा कारखाना पाहणें ही मोठी मौज आहे, कारण हा अगदीं पूर्ण दशेस आणिलेला आहे.

आह्मी पुनः गाड्यांत बसलों. ह्यावेळीं लार्द लंदनेदेरी पूर्वी प्रमाणें अडचणीच्या ठिकाणीं बसण्यास गेले नाहींत.

नंतर आह्मी बोतानिक गार्देन ( वनस्पतिविद्या शिकण्याचा बाग ) ह्याच्या मधून गेलों आणि तेथें जवळच एक नवीन पाठशाळा बांधिलेली होती तेथें थांबून खालीं उतरलों, ती अक्तोबर महिन्यांत सुरू होणार आहे. ही इमारत फार चांगली आहे. पुढें गांवांतून आह्मीं गाड्या नेल्या आणि गलबतांत बसण्याचे जागीं आलों. बेलफास्त हें फार सुंदर शहर आहे. एथील ब्यांक व एक्स्चेंज वगैरे इमारती फार चांगल्या आहेत. एथील लोक ह्यांस ऐर्लंदाचे लिवरपूल आणि मांचेस्तर असें ह्मणतात.

एथील पोलीस शिपायांविषयीं सांगण्यास मी विसरलें; हे फार उत्तम शिपाई आहेत; ह्यांत सर्व ऐरिश असून मुख्यत्वेंकरून रोमनक्याथलिक धर्माचे आहेत. हे एकंदर सर्व ऐर्लंदांत तेरा हजार आहेत. मागल्या वर्षी जें बंड झालें होतें त्यांत ह्यांपैकीं एक देखील सामील नव्हता.

लोकांचा आनंदघोष चालला असतां आह्मी विक्तोरिआ आणि आल-बर्त्त नामक गलबतावर साडेसहा वाजतां येऊन पोहोंचलों. वारा फार सपाट्यानें वाहत होता, ह्मणून आगबोटीच्या डुलण्यानें आह्मांस फार त्रास झाला. मग रात्रभर बंदरांतच राहून पहांटेस तीन चार वाजतां वारा कमी झाला तर निघून जाण्याचा बेत केला होता. सभोंवतालच्या किनाऱ्यावर आणि टेंकड्यांवर लोकांनीं आनंद सूचक अग्नि पेटविलेले आह्मांस दिसले.

## रविवार, आगस्त ता० १२ वी, सन १८४९.

सकाळीं पाहतें तों वारा पूर्वीप्रमाणेंच होता व तो कमी होण्याची आशा नव्हती ह्मणून आह्मी दोन वाजतां लाखरयन अथवा लामलाश-सरोवराकडे जाण्याचा बेत केला. लार्द अदाल्फस ह्यानीं साडेदाहा वाजतां प्रार्थनेचें पुस्तक वाचलें, तेव्हां माझीं दोन वडील मुलें हजीर होतीं.

माझ्या मनांत बर्ती ह्यास अर्ल आफ् दब्लिन करावा असें आलें, तेणें-करून त्या शहरास व देशास मान दिल्यासारखें होईल. ह्यास स्काच किताब जन्मापासून अनेक आहेत, तरी ऐरिश किताब कोणताच नाहीं. हे स्काच किताब स्कातलंदच्या गादीचे वारसास मिळतात, आणि हे स्कातलंदचा सहावा जेम्स राजा ( तोच इंग्लंदचा पहिला जेम्स राजा ) ह्याजकडून आह्मांस मिळाले. अर्ल आफ् दब्लिन हा किताब माझे बापाचाही होता.

निघण्याविषयींची तयारी वरच्या मजल्यावर चालली होती ती पाहून माझें मन उदास झालें. आमच्या लोकानीं होड्या टांगून ठेविल्या, शिड्या जवळ अंगाशीं ओढून घेतल्या व सर्व सत्रंजा काढून घेऊन जिकडे तिकडे झांका-झांक केली; ह्या प्रवासाचे संकटाविषयीं जी माझ्या मनांत भीति होती ती प्रत्ययास आली. दोन वाजतां आह्मी निघालों व मी गलबताचे खालच्या भागांत कांहीं वेळानंतर जाऊन निजलें. आणि बंदरांतून बाहेर पडलों नाहीं तोंच आमचें गलबत डचमळूं लागलें. हें पाऊणतास पर्यंत चाललें, तेणेंकरून आह्मी सर्वजण भिऊन गेलों. जेव्हां मोठमोठाल्या लाटा गलबतावर आदळूं लागल्या तेव्हां आमच्या गलबतानें दोन झोंके खाल्ले ते मी कधीं विसरणार नाहीं. पुढें कांहीं वेळानें समुद्र शांत झाल्या-वर पांच वाजतां लाखरयन सरोवरांत आह्मी शिरलों. आह्मी ह्या संकटाच्या

पर्यटनांतून पार पडल्या बद्दल ईश्वराचे आभार मानिले. आलबर्त्त साहेब खालीं मजकडे आल्या नंतर मी वर गेलें तेव्हां ते ह्मणाले कीं, समुद्र फारच खवळला होता, पहिली लाट इतकी मोठी आली होती कीं, तेणें-करून सर्व मंडळी चाहोंकडून खालीं धडाधड पडली. वरल्या मजल्यावर इतकें पाणी आलें होतें कीं, गरीब बिचारा अफी (प्रिन्स अलफ्रेद*) हा खालीं पडून पाण्यामध्यें गडबडून गेला आणि भिजून चिंब झाला. आलबर्त्त साहेबानीं मला सांगितलें कीं, गलबताच्या बाजूनें ज्या वेळेस भिंती सारख्या लाटा आल्या त्यावेळेस मोठा भयंकर देखावा दिसला लाखरयन सरोवरामध्यें दोन वर्षा पूर्वी जितका वर आह्मीं नांगर टाकला होता तितका आतां टाकला नाहीं; परंतु ज्या ठिकाणीं आह्मीं नांगर टाकला ती जागा फार सुरक्षित होती ह्मणून आह्मांस आनंद झाला. आलबर्त्त साहेब किनाऱ्यावर गेले.

## सोमवार, आगस्त ता० १३ वी, सन १८४९.

आज पहाटेस चार वाजतां लाख रयन सरोवर सोडलें, आणि गलबत कांहीं सें डगमगायास लागलें, तरी त्या डगमगण्यानें आह्मांस त्रास झाला नाहीं. क्लैद नदीमध्यें न्याहरीच्या वेळेस येऊन पोहोंचलों, परंतु दुर्दिन असल्या कारणानें सर्व दिवसभर हवा वाईट होती आणि वाऱ्याचे झटकारे येत असल्यामुळें सभोंवती कांहीं दिसत नव्हतें. ग्रीनक गांव डावे बाजूस टाकून लाखगायल ह्या सरोवरांत आह्मी शिरून कांहीं चाललों. हें सरोवर लाखलांग सरोवरास जाऊन मिळतें व हें फार सुंदर आहे. खडकाळ अशा डोंगराच्या पायथ्याशीं एवढ्या लहानशा सरोवरामध्यें इतकें खोल पाणी असणें हा मोठा चमत्कार आहे. नंतर मागें परतून लाखलांग सरोवरामध्यें आह्मी गेलों. हें सरोवर फार सुंदर असल्यामुळें माझ्या स्मृतींतून कधींही जाणार नाहीं. ह्या सरोवराचे आरोखर नांवाचे टोंकाजवळ जाऊन आह्मीं नांगर टाकिला. एथें आमचें मनांत उतरून पुढें लाखलामंद सरोवराकडे जावें असें होतें, तेथें आमच्याकरितां एक आगबोट तयार होती; परंतु पाऊस अतोनात पडूं लागला तो पडण्याचा उभेल अशी आशा राहिली

*ड्यूक आफ् एदिनूबरो हे सन १८७० मध्यें मुंबईस आले होते. मा. क.

नाहीं. आह्मांस एक तासभर उगीच थांबावें लागलें, नंतर आह्मी असा बेत केला कीं, फराळ एथें आटोपून तीन वाजतां निघून जावें. फराळ आटोपल्यावर पाहतों तों थोडासा पाऊस उघडला, ह्मणून आह्मी होडींत बसलों; परंतु बसलों नाहीं तोंच पाऊस पहिल्या पेक्षां अधिक सडकून पडूं लागला, ह्मणून आह्मी निराश होऊन परत आलों. परंतु आलबर्त्त साहेबांनीं जाण्याचा निश्चय केला, आणि ते मिस्तर आनसन व सर जेम्स क्लार्क व कपतान राबिन्सन ह्यांच्या बरोबर लंवकरच निघून गेले. नंतर पाऊस बंद झाला, आणि मी गेलें नाहीं ह्मणून मला फार वाईट वाटलें. परंतु पुनःमधून मधून पावसाच्या मोठ्या सरी येऊं लागल्या. आरोखर आह्मी चार वाजण्याचे पूर्वी सोडिलें. परत येतांना लाखलांग सरोवराचा देखावा फार सुंदर दिसला.

मुक्काम पर्थ,
मंगळवार, आगस्त ता० १४ वी, सन १८४९.

कालचे दिवशीं रोजनीथ गांवा जवळ रोजनीथ बे नांवाच्या वांकणामध्यें आह्मीं वरवा केला; लाखगायल सरोवरांत जे डोंगर दिसतात तिकडे ह्या स्थळाचें तोंड आहे, त्या डोंगरां पैकीं एका डोंगराचें नांव "ड्यूक आफ् आर्गील ह्यांची चेंडू खेळण्याची जागा" असें आहे. आलबर्त्त साहेब आठ वाजल्या नंतर मात्र परत आले, त्यांनीं पुष्कळ पाऊस पडत होता तरी लाखलामंद सरोवर अणखी राबराय ह्याची गुहा हीं पाहिलीं. कपतान बीची, कपतान क्रिस्पिन, आणि कपतान राबिन्सन हे तिघेजण आमच्या पंक्तीला जेवण्यास होते. कपतान बीची हा आमच्या बराबर १८४७ सांतील पर्यटनांत होता, आणि आतांही पर्यटनभर आमच्या बराबर आह्मांस जलमार्ग दाखविण्यास आहे. कपतान राबिन्सन हा आह्मांस आज सकाळीं भेटला, त्यानें आलबर्त्त साहेबांस लाखलामंद सरोवराचा रस्ता दाखविला. १८४७ सांतही ह्यानेंच हा रस्ता आह्मांस दाखविला होता. ग्लेसियर्स (बर्फाचे प्रदेश) हे कसे होतात वगैरे विषयांवर आमचें त्याचें मोठें मनोरंजक संभाषण झालें. त्यांत कपतान बीची हा बोलत होता; हा फार बुद्धिवान असून सर्व पृथ्वीवर फिरलेला आहे. उत्तर ध्रुवाकडे सर एदवर्द पेरी बरोबर मी गेलों होतों तेव्हां तेथें चार महिने पावेतों सूर्य आह्मांस

दिसला नाहीं असें त्यानें सांगितलें. तो ह्मणाला, आह्मीं थंडी पासून बचाव होण्याकरितां सर्व गलबत बर्फानें आच्छादित करून टाकिलें होतें आणि आंतून तक्ते लाविले होते.

मुक्काम बालमारल वाडा,

बुधवार, आगस्त ता० १५ वी, सन १८४९.

ह्या प्रियकर हैलंदांतील वाड्यांत पुनः येऊन राहिलों, हें आह्मांस स्वप्नवत् वाटतें. आह्मांस एथून जाऊन एक वर्ष झालें, परंतु इतका काळ गेला असें वाटत नाहीं! आतां कालची हकिकत सांगतें. फेरी आगबोटींत आह्मी काल पावणे नऊ वाजतां बसलों; वादळाच्या आणि पावसाच्या गर्दीतून क्लैद नदींत वर चाललों, पुढें ग्रीनक पावेतों एक सारखें वादळ होतेंच. पोर्त ग्लासगो मागें टाकल्या नंतर दंबार्त्तन आणि आर्स्किन हे गांव लागले, ह्या ठिकाणीं क्लैद नदीचें पात्र फारच अरुंद झालें आहे व तिचा प्रवाह एथें नागमोडी सारखा आहे; ह्मणून ग्लासगो हें शहर अगदीं जवळ गेल्या शिवाय दिसत नाहीं. ग्लासगो एथें आह्मी जवळ येऊन पोहोंचलों तेवेळेस तेथें पुष्कळ लोक उभे होते, कित्येक उतरण्याचे जागीं व कित्येक समुद्रकांठाशीं होते; आगबोट बंदरांत आली तेव्हां पाणी दाटून उसळ्या मारूं लागलें, तेणेंकरून लोक मागें हटत, ती मोठी मजा दिसत होती.

ग्लासगो एथें सुमारें ११ वाजतां आह्मी येऊन पोहोंचल्यावर इतका वेळ जें भयंकर वादळ चाललें होतें तें नाहींसें झालें, आणि नंतर दिवसभर शांत होतें. गलबतावर आह्मांस पुष्कळ मानपत्रें मिळालीं;— पहिल्यानें लार्द प्रावस्त ( शहरचा मुख्य अधिकारी ) ह्याजकडून मिळालें. ह्यास मी कर्नल गार्दनची तरवार घेऊन ह्याच प्रसंगीं नैतची पदवी दिली. नंतर गांवांतील लोकांकडून, एस्ताब्लिश्द चर्च व फ्रीचर्च ह्यांतील पाद्री कडून व हौसीस आफ् कामर्स ( व्यापारी लोकांची मंडळी ) ह्यांजकडून मिळालीं. ह्यानंतर लागलींच आह्मी धक्यावर उतरलों; उतरण्याची जागा फार सुशोभित केली होती· दोघां वडील मुलांसहवर्त्तमान आह्मी गाडींत बसलों. दुसरीं दोन मुलें आमच्या मागाहून आलीं. मिस्तर आलिसन विख्यात इतिहासकर्ते व हर्लीचे शरीफ हे आमच्या गाडीच्या एका बाजूनें,

आणि दुसरे बाजूनें स्कातलंदांतील सेनाधिपति जनरल रिदल हे उभयतां घोड्यावरून चालले. लोकांची पुष्कळ गर्दी झाली. परंतु व्यवस्था उत्तम प्रकारची ठेविली होती. लोक फार उत्साहभरित दिसले. मि. स्तर आलिसन ह्मणाले कीं, पांच लक्ष लोक जमले आहेत. हा गांव फार चांगला आहे, ह्यांत फरसबंदी रस्ते आणि मोठमोठाल्या इमारती आणि देवालयें आहेत. नंतर आह्मांस पूल लागला. एथून तेथल्या दोन धक्यां जवळचा विस्तीर्ण देखावा दिसला, हा पाहून आलबर्त साहेब ह्मणाले कीं, हा पारिस एथील देखाव्या सारखाच आहे. एथें वखारी व मोठमोठालीं दुकानें पुष्कळ आहेत व व्यापार मोठा चालतो.

पुढें जुन्या देवालयाकडे आह्मी गेलों; एथील प्रिन्सिपाल (मुख्य) माकफारलेन हे आह्मांस सामोरे आले. हे फार वृद्ध आहेत. ह्यांनी आह्मांस देवळाचे दारांतून जातांना एक अतिशय उंच धुरांडें दाखविलें, तें एका कारखान्याचें आहे. मला वाटतें कीं, इतकें उंच धुरांडें कोठेंच नसेल. हें देवालय फार सुंदर असून ह्यांतील एक भाग देवालयाप्रमाणें प्रेसबितीरियन मताच्या लोकांच्या उपयोगीं पडतो. नंतर मागील बिशपांची पुरण्याची जागा व भुयारें आह्मांस दाखविलीं. हीं फार चांगल्या रीतीनें ठेविलीं आहेत. एथील शिल्पकाम फार चांगलें आहे. राबराय ग्रंथांतील एक प्रसिद्ध गोष्ट ह्या भुयारांत घडली असें ह्मणतात. एथें राबराय ह्यानें फ्रांक आसबाल्दिस्तन ह्याला तूं धोक्यांत आहेस असें कळविलें. ह्या देवालयाचे स्थापक सेंत मंगो ह्यांचें थडगें एथें आहे. नंतर आह्मी आपल्या गाड्यांत बसून युनिवर्सितीकडे गेलों. ही इमारत जुनाट आहे, एथें मोठ मोठाले विद्वान लोक तयार झाले आहेत. गाड्यांतून उतरल्यावर एथील लोकांनीं आह्मांस एक मानपत्र दिलें, त्याचा आह्मी स्वीकार केला; एथें थोडा वेळ थांबून पुढें एक्सचेंज (बह्यासह्याची जागा) कडे गेलों, ह्या इमारतीचे समोर म्यारोकेतीचे हातचा ड्यूक आफ् वेलिंगतनचा घोड्यावर बसविलेला पुतळा आहे, हा फार सुंदर रीतीनें बनविला असून हुबेहुब आहे. पुढें रेलवे स्तेशनाकडे आह्मी गेलों आणि लागलींच आगगाडींतून बसून चालते झालों.

रस्त्यानें जातांना स्तुरलिंग हें शहर दूर टाकून चार वाजण्याचे सुमारास पर्थ एथें येऊन पोहोंचलों. एथील लोक फार सलगीने वागले. चारी मुलांस आह्मीं आपले गाडींत घेतलें. नंतर नीट जार्ज इन नामक पोस्तखान्याकडे गेलों, एथें पूर्वी ज्या खोल्या आह्मांस मिळाल्या होत्या त्याच आतां मिळाल्या.

आलबर्त्त साहेब लागलेच एथील तुरुंग पाहण्याकरितां गेले, आणि सहा वाजतां गाडींत बसून आह्मी लंदन रोद नामक रस्त्यावरून मानक्रीफकडे गेलों. ह्या रस्त्यावरील देखावा फार सुंदर आहे. पर्थ शहर आणि ते नदीचा मोठा पूल ह्या रस्त्यावरून फार सुंदर दिसतात.

## बुधवार, आगस्त ता० १५ वी, सन १८४९.

आज सकाळीं पावणे आठ वाजतां आह्मी निघालों. दोघे मुलगे आणि विकी हीं आमच्या बरोबर गाडींत होतींच आणि आलिस मागाहून बायां बरोबर आली. हा प्रवास लांबचा होता खरा, परंतु देखावा फार सुंदर होता. पर्थ सोडल्यावर आह्मांस ग्र्यांप्यन नामक डोंगर दिसले. पंधरा मैलांवर ब्लेर गौरी एथें आह्मीं घोडे बदलले. नंतर वीस मैलांची मोठी मजल केल्यावर स्पितल आफ ग्लेनशी हें गांव लागलें. पहिल्यानें आह्मांस लेफ्तेनंत करनल क्लार्क रात्रे ह्यांचें घर लागलें, ह्यास क्रेगहाल ह्मणतात; आणि हें ज्या दरीच्या बाजूनें आह्मी गेलों तिचे वरचे आंगास आहे. ह्या नंतर आह्मांस, सर्व हैलंदांतील वन्य देखावा दिसूं लागला, मोठाल्या खडकाळ आणि ओसाड अशा टेंकड्या पुढें लागल्या, त्यांतून रस्ता वांकण खाऊन स्पितल आफ् ग्लेनशीकडे जातो; स्पितल ह्याला खेडें गांव ह्मणणें शोभत नाहीं, कारण त्यांत एक इन् (पोस्तखाना) आणि दोन तीन झोंपड्या मात्र आहेत. ह्या पोस्तखान्यांत आह्मी उतरलों त्यावेळीं मिस्तर फार्कार्सन, त्याचा पुत्र आणि कांहीं त्यांचे चाकर लोक आह्मांस भेटले. नंतर आह्मी थोडासा फराळ करून निघालों. पुढें क्यासलतन पावेतों पंधरा मैलांची मजल केली, ह्याचे बाजूनें भव्य आणि चमत्कारिक देखावा आहे, व रस्ता फार खडकाळ असून वाईट आहे; पुष्कळ ठिकाणीं वळणें आणि उभ्या चढणी आहेत, आणि रात्रीचा तर तो रस्ता फारच धोक्याचा आहे. एका ठिकाणीं

वळण्याची जागा आहे तीस देवल्स एल्बो (सैतानाचा कोंपर) असें ह्मणतात. फार्कार्सनचे लोक आह्मांस एथें पुनः येऊन मिळाले, कित्येक आमच्या पुढें आले होते व कित्येक मागाहून आले; ते ह्या दगडावरून त्या दगडावर मोठ्या चपलतेनें उड्या मारीत मारीत आले. हा गुण हैलंदर लोकांतच विशेष आहे. ते आमची गाडी चांगली चालूं लागेपर्यंत आमच्या बरोबर चालले.

पुढें एक केर्नवाल नांवाची सुंदर खिंड लागली तेथें आह्मांस पावसानें गांठलें. क्यासलतन एथें येऊन पोहोंचल्या नंतर आकाश निरभ्र झालें आणि आह्मांस गाड्या उघड्या ठेवतां आल्या. एथें आह्मांस सर आलेक्झांदर दफ आणि ड्यूक आफ् लीड्स आपल्या लेकांसहित येऊन भेटले. लेदी दफ, मिस्तर आणि लेदी अगनिस दफ आणि मिस् फार्कार्सन व कांहीं मुलें आणि डचेस आफ लीड्स हीं आमचेगाडी जवळ आलीं. क्यासलतन एथून बालमारल पावेतों रस्त्याची आह्मांस चांगली माहिती होती, आणि विशेषें करून बालखबुई पासून जो छानदार रस्ता आहे त्याची आह्मांस चांगलीच माहिती होती. तेथील सुंदर देखावा पुनः पाहून आह्मांस फार आनंद वाटला. ग्रांत आह्मांस स्पितल आफ ग्लेनशि एथें येऊन मिळाला आणि दिवसभर आमचे बरोबर घोड्यावरून चालला. बालमारल वाड्यांत सुमारें चार वाजतां येऊन पोहोंचलों. दाराशीं म्याकै आणि माक्‌दानल्द भर पोषाग करून उभे होते. म्याकै हा वाद्य वाजवीत होता.

## गलबतांत बसून समुद्रपर्यटन करणें.

### मुक्काम दार्तमौथ बंदर,
### विक्तोरिया आणि आलबर्त्त गलबत,
### गुरुवार, आगस्त ता० २० वी, सन १८४६.

देवनशायरचे सुंदर किनाऱ्यावरून पुष्कळ ठिकाणें आह्मांस लागलीं. इकडून आह्मी तीन वर्षां मागें गेलों होतों. सीतन, सिदमौथ, (ज्यांचे जवळ आह्मी सुमारें दाहा मिनिटें थांबलों.) आक्समौथ, तेनमौथ, इत्यादि अनेक गांवें लागलीं. नंतर ब्याबिकोंब ह्या नांवाचें वांकण आह्मांस लागलें. तेथें आह्मी एक तासभर थांबलों. हें फार सुंदर स्थल आहे. मागें आह्मी हिकडून गेलों तेव्हां हें कांहीं अंतरावर आह्मांस दिसलें. एथें तांबडे खडक आहेत. कित्येक ठिकाणीं इताली देशाप्रमाणें झाडीने आच्छादित अशा टेंकड्या आहेत; आणि ज्या खेळांत वनदेवतांचीं सोंगें यावयाचीं असतात, तशा प्रकारचा हा देखावा दिसूं लागला. खडक, गुहा ,आणि अतिशय खोल व स्थिर असा समुद्र ह्यांची तर फारच मौज आहे. आमच्या मनांत एथें उतरून जवळच एक टेंकडी होती, तिजकडे चालत जावयाचें होतें, परंतु पाऊस पुष्कळ येत असल्यामुळें हा बेत आह्मी रहित केला. तारबेच्या समोर जो भाग आहे त्याचा नकाशा नंतर आह्मीं काढूं लागलों. एथें आमचीं मुलें जितक्या आनंदांत होतीं तितकीं कोठेंच नव्हतीं. विकी कडून इंग्लिश इतिहास वाचवून मी तिला धडा दिला.

दीड वाजतां पुढें चाललों; तारकी गांव हें आह्मांस स्पष्ट दिसलें. हें स्थल फार सुंदर आहे. पुढें समुद्र फार खवळला आणि पुष्कळ

अभ्रही आलें, ह्मणून आह्मी प्लिमथ एथें जाण्याचा बेत तिसऱ्यानें रहित करून दार्त मौथ ह्या सुंदर ठिकाणीं उतरावें असें ठरविलें. नंतर तिकडे जाण्यास निघालों, तेव्हां आह्मांस पुष्कळ पाऊस लागला; आणि गलबताचा वरचा मजला पाण्यानें भरून गेला. आह्मी सर्वांनीं छत्र्या घेतल्या होत्या. हा देखावा पाहण्यास सर्वांत मुलें फार उत्सुक होतीं. पाऊस जरी पडत आहे, तरी हें ठिकाण त्याच्या त्या झाडींनें आच्छादित झालेल्या खडका मुळें व देवळामुळें व गांवांत शिरतांच जो किल्ला लागतो त्यामुळें रमणीय दिसतें; हें पाहून मला सुंदर ऱ्हैन नदीचे तीरचे पडके किल्ले व लर्ले ह्यांचें स्मरण झालें.

मी आतां खालीं लिहीत आहें. आणि आमच्या गलबताच्या सभोंवती होड्यांची दाटी झाली आहे.

**मुक्काम प्लिमथ बंदर,**

**आगस्त, शुक्रवार ता० २१ वी, सन १८४६.**

आज प्रातःकाळीं साडेसहा वाजतां दार्तमौथ बंदर सोडलें. खिडकींतून बाहेर पाहूं लागलों तेव्हां समुद्र शांत व निळा दिसला, व ऊन लख्ख पडलें होतें, ह्मणून उठावें असा आह्मी निश्चय केला. सर्व दिवसभर निरभ्र होतें खरें, परंतु समुद्र बराच उसळला होता. प्लिमथच्या सुंदर बंदरामध्यें सरशेवटीं आह्मी साडेनऊ वाजतां येऊन पोहोंचलों, आणि मौंत एजकम नामक डोंगराच्या खालच्या बाजूला गलबत खुंटाविलें. ह्या डोंगरावर पैन आणि इतर सुंदर झाडें समुद्रकांठा पावेतों येऊन लागल्यामुळें हा फार मनोरंजक दिसतो. नंतर मी आपला पोषाग बदलला आणि पुष्कळ सरकारी व खासगी पत्रें आलीं होतीं तीं वाचलीं. नंतर गलबताच्या मजल्यावर जाऊन समुद्रावरील आणि जमिनीवरील फौजेचे अधिकारी अद्मिरल आणि जनरल हे जे आले होते, त्यांस मी भेट दिली. ह्यानंतर विकीचे धडे घेतले व कांहीं लिहिलें. दीड वाजतां आह्मी आपल्या मंडळी साहित फेरी आगबोटींत बसलों. बरोबर सर जेम्स क्लार्क आले, ते इकडे येऊन आह्मांस मिळाले. मुलें बरोबर घेतलीं नव्हती. त्यांना गलबतावर

ठेविलीं. पहिल्यानें सेंत जर्मन्स नदीवर गेलों. हिच्या कांठावर फार सुंदर झाडी आहे. हिच्या उजव्या बाजूस त्रेम्यातन क्यासल आहे, आणि डावे बाजूस जात्स आहे. हीं स्थळें फार सुंदर आहेत. बर्ती हा ड्यूक आफ् कार्नवाल असल्यामुळें त्रेम्यातन क्यासल हा त्याजकडे आहे. एथें आह्मी कांहीं वेळ थांबून मार्गे परतून तेमर नदीवर चाललों. पहिल्यानें नदी जवळचा प्रदेश सपाट दिसला परंतु जसजसे आह्मी पुढें जाऊं लागलों, तसतसी एथील सृष्टिरचना फार सुंदर दिसूं लागली. वृक्षांनीं आच्छादित अशा टेंकड्या, पाण्या पावेतों उगवलेलीं झाडें, आणि नदीचें नागमोडी वाहणें (जेणेंकरून एक सरोवरच आहे कीं काय असें दिसतें) ह्यांच्या योगानें हा देखावा फार सुंदर बनला आहे. ही नदी न्हैन नदी सारखी जरी नाहीं तरी हिच्या नागमोडी वाहण्याच्या योगानें न्हैन नदीची वारंवार आठवण होई. आलबर्त्त साहेब ह्मणाले कीं, मला ही दान्यूब नदी सारखी दिसते. ह्याचे सुशोभित भाग सालताश नांवाच्या सुंदर आणि लहानशा गांवा पासून लागतात. जसजसें पुढें जावें तसतसा उजव्या बाजूचा देखावा इंग्लिश देखाव्या पासून अगदीं निराळा होतो. त्याचे पलिकडे तेवी नदीचें मुख लागतें, ही नदी ह्या ठिकाणीं फार सुंदर दिसते. ज्यांत काम चाललें आहे अशा पुष्कळ खाणी आह्मांस दिसल्या. ह्याच्या पुढें डावे बाजूस पेन्तिली क्यासल लागला. हा मोठ्या उंच ठिकाणीं असून ह्याचे जवळ फार दाट झाडी आहे, ती पाण्याच्या कांठा पावेतों जाऊन लागली आहे. एथें नदीचा प्रवाह नागमोडी सारखा आहे. हें स्थळ दान्यूब नदी वरील ग्रैनबर्गप्रमाणें मला दिसतें, असें आलबर्त्त साहेब बोलले. तेथून पुढें जवळच कोथेलचें लहानसें चित्रा सारखें खेडें लागलें; एथें उतरण्याची जागा आहे. हें खेडें एका वृक्षभरित टेंकडीच्या तळाशीं आहे, आणि त्याचे जवळच एक खिंड आहे. एथें तेवी नदी फारच अरुंद झाली आहे. एथें आह्मी उतरलों आणि गाडींत बसून चढणीच्या टेंकड्यावरून व झाडींतून कोथेल हौस नामक एक चमत्कारिक जुनें घर आहे तिकडे गेलों. ही इमारत फार चमत्कारिक आहे. ही सातव्या हेनरीच्या वेळीं जशी होती तशीच अद्याप आहे, आणि जुन्या खोल्यांतून नकशीदार पट लाविले आहेत.

तेथील एका सुंदर दऱ्याच्या भागावरचे अंगाला झाडांनीं आच्छादित एक रस्ता आहे, त्यावरून आह्मी गाड्यांत बसून परत आलों आणि फेरी आगबोटींत फिरून बसून नदीवर चाललों. संध्याकाळचा वेळ फार सुंदर होता. ऊन चांगलें पडलें होतें आणि समुद्र व आकाश निळ्या रंगाचीं दिसत होतीं. थितिस नामक लहान लढाऊ गलबतास पाण्यांत सोडण्याचा समारंभ झाल्यावर आह्मी येऊन पोहोंचलों. नंतर साडे-पांच वाजतां आपल्या गलबतावर आलों, त्यावेळेस गलबताच्या सभोंवती लाखो होड्यांची एकच गर्दी जमली होती, ह्मणून लहान नौकेंत बसून वल्हें मारून त्या होडयांचे मधून आह्मांस जावें लागलें. हें पाहून मला तीन वर्षांमागें जेव्हां आह्मी इकडे आलों होतों तेव्हांचें स्मरण झालें. सायंकाळ आनंदकारक, शांत व निरभ्र होता, परंतु आमच्या आसपास होड्यांमध्यें फार गलबला होत होता. लार्द व लेदी मौंत एजकम, आणि सर जेम्स क्लार्क हे आमच्या पंक्तीस जेवण्यास होते.

मुक्काम प्लिमथ बंदर,

शनवार, आगस्त ता० २२.वी, सन १८४६.

आलबर्त्त साहेबांस दार्तमूर फारेस्त नामक माळरानाकडे जावयाचें होतें ह्मणून ते प्रातःकाळीं सहा वाजतां उठले. दाहा वाजतां मी, दोन मुलें, बाया मंडळी, बारन स्टाकमर आणि लार्द आलफ्रेद पाजेत ह्यां सहित लहान नौकेंत बसून निघालें आणि मौंत एजकम एथें उतरलें. लेदी मौंत एजकम, तिचे दोन मुलगे, तिची बहीण, आणि पुतण्या हीं सामोरीं आलीं, आणि उतरण्याच्या जागेच्या पलिकडे लार्द मौंत एजकम हे भेटले. आह्मी उतरलों त्या ठिकाणीं पुष्कळ लोक जमले होते. मी आलबर्त्त साहेबां-शिवाय निघालें ह्मणून मला लाजिरवाणें वाटलें व मी कांहींशी गोंधळलें. मी लेदी मौंत एजकम आणि मुलें ह्यां सहवर्त्तमान गाडींत बसलें आणि आखाताच्या बाजूनें जो रस्ता आहे, तेथून गाड्या हांकल्या. लार्द मौंत एजकम हे पुढें गेले आणि बाकीची मंडळी मागाहून आली. जातां जातां रस्त्याच्या बाजूनें चोहोंकडला सुंदर देखावा पाहिला आणि सुंदर झाडांच्या खालून व जवळून गेलों. एथें आह्मी तीन वर्षां पूर्वी आलों

होतों. ही जागा जेव्हां पाहवी तेव्हां आनंददायकच वाटते. दिवसभर धुकें होतें आणि हवा फार उष्ण होती. आह्मी लार्ड मौंत एजकमच्या घरास अकरा वाजतां जाऊन पोहोंचलों. माझीं मुलें ह्यांनीं शिक्षकीणबाई बरोबर व दुसऱ्या मुलां बरोबर घरांत जाऊन फराळ केला. मी गलेरींतच राहिलें. ती सुंदर व तींत सुंदर चित्रें आहेत व तेथून बागांत जाण्यास एक दरवाजा आहे. तेथून समुद्राचा देखावा फार सुंदर दिसतो; त्याचा मी नकाशा काढिला. बारा वाजल्या नंतर आह्मी आपल्या गलबतावर परत गेलों. त्याच्या सभोंवतीं पुष्कळ होड्या प्रातःकाळचे सहा वाजल्या पासून जमल्या होत्या. आलबर्त्त साहेब एक वाजतां परत आले. दार्तमूर फारेस्त नामक रान पाहून आह्मांस आनंद झाला व तें स्कातलंदा सारखें दिसलें; असें त्यांनीं सांगितलें.

पुनः दोन वाजतां मंडळीसहित मौंत एजकम एथील उतरण्याचे जागीं गेलों, त्या वेळीं मुलें आमच्या बरोबर नव्हतीं. तेथें पूर्वीप्रमाणें लोक सामोरे आले आणि नंतर गाडींत बसून आह्मी लार्ड मौंतएजकम ह्याचे घरीं गेलों, एथें फारच उंच आणि सुंदर अशीं चेसनत झाडें आहेत, आणि बीच झाडें तर फारच चमत्कारिक आहेत; तीं उंच असून सोटा सारखीं वाढलीं आहेत आणि फांद्या तर वरच वाढत गेल्या आहेत. आह्मी गलेरी-मध्यें थोडेसें फिरलों, आणि लेदी मौंत एजकम हिची एक लहान खोली पाहिली. ही सुंदर असून ह्या बाईनें जमिवलेल्या सर्व लहान लहान वस्तूंनीं भरलेली आहे. नंतर आह्मीं एका खोलींत फराळ केला, त्या खोली-मध्यें सरजाश्युआ रेनोल्दस ह्यांनीं काढलेल्या सुंदर तसबिरी आहेत. त्या सर्व मौंत एजकमच्या कुटुंबांतील माणसांच्या आहेत. ह्या घराण्यांतील एक पुरुष ह्या चितान्याचा पोशिंदा होता. सर जाश्युआचें जन्मस्थान प्लिमथ जवळचें एक गांव आहे. आह्मी फराळास बसलों होतों त्या खोलींत तो प्रारंभीं तसबिरी काढण्यास शिकला; त्या वेळेच्या त्याच्या कांहीं तसबिरी आहेत, त्यांच्या रंगास अद्याप धक्का लागला नाहीं. नंतर तो नवे नवे प्रकार करून पाहूं लागला, त्यावेळच्याही कांहीं तसबिरा आहेत, त्यांचा रंग पुसट दिसतो. आणि त्याच्या चुकी त्यास समजल्या नंतर त्यानें काढलेल्या ज्या कांहीं तसबिरा आहेत त्यांचा रंग तर फारच सुंदर आहे. नंतर घराजवळ बाग

आहे त्यांत फिरलों आणि मग किआस्क कडे गाडींत बसून चाललों. रस्त्यानें पैन आणि पैनास्तर हीं सुंदर झाडें आह्मांस लागलीं, हीं पाहून आलबर्त्त साहेबांस फार आनंद झाला व मला मिस्तर लियरचे चित्रांचें स्मरण झालें. किआस्क एथून देखावा दिसतो तो फारच सुंदर आहे; कारण तो उंचवट्याचे ठिकाणीं आहे. समुद्र अगदीं शांत व कांचे प्रमाणें दिसला. पुढें एका झाडीच्या रस्त्यानें थोडेंसें आह्मी पायीं चाललों आणि नंतर कारनिस सारखा उंचवट्याचा जो एक सुंदर रस्ता आहे, त्यावरून गाड्या हांकल्या आणि उतरण्याच्या जाग्या जवळ येऊन सर्व मंडळीचा निरोप घेतला. साडेचार वाजतां गलबतावर फिरून जाऊन बसलों. गरीब बिचारे लार्ड मींत एजकम जरि फार दुःखांत होते तरी आनंदी आणि सहनशील दिसले. गलबतावर जाऊन मुलांस बरोबर घेऊन आलों आणि फेरी आगबोटींत बसून त्या आखातामध्यें पाहण्या सारख्या मनोरंजक जागा होत्या त्या पाहिल्या. पहिल्यानें क्यात्वातर ह्यामध्यें जाऊन तेथील एक लहानशी होडी घेतली आणि लार्ड मारली ह्यांचा वाडा सालत्रम पाहवयास गेलों. नंतर फेरी ह्या आगबोटीवर परत येऊन मिलबे, सतन पूल, (डोहो) आणि स्तोनहौस हीं पाहण्यास गेलों. साडेसहा वाजतां परत गलबतावर आलों.

## मुक्काम बंदर गर्नजी.

### रविवार, आगस्त ता० २३ वी, सन १८४६.

आज सकाळीं उठून पाहिलें तों प्रातःकाळ फार सुंदर दिसला. २८सावे तारखेस कौन्सल भरणार होतें तें २९ तिसावे तारखेस भरणार, व आह्मांस तर एक दिवस देखील राहतां येत नाहीं ह्मणून खेद झाला. असो, आह्मी तारबे कडे साडेनऊ वाजतां जाण्याचा बेत केला आणि सोमवारीं आसबर्न कडे जाण्याचें ठरविलें. मी पोषाग करीत असतांना फालमौथ अगर दुसरीं कांहीं ठिकाणें पाहण्यास जावें किंवा कसें, असें माझ्या मनांत आलें. आलबर्त्त साहेबांस असें वाटलें कीं, आपण चानल ऐलंद्स पैकीं एखादें पाहण्यास कदाचित् जाऊं आणि त्याप्रमाणें लार्ड आदालफस फित्ज क्लारेन्स ह्याजला बोलावूं पाठविलें. ते आल्यावर गर्नजीकडे जाण्याचा बेत ठरला. हें बेट पाहण्याची माझी पुष्कळ दिवसांपासून इच्छा होती

ह्मणून हा बेत ऐकून मला फार आनंद झाला. आजचा दिवस फार सुंदर होता. समुद्रावरील सेनाधिपति सर जे. वेस्त आणि जमिनीवरील सेनाधिपति जनरल मरे हे निरोप घेण्यास आले. आणि संकेता प्रमाणें आह्मी साडेनऊ वाजतां गर्नजीकडे निघून गेलों. सन १८४२ सांत आह्मी इकडे आलों होतों, ते वेळेस समुद्र जसा शांत होता तसाच ह्या वेळेसही होता. प्लिमथ बंदर फार सुंदर आहे ह्मणून जरी आह्मी पुनः पुनः एथें आलों तरीं आह्मांस आनंदच होईल.

दोन तास पावेतों जमीन आतां दिसेल मग दिसेल अशी आशा करित होतों, परंतु धुकें फार दाट आल्यामुळें आह्मी कोठें आहों हें खलाशांस कळेना. सुमारें सहा वाजतां फेरी आगबोटींतील लोक जमीन दिसली असें आह्मांस कळविण्यास आले. नंतर दुसरीं सर्व गलबतें आमच्या पुढें चालूं लागलीं. आह्मी तेथें जाऊन पोहोंचलों तों गर्नजीच्या किनाऱ्याचें सौंदर्य पाहून फारच चकित झालों. तेथें पुष्कळ खडकाळ वांकणें आहेत, आणि सेंत पिएर ह्या गांवाची चित्राप्रमाणें मांडणी आहे, तेथील घरें पाण्याचा कांठापर्यंत येऊन लागलीं आहेत. बंदरांत गेल्या नंतर उजवे बाजूस आह्मांस सार्क हें बेट लागलें; आणि त्यानंतर सेंत पिएरच्या समोरचीं जवळ असणारीं हर्म आणि जेथू हीं दोन बेटें दिसलीं. ह्या सुंदर बेटांमुळें हें आखात चमत्कारिक दिसतें. आह्मीं सात वाजतां सेंत पिएरच्या समोर नांगर टाकला. हर्म आणि जेथू हीं बेटें आमच्या दुसऱ्या बाजूला होतीं, आठ वाजतां भोजन केलें. मग वरच्या मजल्यावर गेल्या नंतर सर्व शहरांत दिव्याचा लखलखाट दिसूं लागला. दिवे लावण्याचें काम फार जलद झालें असावें, कारण ह्या लोकांस आमचे एथें येण्याविषयीं कांहीं माहिती नव्हती. ह्या सेंत पिएर गांवाची बांधणी परकी देशा सारखी आहे. एथील लोक बहुधा आपापल्यांत फ्रेंच भाषा बोलतात.

**आगस्त ता० २४ वी, सन १८४६.**

सेंत पिएर हें खरोखरच चित्रा सारखें गांव आहे. एथील घरें फार उंच असून तेजदार रंग दिलेलीं आहेत; आणि तीं समुद्राला जाऊन भिडलीं आहेत. पाठशाळा आणि देऊळ ह्या इमारती सर्वांत मोठ्या आहेत. हें

बेट ह्याच्या जवळचें दुसरें कार्नेत बेट व त्याच्या वरील किल्ला ( ज्याचे जवळ आमचें गलबत नांगरलें होतें ) हर्म, जेथू आणि सार्क हीं तीनही बेटें आणि असंख्य खडक ह्या सर्वांच्या योगानें मोठा चमत्कारिक आणि सुंदर देखावा बनून गेला आहे. त्यावेळीं ऊन पडलें होतें ह्मणून जास्तच शोभा दिसत होती. आह्मीं उभयतांनीं एथील नकाशे काढले आणि गांवांत जाण्याकरितां पावणेनऊ वाजतां लहान नौकेंत आमच्या बायांसहित बसलों. किनाऱ्यावर व धक्क्यावर पुष्कळ लोक जमले होते. एथील स्त्रियांचा पोषाग पांढरा होता आणि सर्वांनीं "ईश्वर राणीचें संरक्षण करो" असें गाणें गाइलें. रस्त्यावरून फुलेंही विखरलीं. उतरल्यावर आह्मी आपल्या गाडींकडे गेलों. आमच्या पुढें जनरल नेपिअर चालले. हे सिंधचे सर च्यार्लस नेपिअर ह्यांचे बंधु होत. हे दिसण्यांत चमत्कारिक असून ह्यातारे, उंच, सडपातळ, व शुकनासिक आहेत; ह्यांची दृष्टि तीव्र आहे; मिशा आणि सर्व केंस पांढरे आहेत. एथील लोक फार सुशील असून फार मनमिळाऊ आहेत. गांवांतील अरुंद रस्त्यांनीं जात असतांना आमच्या येण्याविषयीं फार आनंद झाला, असें लोकांनीं दर्शविलें. फुलें आणि निशाणें ह्यांनीं रस्ते सुशोभित केले होते आणि दोनही बाजूंनीं तेथील दोन हजार शिबंदी शिपाई उभे केले होते. बेंड बाजेही ह्यांजबरोबर होते. कित्येक सैन्यांतील लोक घोड्यांवर होते.

गांवा बाहेर झाडपानें फारच सुंदर आहेत. एथें फुल पान पुष्कळच आहे. एथील रस्ते चढणीचे असून टेंकड्या उंच आहेत. किल्यांतून जो देखावा दिसतो तो फार सुंदर आहे. हा किल्ला फार उंच आहे. ह्याच्या किल्या जनरल नेपिअर ह्यानें मला दिल्या. एथून पहिल्यानें गर्नजीचें आखात दिसतें, नंतर समोर हर्म, जेथू आणि सार्क हीं बेटें दिसतात. त्याशिवाय अल्दर्नी आणि फ्रान्सचा किनारा, डावे बाजूस दूर केप दी ला हेग, आणि उजवे बाजूस दूर अर्सी हीं दिसतात. हें बेट फार भरभराटींत आहे. शहरामधील लोक इंग्रेजी भाषा बोलतात, परंतु देशांतील फ्रेंच भाषा बोलतात. ह्या सर्व बेटांत असेंच आहे. हीं बेटें पूर्वीं डची आफ् नारमंदी ह्या स्थानाकडे होतीं, आणि विलियम धी कांकरर [ विजयी ] ह्यांच्या वेळापासून हीं इंग्लंदाकडे आहेत. जानराजा हीं बेटें पाहण्यास

आला, त्याच्या नंतर त्यांचा कोणी राजा आला नाहीं. नंतर धक्याकडे गेलों आणि सर्व लोक जयघोष करीत असतां आह्मी लहान नौकेंत बसलों. धक्यावर व्यवस्था फार उत्तम प्रकारें ठेविली होती; आणि एथील लोक मोठे राजभक्त आहेत. सरासरी एक वाजतां आह्मी गर्नजी सोडलें, आणि सुमारें दीड तासानें आलदर्नीजवळ येऊन पोहोंचलों. आमचे उजवे बाजूनें सर्व पर्यटनभर फ्रेंच किनारा केप दी ला हेग होता. आणि डावे बाजूला कासकत लैत्स (दीपस्तंभ) होते. आलदर्नी हें इतर बेटां पासून अगदीं निराळें आहे. हें फार खडकाळ असून नापीक आहे. समुद्रांतील खडक फार भयंकर आहेत.

# गलबतांत बसून समुद्रपर्यटन करण्याची दुसरी खेप.

मुक्काम जर्सी, सेंत हेलियर्स बंदर,

आलबर्त्त आणि विक्तोरिया गलबत,

बुधवार, सप्तेंबर ता० २ री, सन १८४६.

आज सवासात वाजतां विकी, बर्ती, लेदी जासालिन, मिस कर, ग्रनर, लार्द स्पेन्सर, लार्द पाल्मर्स्तन, व सर जेम्स क्लार्क, ह्यां सहवर्त्तमान आह्मी आसबर्न पियर एथें गलबतांत बसलों. मिस्तर आन्सन आणि कर्नल ग्रे हे ब्ल्याकईगल आगबोटींत आहेत. तेव्हां समुद्र पुष्कळ खवळला होता. हवा फार चांगली होती, परंतु निघते वेळीं फार थंड होती. बारा वाजतां आलदर्नी बेटा जवळ आलों आणि दोन वाजल्या नंतर आलदर्नी चे सामुद्र धुनींत येऊन पोहोंचलों. तेव्हां गलबत फार झोके खाऊं लागलें, परंतु फार वेळ पर्यंत नाहीं. आह्मी आलदरनी, फ्रान्सचा किनारा (केप दि ला हेग) ह्यांच्या मधून गेलों; आणि आलदर्नीची दुसरी बाजू पाहिली. नंतर कांहीं वेळानें सार्क, गर्नजी, अणखी दुसरीं कांहीं बेटें आह्मांस दिसलीं. आलदर्नीच्या सामुद्र धुनींतून पार पडल्यावर समुद्र शांत झाला. नंतर बर्तीनें आपला खलाशाचा पोषाग घातला. जो मनुष्य आमच्या खलाशा करितां गलबतावर पोषाग शिवीत असतो, त्यानें हा पोषाग सुंदर रीतीनें शिवला होता. बर्ती जेव्हां पोषाग करून गलबताच्या वरल्या मजल्यावर गेला, तेव्हां सर्व जमलेले खलाशी आणि अधिकारी ह्यांनीं जयजयकार केले; त्यावरून त्यांस आनंद झाला असें दिसलें.

जर्सीचा किनारा फार सुंदर आहे. आणि सेंत हेलिअर्स एथें जाण्या करितां आह्मांस बहुतकरून सर्व बेटाला वळसा घालावा लागला. पहिल्यानें रांदनेज हें भूशिर लागलें; नंतर ग्रोसनेज भूशिर व तेथील किल्ला सेंत ओएन्स बे नांवाचें वांकण, लारोका किल्ला आणि ब्रिलेदस बे नांवाचें

वांकण, हीं अनुक्रमें लागलीं. तांबडे कडे आणि खडक ह्यांजवर अस्तास जाणाऱ्या सूर्याच्या किरणांची प्रभा पडल्यानें ते फार सुंदर दिसले. सुमारें सात वाजतां सेंत आबिनच्या वांकणांत आह्मी येऊन पोहोंचलों, ह्यांतच सेंत हेलिअर्स आहे. जेवण झाल्या नंतर आह्मी दिव्यांचा लखलखाट आणि आनंदसूचक अग्नि पेटलेले पाहण्याकरितां गलबताच्या वरच्या मजल्यावर गेलों.

**मुक्काम सेंत हेलिअर्स बंदर,**

**गुरुवार, सप्तेंबर ता० ३ री, सन १८४६.**

आजचा दिवस सर्वोत्कृष्ट होता. एथील समुद्र फार सुंदर व निळा दिसला. हा नेपल्स एथील समुद्रा प्रमाणेंच निळा दिसला, आणि आल· बर्त्त साहेब असें ह्मणाले कीं, हें सेंत आबिनचें आखात (ज्यांत आपण आहोंत) नेपल्सच्या आखाता प्रमाणेंच आहे. नाइरमांत पाइंत हें भूशिर आमचे डावे बाजूस होतें; ह्याच्या टोंकाशीं एक लहानसा किल्ला आहे; आणि समोर सेंत आबिन आणि दुसरा एक खडकावरील किल्ला आहे. त्या पुढें आमच्या उजव्या बाजूस एलिझाबेथ क्यासल हा सुंदर किल्ला आहे. त्याचे मागें सेंत हेलिअर्स हा गांव आहे. सूर्यकिरणाचे रंग आणि शोभा ह्यामुळें देखावा फारच अवर्णनीय बनला होता. नंतर आह्मी आपल्या मंडळी सहवर्त्तमान लहान नौकेंत बसून फेरी आगबोटीवर गेलों आणि नंतर बंदराजवळ गेलों, तेव्हां पुनः लहान नौकेंत बसून किनाऱ्यावर गेलों, आणि विक्तोरिया बंदराच्या धक्यावर उतरलों. त्या वेळेस असंख्य लोकांनीं जयघोष केला, तोफा सोडल्या, आणि बेंडबाजेही वाजविले. गर्नजी एथील स्त्रियांप्रमाणें एथील स्त्रिया आह्मांस सामोऱ्या आल्या त्यांचा पोषाग फार सुंदर होता, आणि त्यांनीं रस्त्यावर फुलें उधळीत उधळीत आह्मांस मंडपांत नेलें. त्यांत सरकारी सभा आणि शिबंदी शिपाई ह्यांनीं मला मानपत्रें दिलीं तीं मी स्वीकारिलीं.

नंतर आह्मी आपल्या गाडींत बसून धक्यासरसे चाललों. कर्नल लेकूतूर माझा लष्करी एदिक्यांप (नकीब) व दुसरे कित्येक अधिकारी माझ्या बाजूनें घोड्यावरून चालले. आलबर्त्त साहेबांच्या बाजूनें कर्नल ले. ब्रेतन

होते. हे एथील शिबंदीचे मुख्य आहेत. रस्त्याच्या दोहों बाजूंनीं एथील पांच हजार शिबंदीचे शिपाई ह्यांनीं उभे केले होते. सरकारी सभेचे लोक आमच्या पुढें चालले. लोकांची गर्दी फार होती, तरी व्यवस्था उत्तम रीतीनें ठेविली होती. एथील लोकांनीं पुष्कळ उत्साह दाखविला, तरी गर्नजी एथील लोकां पेक्षां जास्त नाहीं. हें गांव गर्नजीच्या गांवा पेक्षां मोठें आहे. ह्यांना आमचें आगत स्वागत करण्याची तयारी करण्यास पुष्कळ वेळ होता. फुलांच्या कमानी, आणि दुसरी कांहीं आरास फारच सुंदर रीतीनें केली होती. ह्या शिवाय ठिकठिकाणीं प्रीतीचे लेख असंख्य लिहून ठेविले होते. एथील खेडे गांवांत राहणारे सर्व लोक फ्रेंच भाषा बोलतात. आमच्या जवळ जे पोलीस लोक होते, तेहीं तीच भाषा बोलत. हा आदर सत्कार पाहून आह्मी फार खुष झालों. एथील एका रस्त्यावर ग्र्यानविल शहरांतील फ्रेंच लोकांच्या स्त्रिया एका ठिकाणीं बसलेल्या आमच्या दृष्टीस पडल्या. त्यांचा पोषाग चमत्कारिक होता, त्यांनीं आपले डोक्यास पांढरे रुमाल गुंडाळले होते. सर्व रस्त्यांतून फिरल्या नंतर सरकारी वाड्याकडे गेलों. एथें खालीं उतरलों नाहीं. जनरल मिब्स हे एथील गवर्नर फार अशक्त आहेत.

मिरवत मिरवत चालण्याचा थाट आटोपल्यावर बेटाच्या मध्यभागांतून गाड्या जलदीनें हांकल्या. हें बेट फार हिरवें गार असून सुंदर आहे. एथें मेयन्सप्रमाणें फळ फळावळीचे बाग पुष्कळ आहेत. लाहोगबी नांवाचा एक मोठा चमत्कारिक व फार जुनाट किल्ला आहे, त्याजवरून आह्मी गेलों. नंतर आह्मांस क्यासल आफ् मौंत आरग्युइल नांवाचा किल्ला लागला. हा मूविल आखातांत चांगल्या उंच ठिकाणीं बांधलेला असून समुद्राचे वर बाहेर आलेला आहे. एथें विलियम धी कांकररचा मुलगा राबर्त ड्यूक आफ् नारमंदी हा राहिला होता असें ह्मणतात.*

---

* मौंत आरग्युइल ह्याला गुरे किल्ला असेंही नांव होतें. नारमंदींतील गुरे किल्ल्यांत विलियम धि कांकरर (विजयी) ह्याचा मुलगा दुसरा ड्यूक राबर्त्त राहत असे. पहिला ड्यूक राबर्त्त ज्याला (राबर्तल दिआबल) ह्मणतात तो बारा दिवस जर्सी बेटांत होता. ह्या वेळांत कदाचित् तो गुरे किल्ल्यांत राहिला असावा. ह्यावरून दुसरा राबर्त्त तेथें राहत होता अशी दंतकथा असावी. परंतु ह्याजविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. (एदितर).

नंतर आह्मी कांहींसे पायीं चालून एका मोरच्याच्या ठिकाणीं गेलों. एथें तोफा नव्हत्या. एथून ग्रूविलचें आखात आणि फ्रेंच किनारा हेही स्पष्ट दिसतात. हा किनारा काय तो तेरा मैलांवरच आहे. एथील लोक असा गर्व वाहतात कीं, मौंत आरग्युइल हा किल्ला अद्याप पर्यंत कोणीच घेतला नाहीं. परंतु नंतर माझे ऐकण्यांत असें आलें कीं, ह्याच्यावर कोणी एकदम हल्ला करून कांहीं दिवस ताब्यांत ठेविला होता. ही गोष्ट मात्र खरी आहे कीं, गर्नजी किल्ला कधीं कोणी घेतला नाहीं.*

नंतर आह्मी गाडींत परत बसलों आणि एका जवळच्या दुसऱ्या रस्त्यानें धक्यावर गेलों. ह्या बेटावर एल्म झाड आहे; तें फार चमत्कारिक असून स्वजातीय झाडा सारखें नाहीं; त्याचीं पानें आणि वाढ आकेशिआ झाडाप्रमाणें आहे. परत जातेवेळीं ऊन फार कडक पडलें होतें व लोकांची गर्दी फार होती.

लहान नौकेंत बसून जवळच फेरी आगबोट होती तीवर गेलों. हें बंदर फार सुंदर आहे आणि ह्याला किल्ल्यानें मोठी शोभा आली आहे. ह्या ठिकाणीं पुष्कळ लोक जमले होते, ह्मणून नाटकगृहाप्रमाणें दिसूं लागलें. उन्हाच्या तापामुळें व चकाकीमुळें मला जरा घेरी येऊं लागली, ह्मणून मी तिसरे प्रहरचा पुष्कळ वेळ गलबताच्या खालच्या भागांत घालविला. आलबर्त्त साहेब फेरी आगबोटींत बसून बाहेर एक तासभर फिरण्यास गेले.

---

* ह्याविषयीं एदितरचें ह्मणणें असें आहे कीं, सरकारी कागदपत्रावरून असें कळतें कीं, गर्नजी हें बेट फ्रेंच लोकांनीं १३३९ साल घेतलें होतें; परंतु त्याच कागदपत्रावरून असें कळतें कीं, तें इंग्लिशांच्या ताब्यांत १३४० च्या जानेवारी महिन्यांत होतें. गर्नजी ह्या बेटाला कधींच कोणीं घेतलें नव्हतें, अशी जी लोकप्रसिद्धि आहे, ही कांहीं अंशीं खरी असावी. कारण फ्रेंच लोकांनीं कारनेत किल्ला आणि त्याचे जवळचा प्रांत इतकेच घेतले असावे. ही बातमी पसरतां पसरतां सर्व बेट घेतलें, अशी पसरली असावी. लोकांमध्यें ज्या दंतकथा असतात त्या कागदी पुराव्यावरून जरी खोट्या ठरतात, तरी शेवटीं बहुतकरून त्या खऱ्याच ठरतात. मुख्य गोष्ट एवढीच आहे कीं. "जिंकिलें" आणि "घेतलें" ह्या दोन्ही शब्दांचा अर्थ जसा करावा तसा होतो. इलय बेटामध्यें जो हेरिवार्द नांवाचा एक मोठा शूर मनुष्य होता त्याचा पराजय करी पर्यंत इंग्लंद नार्मंद लोकांनीं जिंकिलें असें ह्मणतां येत नाहीं.

